## ।। आशीर्वाद ।।



**प. पू. श्री. अदृश्य काडसिद्धेश्वर स्वामीजी**
**सिद्धगिरी मठ, कणेरी**

।। वंदे श्री सिद्धराम - काडसिद्धेश्वराभ्याम् ।।

# सर्वांसाठी गीता : एक जीवनग्रंथ

भाग - ३ (अध्याय ९ ते १२)

प्रा. द. ना. दुभाषी

मुद्रण :

देविका आर्ट प्रिंटर्स

मुखपृष्ठ :

श्री. माधव लाड

मुद्रित शोधन :

श्री. ज्ञानेश्वर भालेकर

अक्षरजुळणी :

ओंकार कॉम्प्युटर्स, डोंबिवली

आवृत्ती पहिली :

फेब्रुवारी २००५

मूल्य :

प्रकाशक




सिद्धगिरी गुरुकुल फाऊन्डेशन

कणेरी, कोल्हापूर

## प्रस्तावना

भगवान श्रीकृष्णाने अर्जुनाचे निमित्त करून जगाला सांगितलेली व भगवान व्यासांनी श्लोकबद्ध केलेली श्रीमद्‌भगवद्‌गीता हे जगातील आश्चर्यांपैकी एक आश्चर्य आहे. प्रा. द. ना. दुभाषी यांनी सहृदय अन्तःकरणाने ते आश्चर्य सर्वांनाच आपले वाटेल व दुरावा नाहीसा होईल अशा रीतीने त्यावर भाष्य केले आहे. प्रा. दुभाषी यांनी लेखमालेच्या स्वरूपात लिहिलेले हे भाष्य अनेकांना खूप आवडल्यामुळे ते त्यात आवश्यक ती भर घालून ग्रंथस्वरूपात प्रसिद्ध होत आहे. जनताजनार्दनाने दिलेली पोच सर्वांत मोलाची असते.

शरद ऋतूतील पूर्णचंद्राकडे जसे सर्व रसिक आकृष्ट होतात त्याप्रमाणे गीतेकडे सर्व सात्त्विक विचारवन्त आकर्षित होतात. दैनंदिन मानवी जीवनातील समस्यांचे भान ठेवून त्यांची व्यवहार, धर्म, नीती व अध्यात्म या चारही स्तरांवरील सोडवण या अद्‌भुत ग्रंथामध्ये आहे. युद्धातून बाहेर जाण्याचा अर्जुनाचा मोह १) व्यावहारिक दृष्टीने अकीर्तिकर आहे. २) 'मारला गेलास तर स्वर्ग लाभेल' हा धर्मशास्त्राचा निर्णय आहे. ३) युद्धनीतीच्या क्षात्रवृत्तीला ते शोभणारे नाही. ४) 'योगस्थ राहून संग सोडून कर्म कर' हा आध्यात्मिक उपदेश आहे. लेखकाने चारही स्तरांना चांगला न्याय दिला आहे.

गीतेची महाभारताची पार्श्वभूमी लक्षात घेऊन लेखकाने कामक्रोधादिकांचे प्रतिनिधी असलेले कौरव आणि दैवीसंपदेचे प्रतिनिधी असलेले पांडव यांच्या संघर्षाचे चित्र उभे केले आहे. 'जीवन हे कुरुक्षेत्र असून त्याचे धर्मक्षेत्र करण्यात पुरुषार्थ आहे,' हे वाक्य अंतःकरणाला भिडणारे आहे.

भगवान श्रीकृष्ण व त्याचा परमस्नेहीभक्त अर्जुन यांचे अवीट गोड चरित्र प्रारंभी सांगून औचित्य साधले आहे. सत्त्वगुण जेव्हा व्यक्तीचे 'हृदय ढिले' करतो व धर्म-अधर्माच्या संभ्रमाचे विष जेव्हा त्याच्या अंतःकरणात भिनते तेव्हा अर्जुनासारख्या 'नरशार्दूला'शी युद्ध करण्याची हिंमत दुर्योधनासारख्या 'कोल्ह्याला'ही होते. महान पराक्रमाला विवेकाची जोड नसेल तर तोही व्यर्थ ठरण्याची शक्यता असते. अविवेकाला पराक्रमाची साथ असेल तर त्याचाही विजय होण्याचा धोका असतो. उदा. दुर्योधनाचा पक्ष कितीही अन्यायाचा असला तरी त्याला भीष्म, द्रोण व कर्णासारख्या अतिमानुष योद्ध्यांची साथ होती. एकूण ईश्वराच्या राज्यात अन्यायाला पराक्रमाची साथ मिळू शकते! म्हणून न्यायाच्या पक्षानेही प्रचंड सामर्थ्य कमाविले पाहिजे. देवावर भार घालून भागत नाही.

गीतेच्या स्वरूपाची खरी ओळख प्रत्येक अध्यायाच्या शेवटी येणाऱ्या समाप्तीमध्ये आहे. 'श्रीमत् भगवत्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यांयां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुन संवादे' असे समाप्तीचे शब्द आहेत. गीतेला शास्त्रामध्ये स्मृती म्हटले आहे. कारण भगवान श्रीकृष्णाने रणांगणावर केलेल्या उपदेशाला भगवान व्यासांनी छंदबद्ध केले आहे. असे असले तरी गीतेला उपनिषदांचे मूल्य आहे. उपनिषदांप्रमाणेच ब्रह्मविद्या हा गीतेचा प्रमुख विषय आहे. ब्रह्मविद्येच्या अनुभवासाठी कर्म, भक्ती, ध्यान व ज्ञान अशा चारही योगांच्या शास्त्रांच्या अभ्यासाची जरूर आहे. क्षराक्षर विभाग, गुणत्तम विभाग इत्यादी योग पूरक आहेत.

हा संवाद कोणा सामान्य व्यक्तींमधील नसून जगद्‌गुरू भगवान श्रीकृष्ण व अधिकारसंपन्न शिष्य अर्जुन यांच्यातील असल्याने तो संवाद परम श्रद्धेय आहे, हा विचार लेखकाने जागोजागी मांडला आहे.

'जीवो जीवस्य जीवनम्' या गीतेतील सिद्धान्ताचा दोन प्रकारे अर्थ करता येतो. जगण्यासाठी एक जीव दुसऱ्या जीवाला खातो हा पहिला अर्थ असून एक जीव जीवनासाठी दुसऱ्यावर अवलंबून असतो, हा दुसरा अर्थ आहे. कोणताही अर्थ स्वीकारला तरी जीवन संघर्षमय असते हे त्याचे तात्पर्य आहे. ही ईश्वरी व्यवस्था असल्याने अनिवार्य आहे. या संघर्षमय जगात एका व्यक्तीने ज्या तत्त्वज्ञानाच्या आधाराने जगून आपले ऐहिक व पारलौकिक कल्याण साधावे ते तत्त्वज्ञान गीतेत मांडले आहे. प्रारब्ध प्रतिकूल असेल तर सृष्टीच्या झंझावातात (उदा. महायुद्धे, दंगे इ.) किंवा निसर्गाच्या तडाख्यात (उदा. धरणीकंप, वादळे इ.) जीव सापडतो व कदाचित कोणत्याच कल्याणाची संधी न मिळता त्याचे जीवन संपते. पण त्याने त्या दिशेने जे थोडेफार प्रयत्न केले असतील त्यांचे फळ म्हणून त्याला पुढील जन्मात अनुकूलता मिळते. या आश्वासनावर निर्भर राहून व्यक्तीने निष्काम कर्म, निष्काम उपासना, ध्यान व ज्ञान यांची कास धरून आपले जीवन उत्साहाने व आनंदाने जगावे.

ग्रंथाचे परीक्षण किंवा रसग्रहण करणे हा प्रस्तावनेचा हेतू नाही. लेखकाने आरंभलेल्या यज्ञात एक समिधा अर्पावी एवढ्या माफक हेतूने चार शब्द लिहिले आहेत. या यज्ञाचा प्रसाद वाचक व साधकांनी भरभरून ग्रहण करावा, ही भगवान श्रीकृष्ण चरणी प्रार्थना.

**– डॉ. श्रीकृष्ण देशमुख**
मुरगूड, कोल्हापूर

# अर्थदानी परिचय

यंदाच्या वर्षी प. पू. अदृश्य काडसिद्धेश्वर महाराजांनी गुरुमाऊलीच्या शताब्दी वर्षानिमित्त आपल्या सद्‌गुरूंची अक्षराने पूजा करण्याचा सत्यसंकल्प सोडला आहे. या संकल्पान्वये विविध विषयांवर १०० पुस्तके प्रकाशित करून मठाचे साहित्यक्षेत्र समृद्ध व विस्तृत करण्याचा त्यांचा मानस आहे. या सत्यसंकल्पातील 'सर्वांसाठी गीता : एक जीवनग्रंथ' (भाग ३) हे १४ वे स्मृती-सौरभ प्रकाशित होत आहे. या पुस्तकासाठी अर्थदान श्री. सिताराम सावळा बामणे, मु. पो. खोपी (लाडवाडी), ता. खेड, जि. रत्नागिरी यांनी केलेले आहे.

श्री. सिताराम सावळा बामणे यांनी आपले वडील कै. श्री. सावळाराम कृष्णा बामणे व मातोश्री कै. श्रीमती लक्ष्मी सावळाराम बामणे यांच्या स्मरणार्थ हे अर्थदान केले आहे.

दान करणारी माणसे दुर्मिळ असतात, असे म्हटले जाते. पण आपल्या सांप्रदायाला हे विधान तितकेसे लागू होत नाही. कारण महाराजांनी एखादा संकल्प सोडावा व तो पूर्णत्वाला नेण्यासाठी गुरुभक्तांनी सर्वतोपरीने प्रयत्न करावेत, अशी आपल्या सांप्रदायाची ख्याती आहे. एका सत्पुरुषाने तर दात्याला देवाची उपमा दिली आहे. ते म्हणतात, ''देव व दाता यात अंतर ते कोणते?''

या पुस्तकाचे अर्थदानी हे आपल्या सांप्रदायातील अतिशय जुने गुरुबंधू असून ते मठाच्या धर्मकार्यात सतत सहभागी होत असतात.

भजन, श्रवण अशा विविध मार्गांनी ते सतत गुरुसेवा करीत आहेत. त्यांच्या गुरुमाऊलीवरील श्रद्धेमुळेच त्यांना आज या पुस्तकाच्या प्रकाशनाचा मान मिळत आहे.

उत्तरोत्तर त्यांच्या हातून असेच सत्कार्य घडत राहो; त्यांना व त्यांच्या कुटुंबीयांना भरपूर आयुरारोग्य, धनसंपदा, शांती, समाधान लाभो, ही ईश्वरचरणी प्रार्थना!

श्री. बामणे यांचा वंशावळ नकाशा पुढीलप्रमाणे आहे :




# अनुक्रमणिका

## अध्याय नववा

# राजविद्या राजगुह्ययोग

गीतेच्या मध्यावर आपण आलो आहोत. नवव्या अध्यायाची थोरवी अपूर्व आहे. हा अपूर्व अध्याय मला उमगला आहे, असा माझा दावा नाही. किंबहुना गीतेवरचे हे माझे स्वतंत्र भाष्यही नाही. गीता मला जशी समजली, भावली तशी मी सांगण्याचा प्रयत्न करतोय. गीतेचे समर्थ विचार इतरांना सांगणे ही मी माझी भक्ती समजतो. गीता जर जीवनात आली तर जीवन बदलू शकते, जगण्याला अर्थ प्राप्त होऊ शकतो व जीवनात सुगंध निर्माण होऊ शकतो, ही माझी दृढ श्रद्धा आहे. उपदेश करावा किंवा ज्ञान सांगावे हा तर बिलकूल हेतू नाही. किंबहुना हे लिहीत असताना माझे विचार पक्के होतात, अधिक दृढ होतात, म्हणून केलेला हा हव्यास आहे. कारण गीतेचा अधिकारी होण्याची पात्रता माझ्यात नाही, याची मला पूर्ण जाणीव आहे. नववा अध्याय सुरू करण्यापूर्वी मनात अनेक भाव-भावनांचे तरंग उमटले. त्यातलेच काही शब्दरूपाने मी मांडले.

नववा अध्याय म्हणजे कंठमणी! भक्ति-प्रेमाचे रहस्य विशद करणारा अत्यंत महत्त्वाचा अध्याय! म्हणून अर्जुनाने प्रश्न विचारलेला नसतानाही भगवंतांनी या गूढ अध्यात्मविद्येचा सरळ, सोपा भावार्थ इथे खुलवून दाखविला आहे. वासराने ढुसण्या न मारता केवळ वात्सल्यामुळे गाईला पान्हा फुटावा तसा! संपूर्ण गीता म्हणजे कृष्ण-अर्जुन यांच्या संवादाचा एक उत्कट नाट्याविष्कार आहे. अर्जुनाच्या रूपाने भगवंताला तुम्हा-आम्हा सर्वांना गीता समजून सांगायची आहे. अर्जुन आपला प्रतिनिधी आहे. विविधस्पर्शी अशा या अध्यायात भक्तिशास्त्राची गूढ तत्त्वे, भगवंताचे स्वरूप, व्याप्ती, प्रकृतीचे व्यवहार, पाप-पुण्याचे रहस्य... अशा कितीतरी विषयांचा उलगडा झाला आहे. म्हणून हा अध्याय पवित्र, पावन झाला आहे.

ज्ञानेश्वर महाराजांना या नवव्या अध्यायाची महती एवढी वाटली की, त्यांनी हा अध्याय मांडीवर ठेवून संजीवनी समाधी घेतली. माऊली म्हणते की, असंख्य वेदांमध्ये जो गूढार्थ भरलेला आहे, तो महाभारताच्या एक लक्ष श्लोकांमध्ये सामावलेला आहे व महाभारताच्या अठरा पर्वांमध्ये जो अभिप्राय

आहे, तो कृष्णार्जुनाच्या संवादामध्ये म्हणजे गीतेत प्रकट झाला आहे. व गीतेच्या ७०० श्लोकांमध्ये जो अभिप्राय आहे, तो एकट्या नवव्या अध्यायात आहे. म्हणून ह्या अध्यायाचे माहात्म्य अनिर्वचनीय आहे. म्हणजे शब्दांतून व्यक्त करावयाच्या पलीकडचे आहे.

**तैसे नवमीं कृष्णाचे बोलणे ।**
**ते नवमींचियाचि ऐसे मी म्हणे ।**
**या निवाडा तत्त्वज्ञु जाणे ।**
**जया गीतार्थु हाती ।।१०.३१।।**

''ज्याप्रमाणे राम-रावण युद्धाचे वर्णन शब्दांत करणे अशक्य आहे किंवा त्याला कोणतीही उपमा देता येत नाही, त्याप्रमाणे नवव्या अध्यायातील श्रीकृष्णाने केलेला जो उपदेश तोही अनुपमेय आहे; तो नवव्या अध्यायासारखाच आहे, असे माझे म्हणणे आहे. हा मी केलेला निर्णय ज्याला गीतेच्या अर्थाचे आकलन झाले आहे, त्या तत्त्ववेत्त्याला पटेल.''

अशा या नवव्या अध्यायाच्या सुरुवातीला ज्ञानेश्वर महाराज श्रोत्यांना खडबडून जागे करतात व अवधानाचे आवाहन करतात -

**तरि अवधान एकवेळे दीजे ।**
**मग सर्व सुखासी पात्र होइजे ।**
**हे प्रतिज्ञोत्तर माझें । उघड ऐका ।।९.१।।**

''अहो श्रोतेहो, तर तुम्ही एक वेळ (माझ्या बोलण्याकडे) पूर्ण लक्ष द्या म्हणजे मग सर्व सुखाला पात्र व्हाल, हे माझे उघड प्रतिज्ञेचे बोलणे ऐका.''

गीता ही माता आहे. बालक झाल्याशिवाय, तिच्या मांडीवर बसल्याशिवाय अमृततुल्य दुग्धपान करता यावयाचे नाही. गीतेचे अमृतपान करून सुखी, आनंदी, शांत, तृप्त होता येते, हे संतांचे प्रतिज्ञेवर सांगणे आहे. इथे बालक व्हावयाचे म्हणजे बालकासारखे निरागस, विकारहीन, सात्त्विक, शुद्ध व्हावयाचे. पुष्टिमार्गामध्ये बाल-कृष्णाची पूजा केली जाते. भगवंताकडे जाण्यासाठी बालक व्हावे लागते. अंतःकरणात शुद्धता आणणे, विषय-विकारांची मलिनता धुऊन टाकून शुद्ध, पवित्र होणे म्हणजे बालक होणे. अशा या नवव्या अध्यायाचे म्हणजे भक्तीचे गूढ ऐकताना मात्र चित्तैकाग्रता पाहिजे. अध्यात्मात अवधान नसेल तर त्याची अपेक्षित फळे प्राप्त होत नाहीत. मृत्यूनंतर कोणती गती प्राप्त होईल, हा विचार खूप दूरचा आहे. माझ्या लौकिक जीवनात मला आत्मसुख प्राप्त होईल का? हा खरा प्रश्न आहे. गीतेच्या विचारांनी दुःखनाश होऊन आनंदप्राप्ती झाली पाहिजे आणि यासाठी अवधानाची गरज आहे. या ज्ञान-सागरातून मला किती अमृत



प्राप्त होईल? जेवढा माझा घडा मोठा-लहान असेल तेवढे. ''ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहं'' जे मला ज्याप्रमाणे, प्रकारे भजतात त्यांना मी त्याप्रमाणेच फल देतो. हे भगवंताचे आश्वासन आहे. अध्यात्मात सगळे रोखठोक आहे. हातात पाच पैसे घेऊन याल तर तेवढेच फळ प्राप्त होईल. व्यावहारिक जगतात हे असेच घडते, तर मग अध्यात्मात वेगळा न्याय कसा असेल? तुम्ही प्रेम दिल्याशिवाय शेजारीच नव्हे तर कुटुंबातील मंडळीसुद्धा प्रेम करत नाहीत. काही वेळा जिवापाड प्रेम करूनसुद्धा पदरी निराशा येते ही गोष्ट वेगळी! पण भगवंताच्या दरबारात मात्र तुम्ही दोन पावले चाललात तर भगवंत आपल्यासाठी चार पावले चालतो हे संतांचे ठासून सांगणे आहे. देव किती मोठा-व्यापक आहे? मूर्ती किती प्रतिसाद देणारी आहे? उत्तर सोपे आहे- जेवढा माझ्या अंतःकरणात भाव असेल तेवढा ईश्वरही व्यापक!

संत तुकारामांनी याचे रहस्य अतिशय मार्मिक शब्दांत सांगितले आहे.

**पाषाण देव पाषाण पायरी ।**
**पूजा एकावरी पाय ठेवी ।।१।।**
**सार तो भाव सार तो भाव**
**अनुभवी देव तेचि जाले ।।२।।**

''मंदिरात ज्या पाषाणावर आपण उभे असतो त्याच पाषाणाची भगवंताची मूर्ती असते. पण एका पाषाणावर आपण पाय ठेवतो व एकाची पूजा करतो. आपल्या अंतःकरणात जो भाव आहे, तोच खरा भाव, तोच देव हेच खरे.''

गीतेचा नववा अध्याय वाचताना हा अंतःकरणात भाव असला पाहिजे. संपूर्ण अवधान असले पाहिजे. तर आपण सर्वसुखासी पात्र होऊ. जमेल तेवढे व जमेल तसे करून अध्यात्मात अपेक्षित फळ प्राप्त होत नाही. भक्ती ही साधी, सोपी रसाळ आहे, पण ती सुळावरील पोळी आहे हेही ध्यानात ठेवले पाहिजे. म्हणून यशस्वी साधकांची चरित्रे वाचताना अयशस्वी साधकांची चरित्रेही अधिक काळजीपूर्वक अभ्यासावीत. म्हणजे अध्यात्मातील खाचखळगे, अवनतीची कारणेही समजून येतील. सावधानता हा भक्तीचा मंत्र आहे. सतत अवधान, चित्ताची एकाग्रता, स्थिर बुद्धी ही अध्यात्मातील मोठी संपदा आहे. हे गुण प्राप्त न करता, गीता-मंदिरात प्रवेश करून सुख-प्राप्ती होणे असंभव आहे. नवव्या अध्यायात भक्ताच्या या सर्व गुणांचे वर्णन आहे. श्रेष्ठ भक्त व श्रेष्ठ भक्ती कशी असावी याचे उत्कृष्ट दिग्दर्शन भगवंतांनी या अध्यायात केले आहे. सर्व अध्यायांचे सार असलेला हा पवित्र अध्याय पवित्र भावनेने समजून घेऊ.

भगवान श्रीकृष्ण पहिल्या तीन श्लोकांत याची प्रस्तावना करतात -

**इदं तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे ।**
**ज्ञानं विज्ञानसहितं यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ।।१।।**
**राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम् ।**
**प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् ।।२।।**
**अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परन्तप ।**
**अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि ।।३।।**

श्री भगवान म्हणाले, ''तू दोषदर्शी नाहीस म्हणून आता गुह्यातले गुह्य असे विज्ञानसहित ज्ञान, जे जाणल्याने अशुभापासून मुक्त होशील, ते हे मी तुला सांगतो.'' ।।१।।

''हे (ज्ञान) सर्व गुह्यांत राजा म्हणजे श्रेष्ठ, राजविद्या म्हणजे सर्व विद्यांमध्ये श्रेष्ठ, पवित्र, उत्तम, प्रत्यक्ष बोध होणारे, आचरण्यास सुखकारक, अव्यय आणि धर्म्य आहे.'' ।।२।।

''या धर्मावर श्रद्धा न ठेवणारे पुरुष हे परंतपा! मला येऊन न मिळता मृत्युयुक्त संसाराच्या मार्गात परत येतात.'' ।।३।।

या अध्यायाचे नाव आहे राजविद्या, राजगुह्ययोग. याचा अर्थ राजाची विद्या व राजाचे गुह्य असा नव्हे तर राजविद्या म्हणजे सर्व विद्यांमध्ये श्रेष्ठ अथवा राजा आणि राजगुह्य म्हणजे सर्व गुह्यांत श्रेष्ठ, असा आहे.

पहिल्या श्लोकात अर्जुनाला 'अनसूयवे' असे म्हटले आहे. अनसूयु म्हणजे जो निर्मत्सर आहे असा. अर्जुन असा होता म्हणून ही राजविद्या प्राप्त करण्याचा अधिकारी झाला. निर्मम, निरहंकारी, निर्मत्सर झाल्याशिवाय ही विद्या प्राप्त होऊ शकत नाही. ही सर्व पात्रता अर्जुनाकडे होती म्हणून भगवंत ही राजविद्या सांगण्यास उद्युक्त झाले. मत्सरता हे दुःखाचे एक मोठे कारण आहे. माणूस आपल्याजवळ असणाऱ्याच गोष्टींचा अधिक विचार करतो व दुःखी होतो. दुसऱ्याच्या दुःखाने दुःखी झाले पाहिजे व दुसऱ्याच्या सुखाने सुखी झाले पाहिजे. संत रामदास म्हणतात,

**दुसऱ्याचे दुःखे दुखावे**
**दुसऱ्याचे सुखे सुखावे**
**अवघेचि सुखी असावे**
**ऐसी वासना ।।**

अशी वृत्ती होणे म्हणजे अनसूय, निर्मत्सर होणे. एकवेळ दुसऱ्याच्या दुःखाने दुःख होईल पण दुसऱ्याच्या सुखाने सुखी होणे ही अत्यंत अवघड गोष्ट आहे. पाणी जसे पुढे वाहताना खड्डे भरूनच वाहते तसे. अशी वृत्ती असणारी माणसे समोरील माणसाचे दुःख दूर केल्याशिवाय स्वस्थ बसत नाहीत.



अशी आत्मौपम्य दृष्टी आल्याशिवाय या गुह्य ज्ञानाचा अधिकारी होता येत नाही. भगवंत ज्ञानाची विज्ञानासह महती सांगत आहेत. विज्ञान म्हणजे ज्ञानाचा प्रत्यक्ष अनुभव येणे. धर्माचे व उपासनेचे फळ प्रत्यक्ष मिळत नाही. ते क्रमाने मिळते. कर्म, उपासना, ज्ञान व नंतर फलप्राप्ती असा हा क्रम आहे. याच ज्ञानाने सर्व अशुभांचा नाश होतो. ''मोक्ष्यसेऽशुभात्'' हे त्याचे फळ आहे. माणसाला मृत्यू अशुभ वाटतो, पण ज्ञानी माणसाला तो मंगल सोहळा वाटतो. अज्ञानी जीव अहंकाराने स्वतःकडे कर्तृत्वभाव घेत असतो. 'मी करतो', 'मी भोगतो' या सर्व अशुभ भावनेतून ज्ञानी मुक्त होतो व 'इदं न मम' अशा वृत्तीने सर्व लौकिक व्यवहार करतो. त्यामुळे दंभ, अभिमान, दर्प, वासना-विकार अशा आसुरी संपत्तीपासून मुक्त होऊन तो सुखाचा धनी होतो. ज्ञानाचे हे फळ पहिल्या श्लोकात सांगून दुसऱ्या श्लोकात त्याचा प्रत्यक्ष अनुभव घेता येतो, हे भगवंतांनी विशेषत्वाने प्रतिपादिले आहे. प्रत्यक्ष जीवनात या ब्रह्मविद्येची अनुभूती घेता येते ही गोष्ट या अध्यायाचे वैशिष्ट्य आहे. ही केवळ तार्किक, बौद्धिक, सैद्धान्तिक, शाब्दिक चर्चा किंवा काथ्याकूट नसून ती 'प्रत्यक्षावगम' अशी विद्या आहे. म्हणून ती पवित्र आहे. ''आत्मनि अधि इति अध्यात्मं'' अंतःकणातील चित्त, अहंकार, मन, बुद्धी यांचा अभ्यास करून त्यांचे उदात्तीकरण व विभूतीकरण करणे म्हणजे अध्यात्म. हाच 'स्वाध्याय'- 'स्व'चा अध्याय, अभ्यास! भगवंतांनी या अध्यायात या अभ्यासाची प्रत्यक्ष दिशा दाखविली आहे. हीच या अध्यायाची खासियत आहे. म्हणून हा अध्याय अतिशय पवित्र, मंगल मानण्यात आला आहे. ''अध्यात्मविद्या विद्यानां'' असे पुढे दहाव्या अध्यायात म्हटले आहे. सर्व विद्यांत श्रेष्ठ अध्यात्मविद्या आहे. इतर सर्व विद्या माणसाला भाकरी मिळवून देतात. ही लौकिक विद्या अधिकच प्राप्त केली तर कीर्ती, प्रतिष्ठा, पदे, संपत्तीदेखील या लौकिक जगतात मिळून जातात. पण अध्यात्मविद्या ही राजविद्या आहे. कारण त्यामुळे जीवनाचे रहस्य समजते, जन्म-मृत्यूचा अर्थ समजतो. जीव-जगत्-जगदीश्वराचे ज्ञान होते,.... म्हणून ही विद्या पवित्र तर आहेच; पण सर्वश्रेष्ठही आहे. इतर विद्यांमुळे माणसाला सुख मिळते; पण ते अल्पकाळ टिकणारे असते. पण ही राजविद्या त्याला अक्षय, शाश्वत सुखाकडे नेते. म्हणून ती विद्या 'सुसुखम् आहे. हे ज्ञान 'धर्म्य' आहे म्हणजे यात सर्व धर्मांचा समावेश आहे. इतके असून ते 'कर्तुंसुसुखम्' म्हणजे सुखाने मिळवता येते.

अशी ही राजविद्या-राजगुह्य समजण्यासाठी श्रद्धेची नितांत आवश्यकता आहे. जे जे बुद्धिगम्य आहे, तेवढेच मी स्वीकारीन हा अट्टाहास दूर झाला

तरच इथे प्रवेश आहे. कारण हा अतींद्रिय शक्तीचा विषय असल्यामुळे तो केवळ प्राकृतिक बुद्धी व तर्क यांनी जाणणे हे केवळ असंभव, दुरापास्त आहे. अज्ञ, अश्रद्ध, संशयात्म्याला ही विद्या प्राप्त होणार नाही. 'श्रद्धावांल्लभते ज्ञानं तत्परः संयतेन्द्रियः' श्रद्धावानालाच ज्ञान प्राप्त होते. (४.३९) अश्रद्ध माणसे मात्र या लौकिक जगातही सुखी होत नाहीत व पारलौकिक जगातही प्रवेश प्राप्त करीत नाहीत. असे लोक जन्म-मृत्यूच्या फेऱ्यात पुनःपुन्हा अडकत असतात; पाप-पुण्याच्या भोवऱ्यात अडकून अज्ञानरूपी अंधकारात चाचपडत असतात. राजविद्येने हा अंधकार दूर होऊन दिव्यत्वाचा प्रकाश जीवनात येतो, पण गाढ श्रद्धेशिवाय हे शक्य नाही. ज्ञानेश्वर माऊलींनी या श्लोकांवर अत्यंत सुंदर निरूपण केले आहे. ते म्हणतात -

**पाहे पां दूध पवित्र आणि गोड ।**
**पासीं त्वचेचिया पदराआड ।**
**परि ते अव्हेरुनि गोचिड ।**
**अशुद्ध काय नेघति ।।५७।।**
**का कमलकंदा आणि दर्दुरी ।**
**नांदणूक एकेचि घरी ।**
**परि परागु सेविजे भ्रमरी ।**
**जवळिला चिखलुचि उरे ।।५८।।**
**तैसा हृदयामध्ये मी रामु ।**
**असता सर्व सुखाचा आरामु ।**
**कीं भ्रांतासि कामु । विषयावरी ।।६०।।**

"अर्जुना, (असे) पाहा की दूध हे पवित्र असून शिवाय गोड आहे व ते जवळच कातडीच्या पदरापलीकडे आहे. परंतु गोचीड ते टाकून देऊन रक्तच पीत नाही काय?" ।।५७।।

"किंवा कमळकंद आणि बेडूक यांची वस्ती एके ठिकाणीच असते. परंतु कमळातील परिमल, परागकण दूरवरून येऊन भुंगे सेवन करून जातात व जवळच असलेल्या बेडकांना चिखलच शिल्लक राहतो." ।।५८।।

"त्याप्रमाणे सर्व सुखाचा बगीचा असा जो मी राम, तो मी सर्वांच्या हृदयात असताना (त्या मला न जाणून) मूर्ख लोक (सुखाकरिता) विषयांचीच इच्छा करतात." ।।६०।।

असे हे अश्रद्ध पुरुषांचे वर्णन माऊलींनी किती समर्पक दृष्टान्त देऊन केले आहे! सुखाचा अक्षय झरा अंतःकरणातच आहे. त्याचा शोध, बोध घेणे हीच राजविद्या-राजगुह्य!!



परमेश्वराचे ज्ञान सहज-सुलभ होण्यासाठी जो राजमार्ग आहे त्याचे वर्णन भगवंतांनी येथे केले आहे. तशी या विषयाची सुरुवात ज्ञान-विज्ञानाच्या निरूपणाने सातव्या अध्यायापासून सुरू झालीच आहे. भक्तिशास्त्रातील सिद्धान्तांची अपूर्व मीमांसा या अध्यायात आली आहे. केवळ बुद्धीने, तर्काने हे समजून घ्यायचे नाही. यासाठी नितांत श्रद्धेची, समर्पणाची, भावाची, प्रेमाची इथे गरज आहे. आईचे प्रेम, वात्सल्य केवळ अनुभवायचे असते. इथे चित्त द्रवले पाहिजे. हृदय प्रेमाने भरले पाहिजे. हा अध्याय बुद्धीने नव्हे, तर केवळ भक्तीने समजून घ्यायचा आहे. आता पुढील श्लोकात, भगवंत आपल्या व्यक्त रूपाचे वर्णन करीत आहेत -

**मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना ।**
**मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः ।।४।।**
**न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम् ।**
**भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः ।।५।।**
**यथाकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान् ।**
**तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय ।।६।।**

"मी आपल्या अव्यक्त स्वरूपाने हे सर्व जग विस्तारिले किंवा व्यापिले आहे. माझ्या ठायी सर्व भूते आहेत. मी त्यांच्या ठायी नाही ।।४।।

आणि माझ्या ठायी सर्व भूतेही नाहीत! पहा, माझी ईश्वरी करणी किंवा योगसामर्थ्य! भूते उत्पन्न करणारा माझा आत्मा भूते धारण करूनही (पुन्हा) भूतात नाही." ।।५।।

"सर्वत्र वावरणारा महान वायू ज्याप्रमाणे सर्वदा आकाशाच्या ठायी, त्याप्रमाणे सर्व भूते माझ्या ठायी आहेत, असे समज." ।।६।।

इथे ब्रह्मसत्तेचे, ब्रह्मस्वरूपाचे, त्याच्या सगुण-निर्गुण रूपाचे वर्णन आहे. थोडी कोड्यात पाडणारी शब्दरचना असली तरी कसलाही वैचारिक गोंधळ करून न घेता या गुह्यतम गोष्टी समजून घ्यायच्या आहेत.

- जीव, जगत् व जगदीश्वर हे तिन्ही एकच आहेत, असे स्पष्ट वर्णन उपनिषदांतून आले आहे.

**एको देवः सर्वभूतेषु गूढः सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मा ।**
**कर्माध्यक्षः सर्वभूताधिवासः साक्षी चेता केवलो निर्गुणश्च ।।**
(श्वेता.६.६.११)

**ईशावस्यमिदं सर्वं यत्किंच जगत्यां जगत्....** (ईशा.१)

- भगवद्गीतेत भगवंतांनी, जीव (आत्मा किंवा पुरुष), जगत् (प्रकृती) व परब्रह्म (परमात्मा किंवा पुरुषोत्तम) यांच्या परस्परसंबंधाबद्दल स्पष्ट विवेचन

केले आहे. परब्रह्माची प्रथम व्यक्त व अव्यक्त अशी दोन रूपे सांगितली आहेत. या सगुण-निर्गुण रूपाबरोबरच पुढे अव्यक्ताचेही सगुण, सगुण-निर्गुण व निर्गुण असे तीन भेद केलेले आहेत. ''जीव माझा अंश आहे.'' (१५.७) ''सर्व भूतांच्या अंतरी असणारा आत्मा मी आहे'' (१०.२०) ''जगात ज्या ज्या श्रीमान् किंवा विभूतिमत् मूर्ती आहेत त्या सर्व माझ्या अंशापासून आहेत'' (१०.४१) ''मीच ब्रह्माचे, अव्यक्त मोक्षाचे, शाश्वत धर्माचे व परमावधीच्या सुखाचे मूळ स्थान आहे,'' (१४.२७) अशा अव्यक्त, निर्गुण, निराकार, अक्षर, अचिन्त्य, कूटस्थ, अचल परब्रह्माचे वर्णन करून आपल्या सगुण रूपाची भक्ती करणे अधिक श्रेयस्कर, सुलभ आहे, हेही अर्जुनाच्या रूपाने आपल्याला १२व्या अध्यायात समजावले आहे. सर्व चराचरसृष्टी आपल्या व्यक्त स्वरूपात साक्षात भरलेली आहे असे विश्वरूप दर्शनाने अर्जुनाच्या प्रत्यक्ष प्रत्ययास आणून दिल्यावर अखेर अव्यक्तापेक्षा व्यक्ताची उपासना करणे अधिक सोपे आहे, असे प्रतिपादिले आहे. ''त्रिगुणात्मक प्रकृती ही माझी दैवी माया असून त्या मायेला जे तरून जातात ते मला येऊन पावतात'' (७.१४) असेही वर्णन केलेले आहे. उपासनेसाठी व्यक्त स्वरूपाचा भगवंतांनी गीतेत आग्रह जरी धरला असला तरी परमेश्वराचे श्रेष्ठ स्वरूप अव्यक्त म्हणजे इंद्रियांना अगोचर असून तो अव्यक्ताचा व्यक्त बनतो ही त्याची माया आहे. आणि ही माया तरून जाऊन अखेर तिच्या पलीकडच्या शुद्ध व अव्यक्त स्वरूपाचे ज्ञान झाल्याखेरीज मनुष्यास मोक्ष मिळत नाही, असा गीतेचा सिद्धान्त आहे. (१३.३१) ''अव्यक्त परमेश्वरच व्यक्त सृष्टी निर्माण करतो व सर्वांच्या हृदयात राहून त्यांचे व्यापार त्यांच्याकडून चालवितो. (१८.६१).'' त्यामुळे तो अव्यक्त म्हणजे इंद्रियांना अगोचर असला तरी तो दया, कर्तृत्व वगैरे गुणांनी युक्त म्हणजे सगुणच आहे. अशी ही सगुण-निर्गुण दोनच रूपे नसून; दोन्ही रूपे एकत्र मिसळून अव्यक्त परमेश्वराचे (वर पाचव्या श्लोकात केल्याप्रमाणे) वर्णन केले आहे. मी भूतांचा आधार असून त्यामध्ये नाही. परब्रह्म सत् नाही आणि असत्‌ही नाही. दूर आहे आणि जवळही आहे. अविभक्त आहे आणि विभक्तही दिसते. (१३.१२ १४.१५) अशी परस्परविरोधी सगुण-निर्गुण वर्णने आहेत.

मूर्त विश्वात सर्वत्र ब्रह्मसत्ता व्याप्त आहे. सर्वत्र ओतप्रोत आहे. ज्ञानेशांच्या एका छोट्या ओवीत हे सर्व वर्णन आले आहे. **''या उपाधिमाजी गुप्त । चैतन्य असे सर्वगत । ते तत्वज्ञ संत । स्वीकारिती ।।''**

संत तुकारामांना भगवंत जळी, स्थळी दिसत होता. अशा 'विष्णुमय जगाचे' वर्णन प्रतिज्ञेवर ते करतात -

**''विठ्ठल जळी स्थळी भरला ।**



**रिता ठाव नाही उरला ।**
**अजि मी दृष्टीने देखिला ।**
**विठ्ठलचि विठ्ठलचि ।।''**

संत सावतामाळी यांना ह्या विठ्ठलाचे दर्शन मळ्यातील कांदा, मुळा, भाजीतून झाले. ज्याचे कोणत्याही प्रकारचे मूर्त स्वरूप नाही अशा ब्रह्माचे दृश्यमान स्वरूप विश्वव्यापी आहे. विश्व इंद्रियगोचर आहे. पण परब्रह्म इंद्रियातीत आहे. ब्रह्म इंद्रियगोचर विश्वात व्यापून राहिलेले आहे व ते इंद्रियगम्य आहे हेही खरे आणि इंद्रियगम्य नाही हेही खरे! म्हणूनच भगवंत म्हणतात, ''पश्य मे योगमै श्वरम् ।'' मूर्त विश्वाला व्यापून असणारे अमूर्त म्हणून ते ज्ञानगम्य आहे. हीच गुह्य गोष्ट! मूर्त वस्तूत अमूर्त वस्तू मूर्त वाटत नाही, पण अमूर्त वस्तूच्या अस्तित्वाने दृश्य भूतांचे अस्तित्व भासते. सर्व पदार्थांना सत्ता, आश्रय, आधार देत असूनही त्या सत्तेचे पदार्थात पदार्थरूपाने नसणे, किंवा निर्लेप असणे हाच या विश्वातला चमत्कार आहे. म्हणून भगवंत म्हणतात - **''मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः...''**

प्रथम ह्या जगात 'ईशावास्यम्' प्रभू भरला आहे असे सांगितले, नंतर परमेश्वरात जग आहे हे सांगितले व त्यानंतर आकाशात वायू जसा सर्वत्र पसरला आहे तसा परमेश्वर परमात्माच केवळ आहे, दुसरे काहीच नाही असे सांगितले हा त्रिविध चमत्कार म्हणजेच ''पश्य मे योगमैश्वरम्''. यालाच योग म्हणजे माया म्हणतात. सर्व भूते माझ्या ठिकाणी आहेत आणि नाहीतही. अव्यक्त अशा निर्गुण रूपाने चराचर व्यापलेले आहे. प्रत्येक वस्तूला जी सत्ता आहे, ती त्या परमसत्तेची आहे. परमात्म्याच्या सत् चित् आनंद स्वरूपाने जगत् भासते हेच त्याचे स्वरूप आहे. सर्वत्र फक्त परमेश्वरच आहे हेच अद्वैत तत्त्वज्ञान होय! ही परमसत्ता सर्व भूतांना निर्माण करते, त्यांचे पोषण करते, पण स्वतः त्यात राहत नाही. अशा या नित्य, शुद्ध, बुद्ध, सत् चित् आनंदमय स्वरूपाला समजून घेणे म्हणजे 'अध्यात्म' होय. आपणही त्याचेच अंश असल्याने आपले मूळ स्वरूपही असेच आहे. पण मायेने, अज्ञानाने, अविद्येने आपल्या मूळ स्वरूपाची ओळख आपणांस होत नाही. 'आत्मनि अधि इति अध्यात्मं' म्हणजे आत डोकावून अंतस्थ असलेल्या शुद्ध, बुद्ध स्वरूपाला ओळखणे, देह हे केवळ साधन असून त्याच्या साहाय्याने परमतत्त्वाची ओळख करून घेणे म्हणजेच जीवनाचे सार्थक करणे, हेच मानवाचे ध्येय असले पाहिजे. ज्ञान, आत्मज्ञान म्हणजे स्वतःचे मूळ स्वरूप जाणणे. संत रामदासांच्या शब्दांत -

**ऐक ज्ञानाचे लक्षण । ज्ञान म्हणजे आत्मज्ञान ।**

पाहावे आपणांसी आपण । या नाव ज्ञान ।।

आता पुढील चार श्लोकांत सृष्टीच्या प्रभव-प्रलयाविषयी भगवंत सांगत आहेत -

**सर्वभूतानि कौन्तेय प्रकृतिं यान्ति मामिकाम् ।**
**कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहं ।।७।।**
**प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुनः पुनः ।**
**भूतग्राममिमं कृत्स्नमवशं प्रकृतेर्वशात् ।।८।।**
**न च मां तानि कर्माणि निबध्नन्ति धनंजय ।**
**उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु ।।९।।**
**मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् ।**
**हेतुनानेन कौंतेय जगद्विपरिवर्तते ।।१०।।**

"कल्पान्ती सर्व भूते हे कौन्तेया! माझ्या प्रकृतीस येऊन मिळतात. आणि कल्पारंभी (म्हणजे ब्रह्मदेवाच्या दिवसाच्या आरंभी) मीच त्यांना पुन्हा निर्माण करतो." ।।७।।

"मी आपल्या प्रकृतीला हाती धरून (त्या) प्रकृतीच्या ताब्यात गेल्याने अवश म्हणजे परतंत्र (अर्थात् ज्याच्या त्याच्या कर्मानि बद्ध) झालेला हा भूतांचा सर्व समुदाय पुनःपुन्हा निर्माण करतो." ।।८।।

"(पण) हे धनंजया! (या सृष्टी निर्माण करण्याच्या) कर्मात माझी आसक्ती नसून मी उदासीनासारखा राहत असल्यामुळे ती कर्मे मला बंधक होत नाहीत." ।।९।।

"मी अध्यक्ष होऊन प्रकृतीकडून सर्व चराचर सृष्टी प्रसवितो. या कारणांमुळे हे कौन्तेया, जगाची ही घडामोड चालली आहे." ।।१०।।

सातव्या अध्यायातील चौथ्या व पाचव्या श्लोकांमध्ये प्रकृतीची, अष्टधा प्रकृती व अपरा म्हणे जीवभूत प्रकृती असे दोन प्रकार आपण पाहिले आहेत. भगवंत म्हणतात की, ही सर्व भूते कल्पाच्या शेवटी माझ्या अव्यक्त प्रकृतीत ऐक्याला येतात. म्हणजे प्रकृतीपासून झालेले सर्व जग पुन्हा प्रकृतीत लीन होते. प्रकृती म्हणजे माया ही परमात्म्याचीच शक्ती आहे. तीच पंचमहाभूतात्मक जगाच्या आकाराने प्रगट होते. स्थावर, जंगम व सर्व भूतसमुदायास प्रकृतीच मूळ आहे. म्हणून भूतांची निर्मिती, रक्षण, या सर्वच गोष्टींना ही प्रकृती कारणीभूत आहे. पौर्णिमेच्या वेळी समुद्र भरतीने अफाट भरून येतो. पण चंद्राला त्याचे फारसे देणे-घेणे लागत नाही, तसे भगवंत आपल्या प्रकृतीचा अंगीकार करतात.

शुभ्र स्फटिकाशेजारी तांबडे फूल ठेवल्यास तो स्फटिक तांबडा दिसतो.



स्फटिकाचा मूळचा रंग तांबडा नव्हता पण तांबड्या पुष्पाच्या उपाधीने तो तांबडा भासतो. त्या स्फटिकाप्रमाणेच जगाच्या या सर्व व्यवहारामध्ये भगवंत असंग, अनासक्त, उदासीन आहेत. मायेच्या उपाधीमुळे भगवंतांकडे कर्तृत्व भासते. माया जग निर्माण करते, पण फक्त भगवंताचे अधिष्ठान असेल तेव्हा! केवळ शून्याला काही किंमत नसते. शून्यापुढे कितीही शून्ये ठेवली तरी सर्वांची किंमत शून्यच. पण शून्यामागे एखादा आकडा घातला की त्याची किंमत अतोनात वाढते. तशी ही माया शून्यासारखी आहे. भगवंतरूपी आकड्याने या मायेला किंमत येते, ती कार्यप्रवण होते. तसे हे जग वैचित्र्याने भरले आहे. न्याय-अन्याय, सुख-दुःख, नीती-अनीती, शुभ-अशुभ, प्रभव-प्रलय, द्वेष-प्रीती अशा अनेक द्वंद्वांनी भरलेले आहे. अशा पराकोटीच्या उत्कट भावप्रसंगांच्या वेळी आपण भगवंताचे स्मरण करतो. कधी महाप्रलयाच्या रूपाने हाहाकार उडतो तर कधी धरणीकंपामुळे असंख्यांचे जीवन उद्ध्वस्त होते; तर कधी महामारी, युद्ध इ.मुळे निष्पाप जीवांचे बळी जातात. अशा वेळी त्या जगन्नियंत्याला निर्दयता, वैषम्य असे दोष लागतात. पण भगवंतांनी वरील श्लोकांत आपली भूमिका स्पष्ट केली आहे. जसा घरातील दिवा अलिप्त असतो, साक्षीभूत असतो, तशीच स्थिती त्या परमसत्तेची आहे. घरातील सर्व व्यवहार दिव्याच्या प्रकाशात होत असतात, पण दिव्याला त्याचे काहीच सोयरसुतक नसते. जसे आरोपीला फाशीची शिक्षा सुनावताना न्यायाधीश निर्विकार, अलिप्त, साक्षीभूत असतो, तसेच या जगाच्या व्यवहारामध्ये भगवंत अनासक्त व उदासीन असल्यामुळे त्याला कर्मे बंधनकारक होत नाहीत. भगवंत सर्व भूतांमध्ये असूनही त्यांच्याकडून होणाऱ्या कर्मांमध्ये तो उदासीन आहे. लोकांच्या सर्व व्यापाराला सूर्य जसा निमित्तमात्र आहे, त्याप्रमाणे जगाच्या उत्पत्तीला भगवंत हेतू आहे. भगवंताने प्रकृतीचा स्वीकार केला म्हणजे तिच्यापासून चराचराची उत्पत्ती होते. म्हणून भगवंत चराचराच्या उत्पत्तीला या अर्थाने 'हेतू' आहेत. मागील श्लोकांतील जो ऐश्वर्ययोग तो हाच! भगवंताच्या ठिकाणी सर्व प्राणी आहेत पण भगवंत प्राण्यांमध्ये नाही, अथवा भूते भगवंताच्या ठिकाणी नाहीत व भूतांमध्ये भगवंत नाही. ही ती गुह्य गोष्ट आहे. मी उदासीन नाही पण उदासीनवत् आहे, असे भगवंत म्हणतात. उदासीनता म्हणजे इच्छांचा अभाव नसून इच्छेच्या आसक्तीच्या अभावाला उदासीनता म्हणतात. 'मयाध्यक्षेण' ही गोष्ट आपण जाणली पाहिजे. 'माझ्या अध्यक्षतेखाली प्रकृती काम करीत आहे' ह्या सृष्टीचे सर्व कर्तृमकर्तुम् हे त्याचे आहे, या सृष्टीतील एक पानही त्याच्या सत्तेवाचून चालत-हालत नाही. म्हणून माणसाने, ह्या सृष्टीच्या सर्व

व्यवहारात भगवंताचे कर्तृत्व-भोक्तृत्व-अधिष्ठान मानले पाहिजे. माझे जीवन चालविणारी, तसेच सृष्टीचे अखंड व्यवहार चालविणारी शक्ती सर्वत्र विलसत आहे, हे समजणे व त्यानुसार वृत्ती होणे ही भक्तीची पहिली पायरी. असे झाले तरच वासना, अहंकार, अभिमान कमी होतील. परमात्मा ह्या नावाची जी शक्ती आहे ती ह्या विश्वात अमूर्त स्वरूपात असून तीच प्रकृतीची स्वामी आहे. ती वासनशून्य, अभिमानरहित आहे. साक्षीभूत स्वरूपात आहे, हा विश्वास दृढ होणे हीच भक्तीची सुरुवात. असा विश्वास ज्यांच्यात नसतो त्यांची गती, स्थिती कशी असते याचे वर्णन भगवंत पुढील श्लोकांत करीत आहेत -

**अवजानन्ति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितं ।**
**परं भावमजानन्तो मम भूतमहेश्वरम् ।।११।।**
**मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतसः ।**
**राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः ।।१२।।**

"सर्व भूतांचा मोठा ईश्वर असे जे माझे परमस्वरूप ते न जाणणारे मूढ लोक मनुष्यदेह धारण केलेल्या मला (मनुष्यदेहधारी समजून) अवमानितात." ।।११।।

"त्यांच्या आशा व्यर्थ, कर्मे फुकट, ज्ञान व्यर्थ आणि चित्त भ्रष्ट असून त्यांनी मोहात्मक राक्षसी व आसुरी स्वभावाचा आश्रय केलेला असतो." ।।१२।।

भगवंताला 'मानुषी', मनुष्यशरीरधारी समजून त्याची स्तुती, भजन केले म्हणजे भगवंत संतुष्ट होतो अशी धारणा आहे. अशा भगवंताची भीती बाळगून मग दानधर्म, सत्कृत्ये, यज्ञ-याग केले जातात. भगवंताला तत्त्वतः न जाणता, त्याचे श्रेष्ठतम स्वरूप न जाणता, त्याला आवडणारी भक्ती न करता जे जगतात त्यांचे जिणे व्यर्थ आहे. ज्ञानेश्वर माऊलींच्या शब्दांत -

**माझिये भक्तिवीण । जळो ते जियालेपण ।**
**अगा पृथ्वीवरी पाषाण । नसती काई ।।९.४३६।।**

भक्तीशिवाय जगणाऱ्यांची दशा ही आहे. काहींना भगवंताच्या श्रेष्ठ स्वरूपाचे अज्ञान असते तर काही समजून-उमजून अनादर, निंदा करतात. सर्वशक्तिमान, सर्वज्ञ, कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम् समर्थ अशा परमात्म्याची अवज्ञा केल्याने असे पुरुष श्रेयसापासून वंचित होतात, पुरुषार्थापासून भ्रष्ट होतात. महारथी कर्णाचे असेच झाले. पृथ्वीने रथचक्र गिळले होते आणि अर्जुनाने बाणांचा वर्षाव सुरू केला होता. पण प्रतिकार करण्यासाठी कर्णाला एकही अस्त्र स्फुरेना. कारण त्याने गुरूची अवज्ञा केली होती. शेवटी कर्णाचा अंत झाला. अशा अवज्ञा करणाऱ्याच्या इच्छा, आशा, कर्मे निष्फळ होतात.



इतकेच नव्हे तर ते विवेकभ्रष्ट लोक राक्षसी व आसुरी अशा मोहमय प्रकृतीला प्राप्त होतात. म्हणून भगवंत येथे आपणास मार्ग दाखवीत आहेत की, केवळ प्रकृतीचा आश्रय घेऊन भक्ती करणारा आसुरी वृत्तीने भक्ती करत असतो. अशांना शक्ती, संपत्ती, सत्ता प्राप्त होते. नाही असे नाही. पण अशा मिळालेल्या गोष्टींना दैवी सुगंध नसतो. असे वृथा भक्ती करणारेही भक्तच असतात. रावणही असाच महान भक्त होता.

या अध्यायात अर्जुनाचा प्रश्न नाही. केवळ भगवंत बोलत आहेत. भक्तिरसाचे अमृतपान या अध्यायातील अक्षरा-अक्षरांत ओतप्रोत भरले आहे. भगवंतांनी आपल्या लाडक्या भक्ताला–अर्जुनाला ही राजविद्या इथे प्रगट केली आहे. जे जे गुह्यतम, ते ते सर्व उघड करून दाखविले आहे. अर्जुनाच्या निमित्ताने आपणा सर्वांना हे ज्ञान प्रगट केले आहे. अर्जुन हा आपलाच प्रतिनिधी आहे. महाभारतातल्या अर्जुनाची जी अवस्था कुरुक्षेत्रावर झाली होती, तशीच अवस्था आज जीवनाच्या रणांगणावर आपली झाली आहे. आपणही तसेच मोहग्रस्त झालो आहोत. श्रेयस व प्रेयस, न्याय-अन्याय, नीती-अनीती, पाप-पुण्य यांतील सीमारेषा इतक्या पुसट झाल्या आहेत की त्यातील सत्य काय व असत्य काय याचेही ज्ञान आणि भान आपणांस राहिले नाही. म्हणूनच आज, कधी नव्हे इतकी गीतेच्या विचारांची आवश्यकता निर्माण झाली आहे. संत तुकाराम म्हणतात त्याप्रमाणे,

**"रात्रीदिवस आम्हां युद्धाचा प्रसंग ।**
**अंतर्बाह्य जग आणि मन ।।"**

देह तर कुरुक्षेत्रच झाले आहे. या कुरुक्षेत्राचे धर्मक्षेत्र करण्यासाठी अशा अमृतमय विचारांची नितांत गरज आहे. केवळ दही-हंडी फोडून व सुंठवडा सेवून किंवा कृष्णाची स्तवने गाऊन ही भगवंताला अभिप्रेत असलेली जन्माष्टमी साजरी होणार नाही. श्रीकृष्णाचा जन्म कोणत्या कारणांसाठी झाला, श्रीभगवंतांनी आपले कोणते गुण आचरणात आणून, आदर्श जीवन जगून दाखविले, याचा भक्तिपूर्ण अभ्यास करून आपल्या जीवनात ते दिव्य विचार आपण कितपत आणले, याचे आत्मपरीक्षण या ठिकाणी झाले पाहिजे. मनुष्य उत्सवप्रिय आहे. चौसष्ट कलांनी मंडित झालेल्या जीवनात भजन-कीर्तन, संगीत, नृत्य हे सर्व अत्यंत आवश्यक आहे. खरे म्हणजे संपूर्ण मानवी जीवन हे तीन-चतुर्थांश भाव-भावनांनी व एक-चतुर्थांश बुद्धी-विचारांनी भरलेले आहे. भगवंताचे स्वरूप प्रेममय आहे. नारदीय भक्तिसूत्रात भक्तीची व्याख्या 'भक्ती' म्हणजे 'प्रेम' अशीच केली आहे.

**सात्वस्मिन् परमप्रेरूपा । अमृतस्वरूपाच ।** (ना.म.सू.२,३)
भगवंत रसमय आहे.

**"रसो वै स" । रसं हयेवायं लब्ध्वाऽऽनन्दी भवति ।"**

(तैत्तिरीय उप. २.७)

अशा रसमय भगवंताची भक्ती करूनच आनंदप्राप्ती होते. माणूस एकटा रमू शकत नाही. भगवंतालाही एकाकीपण असह्य झाले म्हणून क्रीडेसाठी त्यांनी जगत्-निर्मिती केली. केवळ शुष्क ज्ञानाने बुद्धीची भूक भागेल, पण अंतःकरणात दिव्य प्रेमाचा साक्षात्कार होण्यासाठी चित्त द्रवले पाहिजे. असे चित्त जेव्हा द्रवीभूत होते आणि ते गोविंदाकारात स्थिर होते, तेव्हा त्याला भक्ती म्हणतात. श्रेष्ठ गीताभाष्यकार मधुसूदन सरस्वतींनी भक्तीची अशीच व्याख्या केली आहे -

**"द्रुते चित्ते प्रविष्टा या गोविंदाकारता स्थिरा सा भक्तिः ।"**

'मूर्तिमंत ज्ञान' म्हणून ज्यांच्याकडे पाहिले जाते त्या भगवान शंकराचार्यांनी 'भक्तिरेव गरीयसी' म्हणून या प्रेममय भक्तीचा आवर्जून उल्लेख केला, गौरव केला... कबीरासारख्या श्रेष्ठ संताने तर ज्ञानी पंडिताला केवळ याच रूपात पाहिले. ते म्हणतात,

**"पोथी पढ़ पढ़ जग मुआ,**
**पंडित भया न कोय ।**
**ढाई अक्षर प्रेम का,**
**पढ़े सो पंडित होय ।।"**

'प्रेम या ढाई (अडीच) अक्षरांमध्ये भक्तीचे सार - सर्वस्व दडले आहे. हे प्रेम अमृतमय आहे. आणि ते नवव्या अध्यायात भगवंतांनी हृदय ओतून व्यक्त केले आहे. हे सर्व सांगून अर्जुनाला द्वैत न मोडता भगवंतांनी आपणांसारखे केले आहे. ज्ञानेश्वर माऊलींनी या अवस्थेचे वर्णन अनुपम शब्दांत केले आहे.

**"हृदया हृदय येक जाले ।**
**ये हृदयीचे ते हृदयी घातले ।**
**द्वैत न मोडिता केले ।**
**आपणां ऐसे अर्जुन ।।"** (१८.१४२२)

या अध्यायात भक्त-भगवान हे द्वैतच राहिलेले नाही. भगवंतांनी आपल्या हृदयातील राजविद्या राजगुह्य अर्जुनाच्या हृदयी घातले आहे. सर्वस्व देऊन टाकले आहे. म्हणून हा अध्याय अमृतमय आहे असे सुरुवातीला मी म्हटले आहे.

'कृष्ण-जन्माष्टमी' व 'नववा अध्याय' या दुग्ध-शर्करायुक्त अशा प्रसंगी या प्रपंचमय जीवनातील दुसऱ्या अंगाचे इथे थोडे चिंतन करायचे आहे.



रसमय व प्रेममय भगवंताच्या भक्तीला गीतेच्या अमृतमय विचारांची जोड नसेल तर जीवनाला सुगंध प्राप्त होणार नाही. अर्थपूर्ण साफल्य प्राप्त करून घेण्यासाठी श्रीकृष्णाचे संपूर्ण जीवन हा आपला वस्तुपाठ किंवा आदर्श म्हणून आचरणात आणला पाहिजे. किंबहुना जीवनाचे अंतिम ध्येय तेच असले पाहिजे. श्रीकृष्णाचा जन्म, त्याचे बालपण, गोकुळ सोडून गेल्यानंतर पुन्हा आसक्ती न ठेवणे, मथुरेचे राज्य जिंकल्यानंतर त्याची अभिलाषा न धरता ते देऊन टाकणे, इंद्रपूजा सोडायला लावून गोवर्धनपूजा करावयास प्रवृत्त करणे... असे असंख्य प्रसंग मनुष्यदेहधारी भगवंताच्या जीवनात आले. प्रत्येक प्रसंगी आपल्यासारखेच मनुष्यजीवन जगावे लागले. जीवनाच्या सर्व दालनांना श्रीकृष्ण-जीवनाचा स्पर्श झाला आहे. श्रीराम हे मर्यादा-पुरुषोत्तम म्हणून तर श्रीकृष्ण हे पूर्णावतारी म्हणून अवतरित झाले. या त्यांच्या अवतीर्ण होण्याला काही अर्थ आहे. मनुष्यजातीला काही आदर्श घालून देण्यासाठी त्यांनी जन्म घेतला. कोणत्या गुणांनी, विचारांनी मानवी जीवन कृतार्थ होईल, त्याचा बोध त्यांनी प्रत्यक्ष आचरून दाखविला. श्रीकृष्ण जन्माष्टमीच्या निमित्ताने तो बोध आपल्या जीवनात आणला पाहिजे. श्रीमद्‌भागवतात हे सर्व साररूपाने एका दिव्य श्लोकात वर्णन केले आहे. तो श्लोक असा,

**"श्रवणं कीर्तनं ध्यानं हरेः अद्‌भुतकर्मणः ।**
**जन्म-कर्म-गुणानां च तदर्थेऽखिलचेष्टितम् ।।"** (भागवत ११/३/२७)

श्रीकृष्णाच्या अद्‌भुत लीलांचे श्रवण-कीर्तन-ध्यान अवश्य करावे. पण त्याचबरोबर त्याच्या जन्माचा हेतू, त्याने धारण केलेले गुण व त्यांनी केलेली अलौकिक कार्ये यांचा बोध घेऊन त्यासाठी आपण आपले संपूर्ण जीवन व्यतीत केले पाहिजे. तरच आपल्या जीवनाचे सार्थक होईल. असाच भक्त भगवंताला आवडतो. अशा श्रेष्ठ भक्ताचे वर्णन भगवान पुढील श्लोकात करत आहेत -

**महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः ।**
**भजन्त्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ।।१३।।**
**सततं कीर्तयन्तो मां यतन्तश्च दृढव्रताः ।**
**नमस्यन्तश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ।।१४।।**
**ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजन्तो मामुपासते ।**
**एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम् ।।१५।।**

"परंतु दैवी प्रकृतीचा आश्रय करून राहिलेले महात्मे हे पार्था! सर्व भूतांचे अव्यय आदिस्थान जो मी त्या मला ओळखून अनन्यभाव होत्साते माझे भजन करितात." ।।१३।।

"आणि यत्नशील, दृढव्रत आणि नित्य योगयुक्त होत्साते माझे सतत कीर्तन व वंदन करीत भक्तीने माझी उपासना चालवितात." ।।१४।।

"तसेच दुसरे कित्येक सर्वतोमुख जो मी त्या माझे एकत्वाने म्हणजे अभेदभावाने, पृथक्त्वाने म्हणजे भेदभावाने किंवा बहुप्रकारे ज्ञानयज्ञाने यजन करून उपासना करीत असतात." ।।१५।।

१३ व्या श्लोकात श्रेष्ठ, दुर्लभ भक्ताचे वर्णन आहे. ज्यांच्या भक्तीची बैठक पक्की असते अशा भक्तांचे हे वर्णन आहे. दैवी प्रकृतीचा आधार घेऊन 'अनन्यमनसा' ते भगवंताची आराधना करतात. अशा भक्तांनी द्वैत मोडलेले असते. मी उपासक व भगवंत उपास्य असा भेद राहिलेला नसतो. भगवंताशिवाय दुसरे काहीही नाही. हा दृढ भाव, संकल्प मनात असल्याने जीवनाच्या सर्व अवस्थांमध्ये केवळ त्याचेच स्मरण असते. सुख येवो अथवा दुःख येवो, कटु-गोड, भले-बुरे काहीही होवो, पण भगवंताचे चिंतन सुटत नाही. जे काही माझ्या वाट्याला आले आहे, तो त्या जगन्नियंत्याचा प्रसाद आहे, असे समजून सतत व अनन्यचित्त राहणारे भक्त 'मनुष्याणां सहस्रेषु' अथवा 'बहूनां जन्मनां अन्ते' असे दुर्मिळ असतात. भगवंताची सर्वव्यापकता, अव्ययत्व बुद्धीने समजून घेऊन ही संकल्पना मनात त्यांनी दृढ केलेली असते. माझे जीवन चालविणाराही तोच असल्याने व चराचर सृष्टीत तोच भरून राहिलेला असल्याने अशा भक्तांना सर्वत्र त्याचेच दर्शन घडत असते. सर्व भूतसृष्टीकडे ते 'आत्मौपम्य' दृष्टीने पाहत असतात.

अशा भक्तांची अवस्था कशी असते त्याचे वर्णन १४ व्या श्लोकात भगवंत करतात. असे जे भक्त असतात, ते सतत भगवंताशी जोडलेले असतात. संत रामदासांच्या भक्ताच्या व्याख्येत त्यांची गणना होते. खऱ्या अर्थाने ते भगवंताशी एकरूप झालेले असतात.

**भक्त म्हणजे विभक्त नव्हे । विभक्त म्हणजे भक्त नव्हे ।**
**विचारेविण काहीच नव्हे । समाधान ।।** - संत रामदास

ते अभक्तही नसतात व विभक्तही. विचारांनी व समर्पित भावनेने ते "सततं कीर्तयन्तो मां" असे असतात. भगवंताच्या नामघोषाने ते विश्वाची दुःखे नाहीशी करतात व सर्व जगच ब्रह्मसुखाने जिकडे-तिकडे कोंदून भरतात. कीर्तन-भजनाने व नामघोषाच्या माहात्म्याने संपूर्ण विश्व भावमय, प्रकाशमय करून टाकतात. अशा भगवंताशी एकरूप झालेल्या भक्तांचे वर्णन ज्ञानेश्वर माऊलींनी अत्यंत बहारदार असे केले आहे. वाचेपुढे, शुद्ध अंतःकरणाने भगवंताचे नाम नाचणे किती कठीण आहे याविषयी ते म्हणतात,



**जयांचे वाचेपुढे भोजे । नाम नाचत असे माझे ।**
**जें जन्मसहस्री वोळगिजे । एक वेळ मुखासी यावया ।।२०६।।**
**तो मी वैंकुठी नसे । एक वेळ भानुबिंबही न दिसे ।**
**वरी योगियांचीही मानसे । उमरडोनी जाय ।।२०७।।**
**परी तयापाशी पांडवा । मी हारपला गिवसावा ।**
**जेथ नामघोषु बरवा । करिती ते माझे ।।२०८।।**

"जे माझे नाम एक वेळ मुखात यावयास हजारो जन्म सेवा करावी लागते ते माझे नाम ज्यांच्या वाचेपुढे मोठ्या प्रेमाने नाचत असते तो एक वेळ मी वैकुंठात नसतो. एक वेळ सूर्यबिंबातही असत नाही. याशिवाय मी एक वेळ योग्यांची हृदये देखील उल्लंघन करून जातो, परंतु अशा रीतीने मी जरी हरवलो असलो तरीपण माझे भक्त जेथे माझा नामघोष चांगला करतात, त्याजपाशी अर्जुना, मला शोधावा (मी सापडायचाच). कीर्तनाचा, नामघोषाचा हा महिमा आहे. पण हे कीर्तन अहंकारशून्य, वासनारहित अशा अंतःकरणाने होते. चित्तशुद्धीनंतर झालेल्या नामघोषाचे हे वर्णन आहे. असे हे भक्त केवळ भगवंताची स्तुतीच करतात असे नव्हे, तर ते सतत प्रयत्नशील, दृढव्रत व नित्ययुक्त असे असतात. जीवनाच्या भिन्न-भिन्न अवस्थेत ते प्रयत्नशील असतात. भगवंताला प्रयत्न करणारे, निर्भय भक्त आवडतात, हे या श्लोकात आवर्जून सांगितले आहे. अभय किंवा निर्भयता हा दैवी गुणांत सर्वश्रेष्ठ मानला गेलेला गुण आहे. भगवंताचे सतत कीर्तन जेव्हा व्हायला लागते त्या वेळी ते शब्दांनीच करावे लागते असे नाही. भगवंताची स्तुती करण्यासाठी शब्दाचे माध्यम असमर्थ आहे. 'सतत कीर्तन' म्हणजे भगवंताच्या सृष्टीतील त्याच्या विभूतीकडे भावपूर्ण अंतःकरणाने पाहणे. आपल्या अंतःकरणातील प्रेमाचा झरा त्याच्या दिव्य प्रेमाने बरसला पाहिजे. सृष्टीतील प्रत्येक व्यापारात त्या प्रभूच्या कृपेचे दर्शन घडले पाहिजे. फुलणाऱ्या फुलांत, सूर्याच्या प्रकाशात, जीवनदायी जलात, अथांग पसरलेल्या निळ्याभोर आकाशात, मेघांच्या वर्षावात, हसणाऱ्या, डोलणाऱ्या पाना-फुलांत, बालकाच्या निरागस हास्यात, आईच्या वात्सल्यात, संत-महात्म्याच्या कृपा-प्रसादात, करुणेत, नीरव, शांत, प्रसन्न अंतःकरणात भगवंताच्या प्रेमाची धून अखंडपणे वाजली पाहिजे. एवढेच नव्हे तर यश-अपयश, प्रकाश-अंधार, शांती-अशांती, सुख-दुःख... अशा सर्व अवस्थेत भगवंताचे प्रेम, स्मरण अनुभविणे म्हणजे त्याचे "सतत कीर्तन". जीवन हा एक संग्राम आहे. सुखाचा आभास निर्माण झाला की भगवंत आठवत नाही. तसेच अतोनात दुःख भोगावे लागले की भगवंताच्या अस्तित्वाची शंका मनात घर करायला लागते. माणसाला सुखात सोनार आठवतो;

सुखाने हुरळून जातो व दुःखाने होरपळून जातो. अशा सर्व प्रसंगांत केवळ दृढव्रत असणारे प्रयत्नशील भक्तच सतत कीर्तन करू शकतात. १५ व्या श्लोकात दोन प्रकारच्या उपासनांचे वर्णन आले आहे. भगवंतांनी याचा निवाडाही येथे केला आहे. चौथ्या अध्यायात ज्ञानयज्ञच कसा श्रेष्ठ आहे, हे भगवंतांनी सांगितले. या ज्ञानाच्या सामर्थ्याने काही भक्त, मुंगीपासून ब्रह्मदेवापर्यंत सर्व ब्रह्मरूपच आहे, असे ऐक्यभावनेने समजून भगवंताचे भजन करतात. जसे अवयव निरनिराळे पण ते सर्व एकाच देहाचे, किरणे अनेक पण ती सर्व एकाच सूर्याची, दागिना जसा सोन्याहून वेगळा नाही किंवा घट जसा मातीहून वेगळा नाही त्याप्रमाणे जीवसुद्धा भगवंताचा अंश असल्याने तो भगवंताहून वेगळा नाही, असे समजून "ईशावास्यमिदं सर्वं..." या दृढ जाणिवेने असे भक्त भगवंताची उपासना करतात. सर्व वासुदेवमय आहे असे, एकत्वाने समजून नमस्कार करतात, तर कित्येक लोक पृथक्त्वाने नमस्कार करतात. भगवंताच्या अशा वेगवेगळ्या रूपांचे वर्णन दहाव्या अध्यायात विभूतियोगाच्या रूपाने येणार आहे. वास्तविक भगवंत सर्वत्र विलसत असल्याने ज्याला जशी उपासना करायची आहे, त्याने तशी करावी पण त्यात अभिनिवेश असू नये. नवव्या अध्यायात हेच सांगायचे आहे की सृष्टितत्त्व एकच आहे. उपासक, उपास्य, उपासना व उपासनाद्रव्यही तेच आहे. इतके अखंडत्व, एकत्व या ब्रह्मांडात भरले आहे. शैव ज्याला शिव समजतात, वैष्णव ज्याला विष्णू मानतात, वेदान्त ज्याला ब्रह्म समजतो, बौद्ध ज्याला बुद्ध मानतात, एवढेच नव्हे तर अल्ला, येशू, महावीर... अशा सर्वच रूपांमध्ये शेवटी तत्त्व एकच आहे. "एकं सत् विप्रा बहुधा वदन्ति" एकच सत्य विद्वान वेगवेगळ्या रूपांत बोलून दाखवितात. मराठीत 'पाणी', इंग्रजीमध्ये 'वॉटर' व संस्कृतमध्ये 'जल' म्हटले म्हणून पाण्याची मूलतत्त्वे, गुणतत्त्वे बदलत नाहीत. म्हणूनच ज्ञानेश्वर माऊलींना भगवंताचे 'विश्वात्मक' रूप अधिक भावले. त्यासाठी पसायदान मागितले ते याच विश्वात्मक देवाकडून. आता, भगवंतच पुढील श्लोकात आपण सर्वात्मे कसे आहोत, याचे वर्णन करणार आहेत.

गीतेतील प्रत्येक श्लोक हा मंत्रस्वरूप आहे. त्यातील गूढार्थ हा नित्यनवीन भासत असतो. जितक्या वेळा गीतेची पारायणे होतील तितक्या वेळा ती नित्यनूतन वाटते. प्रत्येक श्लोकाच्या अर्थाच्या निरनिराळ्या छटा प्रत्येक वेळी जाणवत असतात. भगवान श्री शंकराचार्यांपासून स्वाध्यायाचे प्रणेते प.पू.पांडुरंगशास्त्री यांच्यापर्यंत आजतागायत जवळजवळ ६०० विद्वानांनी गीतेवर भाष्ये लिहिली आहेत. केवळ भारतीय नाही तर जर्मन, इंग्लिश अशा



पाश्चिमात्य संस्कृत पंडितांनी गीतेवर प्रचंड भाष्ये केली आहेत. गीता हे सर्व उपनिषदांचेच नव्हे तर सर्व शास्त्रांचे सार आहे. एक गीता जर हातात आली तर इतर कोणताही शास्त्रग्रंथ वाचण्याची आवश्यकता नाही. कारण गीतेत मानवी जीवनाच्या सर्व प्रश्नांची उकल भगवंतांनी केली आहे. मनुष्यजीवनाच्या सर्व दालनांवर गीतेने प्रकाश पाडला आहे. म्हणूनच श्री वेदव्यासांनी महाभारतात गीतेचे वर्णन करताना म्हटले आहे की,

**गीता सुगीता कर्तव्या किमन्यैः शास्त्रविस्तरैः ।**
**या स्वयं पद्मनाभस्य मुखपद्माद्विनिःसृता ।।**

"गीता सुगीता करण्यास योग्य आहे म्हणजे श्रीगीतेचे चांगल्या रीतीने पठण, मनन करून तिचा अर्थ व भाव अंतःकरणात धारण करणे मुख्य कर्तव्य आहे. कारण ती प्रत्यक्ष श्री पद्मनाभ विष्णू-भगवंताच्या मुखकमलापासून निघालेली आहे. (मग जर असे असेल) तर अन्य शास्त्रविस्ताराचे प्रयोजन काय?"

१८ व्या अध्यायात, भक्ती म्हणजे या गीताविचारांचा प्रचार-प्रसार करणे, सश्रद्ध लोकांना भगवंताचे विचार सांगणे असा अर्थ केला आहे. असा जो भक्त आहे तो मला सर्वांत प्रिय आहे, हा भगवंताचा निर्वाळा आहे. हीच माझी खरी भक्ती आहे असे स्पष्ट मनोगत भगवंतांनी शेवटी व्यक्त केले आहे. अशा श्रेष्ठ जीवनग्रंथाचा अभ्यास, चिंतन, निवृत्तीनंतर किंवा शरीरगात्रे शिथिल झाल्यानंतर करायचा नसून प्रत्यक्ष जीवनसंग्रामात पदार्पण करावयाच्या वयातच 'गीता' हातात आली पाहिजे. जीवन हा संघर्ष आहे. इथे अंतर्बाह्य सतत युद्ध सुरू आहे. - हे करू की ते करू? हे योग्य की ते योग्य? याला पाप म्हणू की पुण्य?... अशा द्वंद्वात प्रत्येक क्षण आपण घालवीत असतो. अशा मोहाच्या क्षणी आपली भूमिका अर्जुनासारखी झालेली असते. गीतेतील अर्जुन ही आपलीच प्रतिमा आहे, प्रतिबिंब आहे, अशा विमनस्क, दिङ्मूढ, विषण्ण अवस्थेत गीता ही एकच संजीवनी आहे. गीतेचे अमृत प्राशन करून या भवसागरातून पार होता येते, हे अनेक श्रेष्ठ पुरुषांनी आचरून सिद्ध केले आहे. केवळ एका हिंदुधर्मियांचा हा ग्रंथ नसून तो अखिल मनुष्यमात्रासाठी आहे. गीतेचे विचार सार्वकालिक, सर्व वर्ण, धर्म, संप्रदाय, स्त्री-पुरुष... सर्वांसाठी आहेत. ज्याला ज्याला म्हणून उन्नत व्हायचे आहे, अशा सर्व मुमुक्षूंसाठी गीता आहे.

अशा गीतेबद्दल आपण बोलतो आहोत. त्यातही गीतेतील मध्यावर असलेल्या नवव्या अध्यायाची चर्चा १५ श्लोकांत पाहिली आहे. आता पुढील श्लोक -

**अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाहमहमौषधम् ।**
**मंत्रोऽहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतम् ।।१६।।**
**पिताहमस्य जगतो माता धाता पितामहः ।**
**वेद्यं पवित्रमोंकार ऋक्साम यजुरेव च ।।१७।।**
**गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत् ।**
**प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम् ।।१८।।**
**तमाम्यहमहं वर्षं निगृह्णाम्युत्सृजामि च ।**
**अमृतं चैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन ।।१९।।**

''क्रतु म्हणजे श्रौत यज्ञ म्हणजे मी; यज्ञ म्हणजे स्मार्त यज्ञ मी; स्वधा म्हणजे श्राद्धांत पितरांस अर्पण केलेले अन्न मी; औषध म्हणजे वनस्पतीपासून (यज्ञार्थ) उत्पन्न झालेले अन्न मी; (यज्ञात हवन करताना म्हणतात) ते मंत्र मी; तूप मी; अग्नी मी; आणि (अग्नीत टाकलेल्या) आहुती मीच.'' ।।१६।।

''या जगताचा पिता, माता, धाता (आधार), पितामह (आजोबा) मी; जे काय ज्ञेय किंवा जे काही पवित्र आहे ते आणि ओंकार, ऋग्वेद, सामवेद व यजुर्वेद मी.'' ।।१७।।

''(सर्वांची) गती, (सर्वांचा) पोषक, प्रभू, साक्षी, निवास, शरण, सखा, उत्पत्ती, प्रलय, स्थिती, निधान आणि अव्यय बीजही मी.'' ।।१८।।

''मी ऊन पाडतो, मी पाऊस आखडतो आणि सोडतो. अमृत व मृत्यू, (तसेच) सत् आणि असत्ही हे अर्जुना! मी आहे.'' ।।१९।।

यापुढील १०,११,१३... अशा अध्यायांत याचसारखे वर्णन पुन्हा येणार आहे. भगवंत आपल्या विविध विभूती १० व्या अध्यायात सांगणार आहेत. पण वरील चार श्लोकांत भगवंतांनी आपल्या भूमिका विशद केल्या आहेत. हे सर्व जग दिसते त्याचा नियामक कोण? कोण हे सर्व चालवितो? सर्वव्यापी, सर्वसाक्षी, सर्वज्ञ, सर्वभूतात्मभूतात्मा, भगवंत चराचरांत व्यापून राहिला आहे. भगवंत या श्लोकात आपला व भूतमात्राचा संबंध दाखवीत आहेत. यज्ञ मीच; मीच तो करवितो, माझ्याच शक्तीने हे सर्व घडते. पदार्थही मीच, क्रियाही मीच, संकल्पही माझेच, कृती, उक्ती, परिणाम सर्वही मीच. उपासनेतील उपासक, उपास्य, उपासना व उपासनाद्रव्ये मीच आहे. या सर्व श्लोकांतून एक महान सिद्धान्त व्यक्त झाला आहे. भगवंताला कुठे शोधशील? एका विशिष्ट लोकांत भगवंताचे निवासस्थान आहे आणि तिथे गेल्यानंतरच तो भेटेल असे कुठेही ठिकाण नाही. जिथे असशील तिथे त्याला प्राप्त करशील. अंशरूपाने सर्व भूतमात्रांच्या हृदयात जसा त्याचा निवास आहे तसा सृष्टीच्या कणाकणांत, पानापानांत, सर्व पंचमहाभूतांत तो दडलेला आहे. तीच आई



आहे, पिताही तोच, पितामहही तोच. धाता म्हणजे धारण करणारा जसा आहे तसा पालन करणाराही आहे. 'पितामह' म्हणून आपल्या निरपेक्ष प्रेमाचे, अतूट संबंधाचे नातेसुद्धा यात भगवंतांनी सांगितले आहे. पण 'आईची' भूमिका स्वतः भगवंतांनी सांगून करुणासागर, कृपासागर, दया, क्षमा, शांती यांची मूर्ती हे नामाभिधान सार्थ ठरविले आहे. आपण नेहमी प्रार्थनेत ''त्वमेव माता च पिता त्वमेव...'' हे म्हणत असतोच. पण आपला भाव बालकाचा असतोच असे नाही. पण संत-महात्म्यांना भगवंताचे हे रूप अत्यंत विलोभनीय, मधुर, रसपूर्ण वाटते. म्हणून भगवान शंकराचार्यांनीसुद्धा प्रार्थना करताना 'आई' म्हणूनच हाक घातली. शंकराचार्यांनी आईचे दयामय, करुणापूर्ण रूप पाहिले व म्हणाले,

**मत्समः पातकी नास्ति पापघ्नी त्वत्समा न हि ।**
**एवं ज्ञात्वा महादेवि यथा योग्यं तथा कुरु ।।**

शंकराचार्यांनी आईची थोरवी गाताना एकदा म्हटले,

**कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवती ।।**

महाराष्ट्रातील संत शिरोमणी भगवान ज्ञानेश्वर, जगद्गुरू श्री तुकाराम महाराज अशा संतांनी पांडुरंगाला आईच्या रूपातच पाहिले. 'विठाई माऊली माझी' म्हणूनच साद घातली. ''कांदा मुळा भाजी । अवघी विठाई माझी,'' असे सावतामाळी म्हणून गेले. रामकृष्ण परमहंसांनी जगद्जननीला 'आई' म्हणून हाक मारली. संत तुकारामांना जसे भगवंताचे रूप वाटले, तसेच गुजरातच्या नरसी मेहतांसारख्या संतश्रेष्ठाला वाटले. तुकाराम म्हणतात-

**जेथे जातो तेथे । तू माझा सांगाती ।**
**चालविसी हाती धरोनिया ।।**
**चालो वाटे आम्ही तुझाचि आधार ।**
**चालविसी भार सवे माझा ।।**

आई जशी मुलाला सांभाळते तसाच भगवंत आपल्याला सांभाळतो. तर नरसी मेहतांना हे रूप जळी स्थळी दिसते. ते म्हणतात -

**आसपास आकाशमां अंतरमा आभास ।**
**घास-चासनी पास पण विश्वपातिनो वास ।।**

या जगात जाणायला योग्य जर कोणी असेल तर तो भगवंतच! जे काही पवित्र असेल ते केवळ भगवत् तत्त्व. आत असलेले सत्तत्त्व तेच अंतिम पावित्र्य. म्हणून भागवतातील पहिल्या स्कंधाच्या मंगलचरणामध्ये राम, कृष्ण अशा सगुण रूपाची पूजा, ध्यान न करता ''सत्यं परं धीमहि'' असे भगवंताचे रूप व्यासांनी ध्यानासाठी ठेवले आहे. जे अंतिम सत्य

(Absolute truth) व जे एकमेव श्रेष्ठ (परं) आहे त्याचे ध्यान म्हणजे भगवंताचे ध्यान... ब्रह्मरूपी बीजाला फुटलेला जो अंकुर व घोष (परा, पश्यन्ती, मध्यमा, वैखरी यांचे मंदिर) असा जो ओंकार तो मी आहे, असे भगवंत म्हणतात. भगवान स्वतःच स्वतःला ओंकार म्हणत आहेत. भगवंताजवळ नेणारे वेद, हे भगवंताचे रूप आहे. वेद म्हणजे ज्ञान! विचार!! प्रभूशी संबंध जोडणारे व भगवंताच्या स्वरूपाचे ज्ञान घडविणारे व जीवाशिवाची भेट घडविणारे वेद ही माझी विभूती आहे, असे भगवंत सांगतात.

१८ व्या श्लोकात आपल्या अलौकिक रूपाचे भगवंत वर्णन करीत आहेत. या त्रैलोक्याचा धनी मीच, जगाचा सर्वशक्तिमान मालक मीच, ज्याच्या शक्तीने प्रकृती, माया प्रगट होते व शेवटी लय पावते ती शक्ती, परमगती मीच, शरण आलेल्यांना शरण येण्यास योग्य असा मीच एक आहे, संकल्पाच्या योगाने सर्वांची उत्पत्ती होते व नंतर सर्व संकल्पातच नाहीसे होते. याप्रमाणे जगाचे मूळ बीज जो संकल्प, तो जगाच्या कल्पाच्या अंती ज्या ठिकाणी राहतो ते स्थान मीच आहे. जेव्हा हा सर्व जगदाकार नाहीसा होतो, त्या वेळी वासनारूप संकल्पाचे संस्कार हे पुन्हा जगदाकार रचण्याकरिता जेथे अमर होऊन असतात, ते ठिकाण मी आहे. भगवान भर्ता म्हणजे भरण-पोषण करणारा आहे. आपल्या वृत्तीचे पोषणही भगवान करतो. 'भर्ता' शब्दाचा अर्थ खूप व्यापक आहे. ज्याच्यामुळे जीवन सुखदायक होते व जो अंतिम कल्याण करणारा आहे तो भर्ता!! भगवंत प्रभू आहे. प्रभू म्हणजे स्वामी. तो आपल्या जीवनाचा खरा स्वामी आहे. आपले निजस्वरूप आहे. आपल्या कर्माचा साक्षी आहे. आपले खरे धाम आहे. **''यद् गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ।''** जिथे गेल्यावर जन्म-मरणाचे फेरे चुकतात व जेथून परत यायचे नसते ते खरे आपले घर! जिथे माणूस आपला 'अहं-कामना-वासना' सोडू शकतो असा उत्कर्ष करण्यास योग्य असे ठिकाण म्हणजे भगवंताचे घर. पापाची कबुली देण्याची, जिथे शरण येऊ अशी जागा म्हणजे प्रभूचे निवासस्थान. 'निधानं' म्हणजे भांडार. प्रेमाचे खरे भांडार मीच आहे. शुद्ध प्रेम भगवंताशिवाय दुसऱ्या कोणत्या ठिकाणी करणार?

१९ व्या श्लोकात भगवंत म्हणत आहेत की, मी सूर्याच्या रूपाने प्रकाशतो. मागाहून मीच इंद्र बनून पाऊस पाडतो. अग्नी लाकडे खातो तेव्हा लाकडेच अग्नी बनतात, त्याप्रमाणे मरणारे, मारणारे हे दोन्ही माझी स्वरूपे आहेत. विनाशी, अविनाशी म्हणून जे पदार्थ आहेत ते मीच आहे. पण सर्व भूतमात्र मद्रूप असूनदेखील आपण भगवद्रूप आहोत असे वाटत नाही, हेच मोठे आश्चर्य आहे. हे सर्व जग आत-बाहेर माझ्याच रूपाने कोंदून भरले आहे.



आत हरी, बाहेर हरी अशी अवस्था असताना माणूस मात्र भगवंताचा पत्ता शोधत व्यर्थ कालक्रमणा करीत असतो. सत्, असत् सर्व मीच आहे. असत् म्हणजे परिवर्तनशील जग व सत् म्हणजे ज्यात परिवर्तन होत नाही असे नित्य तत्त्व.

नवव्या अध्यायातील वरील श्लोकात भक्तीचे एक महान तत्त्व भगवंतांनी सांगितले आहे. परमेश्वर चराचरात व्यापून राहिला आहे. सर्व भूतमात्र ही त्याचीच रूपे आहेत. माणसा-माणसाच्या हृदयात रामाला पाहणे हीच खरी भक्ती! जी जी गोष्ट आपण करू त्याचा 'कामा'शी संबंध न जोडता 'रामा'शी संबंध जोडणे हीच भक्ती. आपला कातडीसारखा चिकटलेला अहंकार भगवंताला अर्पण करून चराचरात भरलेल्या ईश्वराचे दर्शन घेणे म्हणजे भगवंताशी जोडले जाणे. चार श्लोकांतील हा अन्वयार्थ आहे. जोपर्यंत निष्कामता येत नाही, तोपर्यंत भगवंताच्या समीप जाता येणार नाही, हे सांगण्यासाठी भगवंत म्हणतात -

**त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयन्ते ।**
**ते पुण्यमासाद्य सुरेंद्रलोकमश्नन्ति दिव्यान्दिवि देवभोगान् ।।२०।।**
**ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति ।**
**एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभन्ते ।।२१।।**

''त्रैविद्य म्हणजे ऋग्वेद, सामवेद, यजुर्वेद या तीन वेदांतील कर्मे करणारे जे सोमपी व निष्पाप पुरुष माझे यज्ञाने पूजन करून स्वर्गलोक प्राप्तीची इच्छा करतात, ते इंद्राच्या पुण्यलोकास पोचून स्वर्गात देवांचे अनेक दिव्यभोग उपभोगतात.'' ।।२०।

''आणि त्या विशाल स्वर्गलोकाचा उपभोग घेऊन पुण्याचा क्षय झाल्यावर ते (पुन्हा जन्म घेऊन) मृत्युलोकी येतात. अशा प्रकारे त्रयी धर्म आणि तीन वेदांतील यज्ञयागादि श्रौत धर्म पाळणाऱ्या व काम्य उपभोगाची इच्छा ठेवणाऱ्या लोकांस (स्वर्गाच्या) येरझाऱ्या प्राप्त होतात.'' ।।२१।।

भगवंताचे खरे स्वरूप सच्चिदानंद आहे. त्रिकालाबाधित आनंद हे भगवंताचे स्वरूप आहे. या स्वरूपाचा ध्यास न घेता काम्य कर्मांचा आश्रय करून, जे यज्ञयाग करतात त्यांच्या वाट्याला स्वर्गातील सुखोपभोग जरूर येतात. पण ते अक्षय आनंद देणारे नसतात. शुद्ध बुद्धीचे ज्ञानी लोक या स्वर्गाच्या आडवाटा स्वीकारीत नाहीत. पण जे केवळ स्वतःच्या सुखोपभोगासाठी, ऐश्वर्यप्राप्तीसाठी साधना करतात अशा लोकांना भगवंतांनी 'पूतपापाः' म्हटले आहे. पुण्याचा साठा जोपर्यंत आहे तोपर्यंत भोग भोगायचे व साठा संपला की पुन्हा जन्म-मरणाच्या फेऱ्यांत अडकायचे. खिशात जोपर्यंत डॉलर आहेत

तोपर्यंत परदेश सुखाचा वाटतो. पण पैसे संपले की काही क्षणसुद्धा तिथे राहता येत नाही. पुण्यक्षय झाला की पुन्हा आहे ती स्थिती. खरे म्हणजे स्वर्ग, नरक या संकल्पना याच जीवनातील होत. मोक्षाचे गाठोडे कोठून कोणी आणून देत नाही. मोक्ष ही याच देही, याच लोकी प्राप्त होणारी गोष्ट आहे. पाप-पुण्य, वासना, अहंकार यामुळे मिळणारी सुखदुःखे इथेच भोगायची आहेत. जोपर्यंत निष्कामता येत नाही, तोपर्यंत भक्तीतील अनिर्वचनीय आनंदाचा लाभ होत नाही. विषयोपभोगांमुळे इंद्रियांची तृप्ती होत नाही, हा आध्यात्मिक सिद्धांत आहे. वस्तूतून सुख मिळते पण ते अक्षय्य नसणारे. ज्ञानी भक्त आत्मसुखाची अभिलाषा करतात व जे आत्मानंदात रममाण होतात ते भोगविषयात रमत नाहीत. आत्मलाभाशिवाय भगवंतसुख मिळत नाही. चित्तशुद्धीशिवाय आत्मानंद नाही. म्हणून जोपर्यंत वासना-अहंकार चित्तात आहेत, तोपर्यंत मर्यादित सुखोपभोग वाट्याला येतात. जोपर्यंत श्वास आहे, तोपर्यंत 'अहं' चिकटून राहणार. इंद्रिये विद्वानांनासुद्धा छळणार. मन-बुद्धी विकारांची सोबत करणार. मग निष्काम भक्तीचा मार्ग साधायचा कसा? यासाठी भगवंत स्वतःच मार्ग दाखवीत आहेत. ते म्हणतात -

**अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते ।**
**तेषां नित्याभियुक्तांना योगक्षेमं वहाम्यहं ।।२२।।**

"जे अनन्यनिष्ठ लोक माझे चिंतन करून मला भजतात त्या नित्य, योगयुक्त पुरुषांचा योगक्षेम मी चालवीत असतो." ।।२२।।

या श्लोकात भगवंत प्रत्यक्ष आश्वासन देत आहेत. माणसाला केवढा मोठा दिलासा या श्लोकातून मिळाला आहे. हा श्लोक म्हणजे चिंतामणी आहे, अमृततुल्य नव्हे तर प्रत्यक्ष अमृतच आहे. या दिव्य श्लोकात भगवंत अलौकिक असे तत्त्वज्ञान सांगत आहेत. ब्रह्मांडनायकाचे हे भक्तांना अभिवचन आहे. इच्छा-वासना-कामोपभोग-काम-क्रोध-लोभ-अहंकार... असे सर्व सोडून जेव्हा तू माझ्याकडे येशील त्या वेळी तुझा योगक्षेम मी चालवीन, अशी भगवंताची ग्वाही आहे. श्री एकनाथांकडे श्रीखंड्या होऊन त्याने काम केले.

**श्रीएकनाथसदनी माधवजी सर्व काम हे करितो ।**
**स्वकरे चंदन घाशी गंगेचे पाणी कावडी भरितो ।।**

रामकृष्ण परमहंसांच्या हाकेला 'आईने' साद दिली. विवेकानंदांना 'विवेक दे - वैराग्य दे - ज्ञान दे' असा बोध घडवायला बळ दिले. जनाबाईचे दळण दळले. संतश्रेष्ठ नामदेवाचा हट्ट पुरविला. प्रल्हादाचे रक्षण केले. भक्ताच्या हाकेला धावून आल्याच्या कथा, दृष्टान्त यांनी आपली पुराणे भरली आहेत. त्या सर्व कथांमागील तत्त्व हे आहे की, अनन्यचित्त होऊन भगवंताची आराधना



जो करतो त्याच्या ऐहिक-पारलौकिक कल्याणाची जबाबदारी भगवंत स्वीकारतो. 'श्रीकृष्णः शरणं मम' अशी अवस्था मात्र असली पाहिजे. भगवान शंकराचार्यांनी अशी अनन्यभक्ती केली. ते जे काही कर्म करायचे ती त्यांची भक्तीच असायची. "यद्यद् कर्म करोमि तत्तदखिलं शंभो तवाराधनम् ।" ही अवस्था शंकराचार्यांची होती. जो सतत भगवंताशी जोडला गेला आहे तो भक्त. असा भक्त केवळ भगवंतालाच शरण जातो. अशा भक्तांविषयी श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणतात -

**तैसा मीवाचूनि काही । आणिक गोमटेचि नाही ।**
**मजचि नाम पाही । जिणेया ठेविले ।।३३६।।**
**ऐसे अनन्यगतिके चित्ते । चिंतिसताते माते ।**
**जे उपासिती तयांते । मीचि सेवी ।।३३७।।**
**हा योगक्षेमु आघवा । तयांचा मजचि पडिला पांडवा ।**
**जयांचिया सर्वभावा । आश्रयो मी ।।३४३।।**

"त्याप्रमाणे माझ्याशिवाय दुसरे काही ज्यांना चांगलेच वाटत नाही आणि पाहा, ज्यांनी आपल्या जगण्यास माझेच नाव ठेवले आहे. याप्रमाणे एकनिष्ठ चित्ताने माझे चिंतन करीत असता जे माझी उपासना करतात, त्यांची सेवा मीच करतो." ।।३३६-३३७।।

"ज्यांच्या सर्व वृत्तींना मीच एक आश्रय आहे, त्यांच्या ह्या योगक्षेमाचा सर्व भार अर्जुना, माझ्यावर येऊन पडतो." ।।३४३।।

असा सुंदर श्लोक आहे. सकामातून निष्कामतेकडे गेल्याशिवाय ही अवस्था अप्राप्य आहे. जीवनात इतरही गोष्टी मला पाहिजेत तसाच ईश्वरही हवा अशा अनेक चित्तविभ्रान्त झालेल्या भक्ताला हे आश्वासन मिळणार नाही.

गीतेतील नववा अध्याय हा केवळ भक्तांनाच नव्हे तर सर्व जीवांना आश्वासनरूप आहे. भगवंतांनी सर्वांना सहज-सुलभ असा भक्तीचा राजमार्ग यात दाखविला आहे. या अध्यायातील प्रत्येक श्लोक हा एक जीवनमंत्रच आहे. जीवन अमृतमय करण्याचे सामर्थ्य गीता-विचारात आहे. गीतेच्या मध्यावर असलेल्या या अध्यायात भगवंतांनी अनेक गुह्य गोष्टी सांगून साधकांना दिलासा दिला आहे. आपल्या भारतातील आयुर्विमा महामंडळाने या २२ व्या श्लोकातील शेवटचे दोन शब्द "योगक्षेमं वहाम्यहं" आपले ब्रीदवाक्य म्हणून स्वीकारले आहे. "अनन्यनिष्ठ, नित्य योगयुक्त पुरुषांचा योगक्षेम मी चालवीत असतो"; "कोणतेही चांगले, कल्याणप्रद केलेले कृत्य कधीही वाया जात नाही;" "माझा कोणताही भक्त नाश पावत नाही". ... अशी अनेक आश्वासने भगवंतांनी दिलेली आहेत. संसारी माणसांना

या लौकिक जगात जगताना, ही आश्वासने उभारी देणारी आहेत. कारण ती विश्वाच्या पालनकर्त्याने स्वशब्दांत सांगितलेली आहेत. संसारात किती भोग भोगले, तरी सुखाची अतृप्ती ही राहणारच. जोपर्यंत जीव किंवा अंश, अंशीकडे जाण्यासाठी उद्युक्त होणार नाही, तोपर्यंत त्याला खरे सुख लाभणार नाही. नदी जोपर्यंत सागराला मिळत नाही, तोपर्यंत ती अपुरीच राहते. लहान मूल आईच्या कुशीत असते, तेव्हाच ते निवांत असते. नववा अध्याय म्हणजे वात्सल्यरूपी आईने भक्तरूपी बालकाला आत्यंतिक प्रेमाने पाजलेले अमृतमय दुग्धपान आहे.

आता पुढील श्लोकांत, अनेक देवतांची उपासना करणाऱ्यास काय फळ मिळते, हे श्रीकृष्ण अर्जुनास विशद करीत आहेत.

**येऽप्यन्यदेवता भक्ता यजन्ते श्रद्धयान्विताः ।**
**तेऽपि मामेव कौंतेय यजन्त्यविधिपूर्वकम् ।।२३।।**
**अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च ।**
**न तु मामभिजानन्ति तत्त्वेनातश्च्यवन्ति ते ।।२४।।**
**यान्ति देवव्रता देवान् पितृन्यान्ति पितृव्रताः ।**
**भूतानि यान्ति भूतेज्या यान्ति मद्याजिनोऽपि माम् ।।२५।।**

"श्रद्धेने युक्त होत्साते दुसऱ्या देवतांचे भक्त बनून जे यजन करतात, तेही हे कौंतेया! विधिपूर्वक नसले तरी (पर्यायाने) माझेच यजन करतात." ।।२३।।

"कारण सर्व यज्ञांचा भोक्ता व स्वामी मीच आहे. पण त्यांना माझे तत्त्वतः ज्ञान नाही, म्हणून ते घसरत असतात." ।।२४।।

"देवांचे व्रत करणारे देवांस, पितरांचे व्रत करणारे पितरांस, (निरनिराळ्या) भूतांची पूजा करणारे (त्या त्या) भूतास, आणि माझे यजन करणारे मला येऊन पोचतात." ।।२५।।

भगवंताची अनन्यभावाने भक्ती करणाऱ्यासच खरी भगवत्प्राप्ती होते. भौतिक फलप्राप्तीसाठी अन्य देव-देवतांची उपासना करणाऱ्यांना फक्त भौतिक फळ मिळते. वेगवेगळ्या काम-कामना, इच्छा-आशा-आकांक्षा ह्यांनी भरलेले लोक वेगवेगळ्या देव-देवतांचे पूजन करतात. खरे म्हणजे हे सर्व पूजनसुद्धा परमेश्वरालाच पोचते, कारण चराचर ब्रह्मांडात तोच भरून राहिला आहे. परंतु अशा कामनामयी भक्तीमुळे भक्तांचा आंतरिक विकास मात्र होत नाही. त्यांना भगवंताची प्राप्ती होत नाही. देव देवत्व, पितर पितृत्व व भूते भूतत्व देऊ शकतात. जो परमेश्वराचे चिंतन करील फक्त तोच परमेश्वर-स्वरूप बनू शकेल. जे लोक जशी भक्ती करतात त्यांना तसेच व तेवढेच



फळ मी देतो, याचे स्पष्टीकरण चौथ्या अध्यायात झालेच आहे. (ये यथा मां प्रपद्यन्ते... - श्लोक ११) मग प्रश्न असा निर्माण होतो की, त्या पुरुषोत्तमाची भक्ती करायची कशी? विश्व निर्माण करणाऱ्याला आपण नेमके काय द्यायचे? जो गुणातीत आहे, आणि तसेच सर्वऐश्वर्यसंपन्न आहे, अनिर्वचनीय आहे, ज्याच्या गुणांचा अंत लागत नाही, त्याची कोणत्या शब्दांत स्तुती करायची? भजने गायची? स्तवन-कीर्तन करायचे? कोणता प्रसाद अर्पण करायचा? अशा सर्व प्रश्नांचे उत्तर देताना भगवंत सांगतात -

**पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति ।**
**तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः ।।२६।।**
**यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।**
**यत्तपस्यसि कौंतेय तत्कुरुष्व मदर्पणम् ।।२७।।**
**शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबंधनैः ।**
**संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि ।।२८।।**
**समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः ।**
**ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ।।२९।।**

"एखादे पान, फूल, फळ किंवा (यथाशक्ती) थोडे पाणीही जो मला भक्तीने अर्पण करतो त्या नियतचित्त पुरुषाची ती भक्तीची भेट मी (आनंदाने) सेवन करतो." ।।२६।।

"हे कौंतेया! तू जे करतोस, जे खातोस, जे हवन करतोस, जे दान करतोस, जे तप करतोस, ते (सर्व) मला अर्पण करीत जा." ।।२७।।

"अशा प्रकारे वागल्याने (कर्मे करूनही) कर्माची शुभाशुभ फळरूप जी बंधने त्यापासून तुझी सुटका होईल व (कर्मफळांचा) संन्यास करण्याचा जो हा योग त्याने युक्तात्मा म्हणजे शुद्धान्तःकरण आणि मुक्त होत्साता मला येऊन पोचशील." ।।२८।।

"मी सर्व भूतांना सारखा आहे. मला (अमुक एक) नावडता आणि (अमुक) प्रिय असे नाही, तरी जे माझे भक्तीने भजन करतात ते माझ्या ठायी आणि मीही त्यांच्या ठायी असतो." ।।२९।।

हे श्लोक भगवंताचे मनोगत व्यक्त करणारे आहेत. गुह्यातले गुह्य यात दडले आहे, भक्तीचे वर्म इथे सांगितले आहे. "मला नेमकी कोणती भक्ती आवडते, काय अर्पण केले असता मी प्रसन्न होतो," याचे हे वर्णन आहे. अशी भगवंताला आवडणारी भक्ती जीवनात आली तरच भक्ताचे आंतरिक जीवन विकसित होते. भगवंताची सर्वव्यापकता सर्वार्थाने समजली की विश्वाकडे पाहण्याची दृष्टीही बदलते. आत्मौपम्यता आल्यामुळे द्वेषाची भावना राहत

नाही, भीती पळून जाते व हे प्रेममय भाव आल्यामुळे जीवन सुगंधित होते. असे सुंदर झालेले जीवनच कृतार्थ होते. अशी वृत्ती होणे हीच खरी भक्ती!

ज्ञानेश्वर माऊलींनी २६ व्या श्लोकावरचे निरूपण करताना भगवंताला आवडणारी 'भक्ती' नेमक्या शब्दांत सांगितली आहे. ते म्हणतात,

**पैं भक्ति एकी मी जाणे । तेथ साने थोर न म्हणे ।**
**आम्ही भावाचे पाहुणे । भलतेया ।।३९५।।**
**येर पत्र पुष्प फळ । ते भजावया मिस केवळ ।**
**वांचूनि आमुचा लाग निष्फळ । भक्तितत्त्व ।।३९६।।**

"मी एक भक्तीच ओळखतो. मग त्या ठिकाणी लहानथोर अशी निवड करीत नाही. आम्ही वाटेल त्याच्या भक्तिरूपी मेजवानीचे पाहुणे होतो. बाकी पान, फूल, फळ यांचे अर्पण करणे, ते मला भजण्याचे केवळ निमित्त आहे. वास्तविक पाहिले तर आम्हांला आवडते ते भक्तांच्या ठिकाणी असलेले शुद्ध भक्तितत्त्वच होय."

भगवंताला भक्ताचा भाव आवडतो. त्याने काय अर्पण केले, हे केवळ गौण आहे. ज्याने हे सर्वच निर्माण केले आहे, त्याला त्याचीच वस्तू अर्पण करण्यात कोणती विशेष गोष्ट आहे? म्हणून ईश्वर भावाचा भुकेला आहे. श्रीकृष्णाने, सुदाम्याने आणलेल्या पोह्यांच्या पुरचुंडीच्या गाठी स्वहस्ताने सोडल्या. विश्वाचे सारे वैभव हातात मिळाल्यासारखे त्याला वाटले. कारण त्या पोह्यांत सुदाम्याची भक्ती, प्रेम, भाव दाटला होता. त्यामुळेच विश्वकर्त्याला आनंदित करून सोडण्याचे सामर्थ्य एवढ्याशा पोह्यांत होते. पुंडलिकाचा भाव पाहूनच त्याने टाकलेल्या विटेवर परब्रह्म युगानुयुगे उभे राहिले. भक्तीत भाव, प्रेम नसेल तर सारे व्यर्थ आहे. भक्ती म्हणजे केवळ कर्मकांड नाही. षोडशोपचारांनी पूजा करताना जर त्यात भाव नसेल तर ती केवळ कृती होईल, भगवान शंकराला बेलाची पाने अर्पण करतो ते त्रिदल असते. त्रिदल म्हणजे 'सत्त्व, रज, तम' - युक्त असे जे माझे जीवन आहे, ते मी तुला अर्पण करतो', हा भाव त्यात असला पाहिजे. कारण या त्रिगुणांच्या पलीकडे गेल्याशिवाय भक्तीची खुमारी येत नाही. 'फलम्' म्हणजे फळ! त्यानेच निर्माण केलेल्या वृक्षांची फळे त्याला अर्पण करणे हा झाला उपचार. पण भगवंताला आपल्या कर्माची फळे अर्पण करणे ही झाली भक्ती! पत्र, पुष्प,फळ झाल्यानंतर 'तोयं'! तोय म्हणजे जल..., जल म्हणजे रस...; जोपर्यंत जीवन रसमय आहे, रसरशीत, चैतन्ययुक्त आहे तोपर्यंतच ते भगवंताला अर्पण केले पाहिजे. साठीनंतर इंद्रिये शिथिल होतात, काम देईनाशी होतात. त्या वेळी गीता, ज्ञानेश्वरी वाचून भक्तीची सुरुवात करणाऱ्या महाभागांना भक्ती कशी कळणार?



चुरगळून पडलेले, निष्प्राण झालेले रस, गंधहीन फूल कोणाला आवडेल का? उसात जोपर्यंत रस आहे, तोपर्यंत तो हातात सारखा घ्यावा वाटतो. पाणी धो धो आवाज करीत वाहते, तेव्हा ते स्फटिकासारखे स्वच्छ असते. म्हणून सारखे प्यावे वाटते. ताजे टवटवीत सुगंधित फूल हातात घ्यावेसे वाटते. तारुण्यातला उत्साह, जोश, ध्येयनिष्ठा, दुर्दम्य इच्छा-आकांक्षा यांचे कौतुक वाटते तसे भगवंताला भक्ताचे रसमय जीवन आवडते. कारण 'रसोऽहमप्सु कौन्तेय'... (श्लोक ७.८) असे स्वतः भगवंतांनी म्हटले आहे.

२७ व्या श्लोकात भगवंतांनी, अशा रसमय भक्ताच्या जीवनातील कर्मांची मागणी केली आहे. तू जे जे करशील ते ते सर्व मला अर्पण कर, अशी भगवंताची मागणी आहे. वास्तविक 'मी' करतो, 'मी' भोगतो, 'मी' कर्ता, 'माझ्यामुळे' हे सर्व घडते आहे, ही कर्तृत्व व भोक्तृत्व यांची भावनाच चुकीची आहे. जोपर्यंत ती भगवत्‌शक्ती या पंचमहाभूतांच्या मृण्मय शरीरात वास करते आहे, तोपर्यंतच हे खेळणे नाचते, हालते. पण जेव्हा ती चिन्मय शक्ती निघून जाते तेव्हा हे कलेवर निष्प्राण, पालापाचोळा होते. म्हणून जी शक्ती माझी नाही, त्या शक्तीने मिळालेल्या फळावर माझा हक्क कसा पोचतो? जेव्हा इंद्रिये माझ्या शक्तीने चालत नाहीत, त्या वेळी त्यांच्याकडून घडलेली कर्मे ही मी माझी कशी म्हणायची? म्हणून ज्या ज्या क्रिया आपण करतो, अन्नपानादी व्यवहार, हवन, दान, जप, तप... जे जे हातून घडते त्यात आपण स्वतःला निमित्तमात्र समजून, ज्याचे त्याला अर्पण करणे **'त्वदीय वस्तु गोविन्द तुभ्यमेव समर्पये'** हे ईश्वराचे पूजन आहे. व हे सर्व अर्पण करताना त्यात भाव असला म्हणजे झाले.

हा भाव कसा असावा, हे श्री ज्ञानेश्वरांनी या २७ व्या श्लोकावरील निरूपणात नेमके व्यक्त केले आहे.

**जे जे काही व्यापार करिसी । का भोग हन भोगिसी ।**
**अथवा यज्ञी यजिसी । नानाविधी ।।३९८।।**
**नातरी पात्रविशेषें दानें । कां सेवका देसी जीवने ।**
**तपादि साधने । व्रते करिसी ।।३९९।।**
**तें क्रियाजात आघवे । जे जैसे निपजेल स्वभावे ।**
**ते भावना करोनि करावे । माझिया मोहरा ।।४००।।**
**परि सर्वथा आपुलां जीवीं । केलियाचि शंका कांहीचिनुखी ।**
**ऐसी धुवोनि कर्मे द्यावी । माझा हातीं ।।४०१।।**

"जे जे काही व्यवहार करशील किंवा शब्दादि विषयांचा भोग घेशील, अथवा अनेक प्रकारच्या यज्ञरूप कर्मांनी हवन करशील." ।।३९८।।

"किंवा विशिष्ट योग्यता पाहून दाने देशील किंवा निरनिराळी व्रते व तप करशील." ।।३९९।।

"जे जे कर्म जसे तुझ्याकडून स्वभावतः घडेल ते ते सर्व कर्म माझ्या प्रीत्यर्थ आहे. अशा समजुतीने कर." ।।४००।।

"परंतु अमुक कर्म मी केले अशी कर्तृत्वाची आठवण आपल्या मनामध्ये तू मुळीच ठेवू नकोस. याप्रमाणे सर्व कर्मे शुद्ध करून मला अर्पण कर." ।।४०१।।

भगवद्गीता हे जीवननिष्ठाशास्त्र आहे. हा अध्यात्मपर ग्रंथ असला तरी दैनंदिन जीवनाला तो सर्वार्थाने स्पर्श करणारा आहे. जीवनात बाहेरून प्रवृत्ती व अंतःकरणातून निवृत्ती असा भाव धारण करून, सर्व कर्मे ब्रह्मार्पण वृत्तीने केल्यास, कर्म व भक्ती यांचा सुंदर संगम घडतो. थोडेसे काही आपल्या हातून घडले तर त्याविषयीचा कर्तृत्वभाव अहंकार आपल्या मनात जागा होतो. गीता, ही फलासक्ती व कर्तृत्वभाव यांचा त्याग करावयास शिकविते. श्री ज्ञानेदवांनी ९००० ओव्यांतून गीतेवर भावार्थदीपिका लिहिली. स्वतःच्या उत्तुंग प्रतिभेने व अनुभूतीने समृद्ध असणारे तत्त्वज्ञान जगासमोर मांडले व हे सर्व करून, त्याचे सारे श्रेय आपले गुरू श्री निवृत्तिनाथ आणि श्रोते यांना समर्पित करून टाकले. कर्मे करून कर्मबंधनातून कसे सुटायचे याचा परिपाठ त्यांनी वरील ओव्यांतून सांगितला आहे. भक्ताने प्रेमाने अर्पण केलेली वस्तू कितीही सामान्य असली तरी ती ईश्वराला प्रियच असते. सुदाम्याच्या पोह्यांची पुरचुंडी श्रीकृष्णाने मोठ्या अधिरतेने सोडली. अशा अनेक पौराणिक कथांतून एकच तत्त्व प्रकर्षाने जाणवते, देव भावाचा भुकेला असतो. म्हणून आपापल्या वाट्याला आलेले कर्म, दिलेले धन, केलेले तप, व्रते जे जे, ते ते सारे ईश्वरार्पण करून टाकावे. ती सर्व कर्मे शुद्ध होऊन भगवंताच्या चरणी अर्पित होतात, मग अशा भक्ताला पुन्हा शरीर धारण करावे लागत नाही. ज्याने एकदा असे भक्तपण स्वीकारले त्याचा कधीही नाश होत नाही. (श्लोक क्र. ३१) अर्जुनाच्या निमित्ताने सर्व भक्तांना श्रीकृष्णाने दिलेले हे आश्वासन आहे. वरील ओव्यांतून हा भक्तीचा सुलभ सोपान विशद केला आहे. काय व किती अर्पण केले, यापेक्षा ते 'कसे' अर्पण केले याला भक्तीत महत्त्व आहे. त्यामुळे जीवनात मी किती वस्तू मिळविल्या, कर्तृत्वाचे किती डोंगर उभे केले, यापेक्षा ईश्वरार्पण बुद्धीने निष्काम होऊन किती क्रिया केल्या, याचे भक्ताकडून सतत आत्मपरीक्षण झाले पाहिजे. हाच खरा मोक्षाचा मार्ग! जीवनातील सर्व कर्तृत्वाचे फळ ईश्वराला अर्पण करणे हे कर्मयोगापेक्षाही श्रेष्ठ आहे. कर्मयोगात 'कर्म करा व फळाची



अपेक्षा धरू नका' असा आग्रह आहे. पण या राजयोगात 'कर्म करा व फळ भगवंताच्या चरणी अर्पण करा' हा भाव आहे. म्हणजे कर्तव्य म्हणून कर्म करायचे, प्रयत्न करायचे... सर्व काही करायचे व त्याचे फळ फेकून न देता भगवंताशी जोडायचे. कर्म व भक्ती यांचा हा सुंदर मिलाफ आहे. कर्मयोगाच्याही पुढे नेणारी ही उत्कट भक्ती आहे. यामुळे जीवनातील क्षुद्रत्व, दैन्यत्व जाऊन अपार आनंदाचे धनी आपण होऊ शकू, असा भाव यात आहे. नवव्या अध्यायाचे हेच वैशिष्ट्य आहे. यात कर्मयोग व भक्तियोग यांचा सुंदर मिलाफ आहे. कर्माचे फळ हे अटळ असते. जे फळ मिळणारच ते फळ भगवंताला अर्पण करायचे म्हणजे इथे पात्रापात्रतेचा संबंधही नाही. शुद्ध बुद्धीने जितके हे करता येईल तेवढी ती उन्नत अवस्था. एवढेच नव्हे तर, मनात येणारे राग-लोभादी विकार, वासना, क्रोध सर्वच ईश्वरार्पण करून मोकळे व्हायचे. सर्वही इंद्रिये त्याच भावनेने वापरणे हाच खरा भक्तीचा मार्ग. भक्ती म्हणजे वृत्ती. देहातील आंतरिक व्यापार बदलण्यासाठीच भक्ती आहे. म्हणूनच संत तुकाराम महाराज म्हणतात -

**करावा विठ्ठल बोलावा विठ्ठल ।**
**पहावा विठ्ठल जीवभावे ।**
**तेणे सोसे मन झाले हावभरी ।**
**परत माघारी येत नाही ।।**
**बंधनापासूनि उकलल्या गाठी ।**
**तेणे पडे मिठी सावकाश ।**
**तुका म्हणे देह भरला विठ्ठलें ।**
**काम-क्रोधे केले घर रिते ।।**

जे जे करायचे, पाहायचे, बोलायचे, द्यायचे, सेवन करायचे ते ते सर्व भगवंताला अर्पण करून करायचे. म्हणजे आत हरी, बाहेर हरी... सर्वच हरीने व्यापलेले अशी अवस्था होते व अशा स्थितीत देहातील काम-क्रोधादी कचरा आपोआपच निघून जाऊन चित्तशुद्धी होते. जन्मोजन्मीच्या वासनांची पुटे जळून जातात व सारे जीवन हरिमय होऊ शकते. आपले सर्व सामान्य जीवनदेखील एक यज्ञकर्म होऊ शकते. सकाळपासून रात्री निद्रेपर्यंत जे जे कर्म अथवा भोग घडलेला आहे, त्याला दिव्यत्व प्राप्त होते. मग ते न्यायाधीशाचे काम असो किंवा सामान्य कारकुनाचे..., प्रत्येक काम दैवी बनू शकते. परमेश्वराचेच काम आहे असे समजून केलेले कोणतेही काम पवित्र बनते. सेना न्हावी, सावता माळी, संतश्रेष्ठ कबीर या सर्व संतश्रेष्ठांची कामे हलकी होती. पण त्यांना दिव्यत्वाचा स्पर्श होता. संत तुकाराम अहिंसेचे कैवारी.

पण सजन कसायाबद्दल ते म्हणतात, ''सजन कसाया विकू लागे मांस'' ... भगवान सजन कसायासदेखील मदत करतात, असे त्यांनी वर्णन केले आहे. शबरीची बोरे आवडीने खाणारा भगवंत जनाबाईचे दळण दळत होता, एकनाथांच्या घरी श्रीखंड्या होऊन कावडीने पाणी भरत होता. चित्तशुद्धी झाल्यानंतर केलेले काम जेव्हा परमेश्वराशी जोडले जाते, तेव्हा ते यज्ञरूपच होते. किंबहुना असे काम झाल्यानंतरच चित्तशुद्धी होते व तेथेच भक्ती प्रगट होते. यासाठी प्रपंच सोडावा लागत नाही किंवा हिमालयात जावे लागत नाही. आपले साधे घर व ऑफिस, आश्रम होऊ शकते, त्यात केलेले साधे साधे कर्म यज्ञ बनू शकते. केवळ ईश्वराशी जोडल्या गेलेल्या कर्मानेच जीवनात एक अद्‌भुत परिवर्तन येते. अशा भक्ताचा उत्साह उदंड असतो, कार्यशक्ती प्रचंड असते, 'आनंदाचे डोही आनंद तरंग' अशी प्रसन्नावस्था त्याची असते. त्याचे जीवन म्हणजे चैतन्यशक्तीचा अखंड झराच असतो. पूजासाहित्य किती आहे, कोणते आहे या गोष्टीला महत्त्व नसून भावभक्ती व सर्मपणबुद्धी किती आहे, याला महत्त्व आहे. भगवंताची सुवर्णतुला करताना सत्यभामेच्या दागिन्यांना जे करता आले नाही, ते रुक्मिणीच्या एका तुळशीपत्राने केले. म्हणून जे जे अर्पण करायचे ते ते प्रेमाने, भावाने व भक्तीने! अशा तऱ्हेने केलेल्या शुभ-अशुभ कर्माचे बंधन मग राहत नाही. भगवंत सर्वत्र समदृष्टीनेच पाहतो; पण जे भक्त अहंकाररहित, वासनारहित, शुद्ध भावनेने अनन्यभक्ती करतात, त्यांच्या जीवनात तो विशेषत्वाने राहतो. ज्यांच्यामधील देहतादात्म्य निघून गेले आहे अशा आत्मरती झालेल्या भक्तांच्या हृदयात त्याचा वास विशेषत्वाने असतो.

या चार श्लोकांतील सार एवढेच की, जे जे कर्म आपल्या हातून होईल ते ते ईश्वरार्पण केल्याने एक वेगळाच दैवी सुगंध प्रत्येक कर्माला येईल. तुकारामांच्या शब्दांत,

''तुका म्हणे चवी आले ।
जे का मिश्रित विठ्ठले ।।''

प्रत्येक वस्तूत, भोगात, कर्मात, दृष्टीत, पूजेत, सेवेत परमात्म्याला जोडायचे. मग असे भक्तिमय झालेले जीवन भगवंताला का आवडणार नाही?

गीतेतील २, ९, १२, १५ व १८ हे अध्याय सारभूत तत्त्वज्ञान कथन करणारे अध्याय असल्यामुळे त्यांचा अभ्यास विशेषत्वाने केला पाहिजे. सतत चिंतनीय, मननीय असल्यामुळे साधकांनीच नव्हे तर गीताप्रेमी मंडळींनी हे अध्याय मुखोद्‌गत करावेत. या सर्व अध्यायांत भगवंतांनी गुह्यातल्या गुह्य गोष्टी अतीव उत्कटतेने अर्जुनाला सांगितल्या आहेत. गीता नित्य-नूतन



असल्यामुळे, प्रत्येक वेळी नवनवा अर्थ प्रगट होतो. हेच गीतेचे अभूतपूर्व वैशिष्ट्य आहे. गीतेचा अर्थ मला पूर्णार्थाने समजला असा भाव कोणीही व्यक्त करीत नाहीत. ते याच नित्यनूतन तत्त्वामुळे! म्हणून जीवनभर प्रत्येक क्षणी गीतेची साथ आवश्यक आहे. संपूर्ण उपनिषदांचे सार गीतेत सूत्ररूपाने मांडले गेले आहे. त्यामुळे प्रत्येक श्लोक महत्त्वाचा आहे.

आता नवव्या अध्यायातील शेवटच्या पाच श्लोकांचा अन्वयार्थ पाहू.

**अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।**
**साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ।।३०।।**
**क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छान्तिं निगच्छति ।**
**कौन्तेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ।।३१।।**
**मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः ।**
**स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् ।।३२।।**
**किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा ।**
**अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ।।३३।।**
**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ।।३४।।**

''मोठा दुराचारी का असेना, मला जर तो अनन्यभावाने भजत आहे, तर तो साधूच समजला पाहिजे. कारण त्याच्या बुद्धीचा निश्चय चांगला झालेला असतो.'' ।।३०।।

''तो लवकर धर्मात्मा होतो व नित्य शान्ती पावतो. हे कौंतेया! तू असे पक्के समज की माझा भक्त (कधीही) नाश पावत नाही.'' ।।३१।।

''कारण हे पार्था! माझा आश्रय करून स्त्रिया, वैश्य व शूद्र किंवा जे (अंत्यजादी) पापयोनी असतील ते देखील परमगती पावतात.'' ।।३२।।

''मग जे पुण्यवान ब्राह्मण तसेच राजर्षी (क्षत्रिय) माझे भक्त आहेत, त्यांची गोष्ट कशास पाहिजे? या अनित्य व असुख म्हणजे दुःखकारक (मृत्यु) लोकी तू आहेस. म्हणून मला भज.'' ।।३३।।

''माझ्या ठिकाणी मन ठेव. माझा भक्त हो, माझे यजन-पूजन कर, आणि मला नमस्कार कर. याप्रमाणे मत्परायण होऊन आपला योग चालविलास म्हणजे मलाच येऊन पोचशील.'' ।।३४।।

भगवद्‌भक्त दुराचारी असले तरी ते भगवंताला प्रियच असतात असा अर्थ ३०व्या श्लोकातून अभिप्रेत नाही. पण केवळ सत्प्रवृत्त, सात्त्विक भाविकांनाच भगवंताकडे जाण्याचा अधिकार आहे आणि दुष्प्रवृत्त, तामसी, पथभ्रष्ट, वाममार्गी मनुष्यांना आपला आत्मोद्धार करण्यासाठी भगवद्‌भक्ती

अप्राप्य आहे, ही समजूत येथे खोडून काढण्यात आली आहे. To err is human असे म्हणतात. मनुष्याच्या हातूनच चुका घडतात. पण पाप घडल्यानंतर पश्चात्तापदग्ध होऊन त्याने जर भगवंताची आराधना केली तर अशा माणसाची बुद्धी हळूहळू विशुद्ध होऊन त्याच्या हातून पुनश्च पापकर्म होणे शक्य नाही. ख्रिश्चन धर्मातदेखील पश्चात्ताप व पापकबुलीला अनन्य महत्त्व दिले आहे. पश्चात्तापरूपी तीर्थात स्नान करून भगवंताची अनन्यनिष्ठेने भक्ती करणाऱ्या दुराचारी माणसाच्या हातून पुन्हा दुष्कृत्य घडणे असंभवनीय. चित्तशुद्धीसाठी अनन्यभाव ठेवून सतत भगवत्चिंतन करणारा असा भक्त लवकरच धर्मात्मा बनतो व नित्य शांतीचा अधिकारी होतो. सत्ता, संपत्ती, पद, प्रतिष्ठा, कीर्ती यांच्याबरोबर, ईषणा मागे लागल्या की कोणताही विधिनिषेध न बाळगता अनिर्बंधपणे वागून माणसाच्या हातून कळत-नकळत दुष्कृत्ये घडतात. आजच्या मोहमयी जगात प्रत्येक क्षण हा कसोटीचा ठरतो आहे. सत्प्रवृत्त माणसांना आपले स्वत्व टिकविणे अवघड जात आहे. सर्वत्र सुखासाठी धावणे सुरू आहे. सुखाच्या व्याख्या बदलताहेत. नीतिमूल्ये, शास्त्रसिद्धान्त केवळ पुस्तकातच राहिली आहेत. तमोरूपी अंधकारात चाचपडताना माणसाच्या हाती समाधानाचा ठेवा प्राप्त तरी होत नाहीच, उलट हातून असंख्य प्रमाद मात्र घडत असतात. माणूस नैराश्याच्या खोल गर्तेत सापडला आहे. आजच्या कलियुगाचा महिमा हा असा आहे. अशा अवस्थेत सत्संग, सद्विचार, भक्ती हीच माणसाला तारणारी संजीवनी आहे. गीतेचे अमृतमय विचार माणसाला उभारी देणारे आहेत. भगवंतांनी हे प्रत्यक्ष आश्वासन दिले आहे की, माझा भक्त कधीही नाश पावत नाही. भागवतामध्ये हीच गोष्ट कथन केली आहे.

**कलेर्दोषनिधे राजन्नस्ति ह्येको महान् गुणः ।**
**कीर्तनादेव कृष्णस्य मुक्तसङ्गः परं व्रजेत् ।।** (भाग. १२/३/५१)

"हे राजा! कली हा दोषांचा सागर आहे खरा, पण त्यात एक महान गुण आहे. तो असा की, ह्या कलियुगात केवळ कृष्णाच्या गुणांचे संकीर्तन केल्याने मनुष्याची सर्व बंधांपासून मुक्तता होऊन त्याला परमपदाची प्राप्ती होते."

भक्तीशिवाय माणसाचा उद्धार नाही. कृष्णाचे जीवन, कृष्णभक्ती, कृष्णाचे विचार उचलणे हेच त्याचे कीर्तन! भक्तीनेच मानवजीवनाचा उद्धार होईल. जो एकचित्त भावाने व विशुद्ध अंतःकरणाने भगवंताचा धावा करतो, तो कधीही नाश पावत नाही. नवव्या अध्यायात, भक्त व भक्तीचा महिमा गायिला असल्यामुळे ज्ञानेश्वरांसारख्या संतांनी हा अध्याय शिरोधार्य मानला.



३२ व ३३ व्या श्लोकात भगवंतांनी हेच आश्वासन थोड्या अधिक विस्ताराने मांडले आहे. स्त्रिया, वैश्य, शूद्र, अंत्यजदेखील उत्कृष्ट गती पावू शकतात, हा दिलासा या श्लोकात दिला आहे. स्त्रिया व शूद्रांना वेदांचे अध्ययन करण्याचा अधिकार नव्हता, गीता वाचण्याचाही नव्हता. कारण गीता ही स्मृती आहे. एवढेच नव्हे तर स्त्री-जीवनात मुक्ती नाही. स्त्रीला पुन्हा पुरुषजन्म घेऊनच मुक्ती मिळविता येते, असा कर्मकांडी विचार शतकानुशतके रूढ झाला होता. त्यामुळेच संस्कृत साहित्यात ठिकठिकाणी 'स्त्री' जातीवर निंदा-व्यंजक वर्णने आली आहेत. स्त्रीची अक्षम्य थट्टा केली गेली आहे. केवळ आपल्या भारतीय वाङ्मयातच नव्हे तर इंग्रजी साहित्यातही स्त्रीविषयक मानहानीचा, थट्टेचा विषय प्राचीन काळापासून आला आहे. रस्किनसारख्या महान लेखकानेही असे म्हटले आहे की, "Men have many faults but woman have only two. There is nothing good they say and there is nothing right they do."

म्हणजे, "पुरुषांच्या अंगी पुष्कळ दोष असतात पण स्त्रियांच्या अंगी फक्त दोनच दोष असतात. पहिला दोष असा की, कोणतीच चांगली गोष्ट त्या बोलत नाहीत. आणि दुसरा दोष असा की, की कोणतीच योग्य गोष्ट त्या करीत नाहीत." यज्ञोपवीत धारण केल्याशिवाय श्रुती व स्मृती यांचे अध्ययन करता येणार नाही असा एक सामाजिक संकेत असल्यामुळे स्त्रिया, वैश्य व शूद्र हे यज्ञोपवीत धारण करीत नसल्यामुळे त्यांना वेदांचा अधिकार नाही, हा विचार रूढ झाला होता.

पण गीतेने या सर्व कोत्या, क्षुद्र, हीन विचारांना दूर सारून समतेचा, कल्याणाचा क्रांतिकारक विचार या अध्यायात मांडला आहे. गीतेने हा आक्रमक, पुरोगामी विचार मांडून संपूर्ण मनुष्यजातीला योग्य न्याय दिला आहे. स्त्री-मुक्तीचा विचार आजचा नाही. न्याय, समता, बंधुता, स्वातंत्र्य अशा मूल्यांचा उद्घोष गीतेने पाच हजार वर्षांपूर्वीच केला आहे. महात्मा गांधींनी सत्य, अहिंसा, प्रेम ही त्रिसूत्री गीतेतूनच स्वीकारली. गीतेच्या विचारावाचून माझा एकही दिवस मी घालविला नाही असे गांधीजींनी म्हटले आहे. गीतेतील १६ व्या अध्यायातील २६ दैवी गुणांपैकी हे तीन गुण आहेत. २१ व्या शतकात गीतेचे विचारच मानवाचे जीवन सर्वांगसुंदर करू शकतील असा भाव व विश्वास यातून घ्यावयास हरकत नाही. भगवंत या अध्यायात निःसंदिग्धपणे म्हणतात की, स्त्रिया, वैश्य, शूद्र हे भक्तीच्या जोरावर परमगती प्राप्त करू शकतात. वास्तविक स्त्रीला निसर्गतःच समर्पणता व भावप्रधानता हे गुण इतक्या उत्कट प्रमाणात लाभले आहेत की त्यामुळे ती

पुरुषापेक्षा अधिक लवकर आध्यात्मिक उन्नती साधू शकते. श्रद्धा हा स्त्रीचा स्थायिभावच आहे. भक्तीत भाव महत्त्वाचा! ही भावप्रधानता स्त्रियांची स्वभावतःच प्रवृत्ती आहे. त्यामुळेच सामान्य स्त्रियासुद्धा भक्तीमध्ये रंगल्या म्हणजे मी मी म्हणणाऱ्या ज्ञानी साधकांच्या पुढे जातात. जनक राजा केवढा ज्ञानी पण ज्ञानासाठी एका स्त्रीकडे गेला आहे, असा प्रसंग महाभारतात ''जनक सुलभा संवाद'' या प्रकरणात व्यासांनी उभा केला आहे. सुलभासारखी सामान्य स्त्री जनकास ब्रह्मविद्या देत आहे. हे केवढे विलक्षण आहे! महाभारतात स्त्रिया, वैश्य, शूद्र यांच्या कथा निरनिराळ्या ठिकाणी आल्या आहेत. तुलाधार वैश्याची कथा... जाजलि ब्राह्मण त्याच्याकडे ज्ञानासाठी जातो तेव्हा तुलाधार म्हणतो, ''तराजूची दांडी सरळ राखण्यात माझे सारे ज्ञान आहे.'' व्याधाची अशीच एक कथा! व्याध वास्तविक कसाई. पशु-प्राणी मारून समाजाची सेवा करीत होता. एका अहंकारी ब्राह्मण तपस्व्याला त्याच्या गुरूने व्याधाकडे जावयास सांगितले. तेव्हा तो व्याध म्हणाला, ''मी मांस विक्रीस ठेवतो. हे माझे कर्म जितके धर्ममय करता येईल तितके मी करीत आहे. माझे हृदय ओतून मी हे काम करतो व आईबापाची सेवा करतो.'' अशा व्याधाच्या रूपाने व्यासांनी एक महान तत्त्व प्रतिपादिले आहे. संतश्रेष्ठ तुकाराम महाराज अहिंसक; पण सजन कसायाने कसायाचे काम करून मोक्ष मिळविला हे मोठ्या कौतुकाने त्यांनी वर्णिले आहे. सर्वांना मोक्षाचा अधिकार आहे हे महान तत्त्व या नवव्या अध्यायात भगवंतांनी स्वच्छपणे मांडले आहे. स्त्रियांमध्ये एवढी महान शक्ती आहे की, स्त्री बदलली तर जग बदलेल, असे म्हणावे लागेल. श्रीकृष्णाने हा प्रयोग लहानपणीच गोकुळात करून दाखविला. त्याने गोपींना एकत्र केले व त्यांची दृष्टी बदलली. दृष्टी बदलली की सृष्टी बदलते. तसेच झाले. श्रीकृष्णाने समर्थ विचारांनी त्यांची बुद्धी बदलली व समजावले की इंद्रपूजेपेक्षा गोवर्धन पर्वताची पूजा करणे हे निःश्रेयसकारक आहे. स्त्रिया बदलताच संपूर्ण गोकुळ बदलले. तशा गोपी साध्यासुध्या स्त्रिया, पण त्यांची भक्ती एवढी पराकोटीची होती की श्रीकृष्णाने त्यांना मोक्षाची वाट मोकळी करून दिली. संत कबीरांनी मुक्त कंठाने गोपींची प्रशंसा करताना किती धन्योद्गार काढले!

**''कबीर कबीर क्या कहते हो,**
**जाओ जमुना के तीर ।**
**एक-एक गोपी के प्रेम में**
**बह गये कोटि कबीर ।।''**



कोटी कोटी कबीर केवळ एकेका गोपीच्या भक्तिप्रेमरसामध्ये वाहून गेले. संत मीराबाई, जनाबाई, मुक्ताबाई, बहिणाबाई... अशा अनेक संतश्रेष्ठ स्त्रिया होऊन गेल्या.

म्हणून नवव्या अध्यायाचे हेच सार आहे की, ''सर्व कर्मांचा संबंध परमेश्वराशी जोडावा, शुद्ध भावनेने व सेवेने, भक्तीने केलेले कोणतेही कर्म हे यज्ञरूपच असते. जे काही आहे ते परमेश्वराला अर्पण कर. प्रत्येक कर्म त्याचे समजून कर.''

३३ व्या श्लोकात भगवंतांनी एक महान सिद्धांत प्रतिपादिला आहे. ''हे जग नश्वर आहे. या मृत्युलोकात सुखाचा केवळ आभास आहे. सुखाची चादर लपेटून दुःखच हरक्षणी येत असते. सुखाला आदी-अन्त आहे. माणूस केवळ मृगजळाच्या मागे धावतो आहे. अशा अतृप्त माणसाला भक्तीशिवाय दुसरी संजीवनी या पृथ्वीतलावर नाही. या श्लोकावरच्या निरूपणात श्री ज्ञानेश्वर माऊलींनी या नश्वर जगाचे वर्णन, पुढील ओव्यांत परिणामकारक मांडले आहे -

**दर्दुर सापे गिळिजतु आहे उभा ।**
**की तो मासिया वेटाळ जिभा ।**
**तैसे प्राणिये कवणा लोभा । वाढविती तृष्णा ।।५१४।।**
**अटा कटा हे वोखटे । मृत्युलोकींचे उफराटे ।**
**एथ अर्जुना जरी अवचटे । जन्मलासी तू ।।५१५।।**
**तरि झडझडोनि वहिला निघ । इये भक्तीचिये वाटेलाग ।**
**जिया पावसी अव्यंग । निजधाम माझे ।।५१६।।**

''बेडूक सापाकडून उभा गिळला जात असतानादेखील, तो बेडूक उडत असलेल्या माश्यांना पकडण्याकरिता जीभ बाहेर काढून वेटाळीत असतो. तशाच तऱ्हेने मानवप्राणी कोणत्या लोभाने तृष्णा वाढवितात कोण जाणे! अरेरे! हे वाईट आहे!! मृत्युलोकांतील सर्वच न्याय उफराटा आहे. अर्जुना! तू जरी येथे अकस्मात जन्मला आहेस, तरी त्या मृत्युलोकीच्या रहाटातून, झटकन मोकळा हो. आणि या भक्तीच्या मार्गाला लाग की, त्या भक्तीच्या योगाने माझे निर्दोष स्वरूप पावशील.''

अशी ही मृत्युलोकीची कहाणी! बुद्धीने कदाचित हे समजेलही, पण जोपर्यंत विषय-विकार, लोभ-मोह, मद-मत्सर, ईर्ष्या-द्वेष, काम-क्रोध यांपासून अलिप्त होऊन चित्तशुद्धी होत नाही, तोपर्यंत अक्षय आनंदाचा ठेवा आपल्याला प्राप्त होणार नाही. संयम, विवेक, श्रद्धा यांच्या बळावर भक्तीने भगवंताचा धावा केला पाहिजे. यासाठी या अध्यायाच्या शेवटी भगवंतांनी आपल्याला ही राजविद्या पुन्हा एकदा साररूपाने सांगितली आहे. केवळ एका श्लोकात

(श्लो. ३४) हे राजगुह्य प्रकट झाले आहे. हा श्लोक नवव्या अध्यायाचे सार आहे. भगवंताचे हृदय-प्रेम यात आहे. हा सर्वात सुंदर श्लोक आहे. भक्तीचे रहस्य यात दडले आहे. हा श्लोक म्हणजे सर्व रत्नांतील कंठमणी आहे. जे काही सांगायचे ते सर्व यात सांगून झाले आहे. म्हणूनच १८ व्या अध्यायातही हा श्लोक थोडाफार बदल करून भगवंतांनी सांगितला आहे. (अ. १८.६५) या श्लोकातील अर्थ भक्ताच्या वृत्तीत आणि कृतीत आला तर तो भगवंताच्या जवळ पोचल्याशिवाय राहणार नाही. आत्मोन्नतीचा निश्चित मार्ग दाखविणारा हा श्लोक आहे. 'मन्मना भव' हा जीवनमंत्र येथे सांगितला आहे. ही संजीवनीच संसार-सागरातून तारणारी आहे. या भवसागरातून तरून जाण्यासाठी सर्वभावे तू मला भज, मला तुझे मन दे, केवळ माझेच चिंतन कर, सर्वस्वी मलाच तुझे प्रेम-भाव दे, अनन्यचित्त होऊन केवळ मला चिकट, तू केवळ माझ्यावर विश्वास ठेव. तदाकार, अखंडाकार चित्तवृत्ती होईपर्यंत तू सतत माझे चिंतन कर, तुझे संपूर्ण जीवनच मला दे. ही भगवंताची मागणी आहे.

हेच भगवंताचे नेमके मनोगत श्री ज्ञानेश्वर माऊलींनी पुढील ओव्यांत उद्धृत केले आहे -

**तूं मन हे मीचि करीं । माझा भजनी प्रेम धरी ।**
**सर्वत्र नमस्कारी । मज एकाते ।।५१७।।**
**माझेनि अनुसंधाने देख । संकल्पु जाळणे निःशेख ।**
**मद्याजी चोख । याचि नांव ।।५१८।।**
**ऐसा मियां अथिला होसी । तेथ माझियाचि स्वरूपा पावसी ।**
**हे अंतःकरणीचे तुजपासी । बोलिजत असे ।।५१९।।**
**अगा आवधिया चोरिया आपुले । जे सर्वस्व आम्ही असे ठेवले ।**
**ते पावूनि सुख संपले । होऊनि ठासी ।।५२०।।**

''तू आपले मन मद्रूप कर. माझ्या भजनाच्या ठिकाणी प्रेम धर. आणि सर्व ठिकाणी माझेच स्वरूप आहे असे समजून मला एकाला नमस्कार कर. पाहा, जो माझ्या वेधाने संकल्प पूर्णपणे जाळतो, त्यालाच माझे चांगले भजन करणारा म्हणावे. याप्रमाणे तू माझ्या योगाने संपन्न होशील, तेव्हा मद्रूपास पावशील. ही माझ्या अंतःकरणातील (गुह्यतम गोष्ट) तुझ्याजवळ मी सांगत आहे. अरे, सर्वांपासून लपवून ठेवलेले असे जे आमचे सर्व भांडवल, ते तुला प्राप्त झाले आहे. त्यामुळे तू सुखरूप होऊन राहशील.

हृदयात कोरून ठेवावा, असा हा श्लोक व त्यावरील माऊलींच्या ओव्या!! भगवंताचे हृद्‌गत व आश्वासने व्यक्त झालेला हा अध्याय मांडीवर ठेवून श्री ज्ञानेश्वरांनी संजीवनी समाधी घेतली, ती याचमुळे.

**।। ॐ श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**



## अध्याय दहावा
# विभूतियोग

ह्या अध्यायापासून गीतेचा उत्तरार्ध सुरू होतो आहे. अर्जुनाच्या विषादयोगापासून गीतेची सुरुवात झाली. गीतेचा संपूर्ण प्रवास हा विषादापासून प्रसन्नतेकडे जाण्याचा आहे. गीता हा जीवनग्रंथ एवढ्यासाठीच आहे की, मानवी जीवन जे दुःख, यातना, अतृप्ती, अशांती, असमाधान ह्यांनी भरलेले आहे त्या जीवनात सुख, शांती, प्रसन्नता कशी येईल याचे नेमके रहस्य भगवंतांनी १८ अध्यायांत सांगितले आहे. जीवन हे कुरुक्षेत्र आहे. या कुरुक्षेत्राचे धर्मक्षेत्र होण्यासाठी गीता अवतरली आहे. असमाधान जीवनात आहेच आणि त्याच्यामुळेच जीवनात विषाद येत आहे. अर्जुनाची मोहग्रस्त अवस्था हा त्याचा परिपाक आहे. कर्तव्यच्युत झालेल्या अर्जुनाची अवस्था शोचनीय, दुबळी, तेजोहीन झाली आहे. पहिल्या अध्यायात याचे वर्णन आपण पाहिले. दुसऱ्या अध्यायात आत्मा-अनात्मा, स्वधर्माचे आचरण, स्थितप्रज्ञाची लक्षणे, निष्काम कर्मयोग, योगाची व्याख्या अशा अनेक विषयांवर सूत्रबद्ध विचार मांडले गेले. तीन, चार व पाच या अध्यायांत कर्म, अकर्म, विकर्म याबरोबरच निष्काम कर्मयोग, कर्मसिद्धान्त, स्वधर्माचरण व चित्तशुद्धी; तसेच कर्मयोग व संन्यास यांतील सीमारेषा; अकर्मदशा; ज्ञान व श्रद्धा यांचे माहात्म्य; सुखदुःखाच्या व्याख्या; पाप-पुण्याचे स्वरूप... अशा बहुविध विषयांचे दर्शन आपणास झाले. नंतर सहाव्या अध्यायात चित्तशुद्धी व चित्तैकाग्रता होण्यासाठी लागणाऱ्या ध्यान, योग अशा साधनांचे सविस्तर वर्णन आले आहे. सातव्या अध्यायात प्रारंभी अष्टधा प्रकृतीचे स्वरूप आणि परा-अपरा प्रकृतीचे वर्णन करून भक्तीचे माहात्म्य सांगितले. केवळ भगवंताला शरण जाऊन व त्याची अनन्यचित्ताने भक्ती करून ही मायानदी तरून जाता येते. त्यानंतर भगवंताला भजणारे जे चार प्रकारचे भक्त आहेत, त्यांचे वर्णन झाले आहे. अंतकाळापर्यंत सतत साधना झाली, तरच शेवटच्या श्वासावेळी भगवंताचे नाव मुखात येते. मृत्युसमयी जे चिंतन, विचार असतील त्याप्रमाणेच पुढील जीवनाची गती प्राप्त होते. हा विचार आठव्या अध्यायात मांडला आहे. नवव्या अध्यायात भगवंतांनी आपले हृदय ओतले आहे. जीवनाला

संजीवनी देणारी राजविद्या व गुह्यातले गुह्य तत्त्वज्ञान नवव्या अध्यायात ओतप्रोत भरले आहे. जी जी कर्मे हातून होतात ती ती सर्व कर्मे भगवंताला अर्पण कर म्हणजे कर्मबंधनातून आपोआप सुटका होईल, हा समर्पणयोग म्हणजे राजयोग भगवंतांनी या नवव्या अध्यायात विशद केला. हा सोपा भक्तिमार्ग होय. तो मार्ग जसा ज्ञानी भक्तांना उपयुक्त आहे तसाच अज्ञ भक्तांनाही. 'मन्मना भव' हा भक्तीचा मंत्र त्यात आहे. पण नेमकी हीच कठीण गोष्ट भक्तीत असल्यामुळे ''भक्ती तो सुळावरील पोळी'' झाली आहे. मनबुद्धी अर्पण केल्याशिवाय ही कर्मे भगवंतचरणी समर्पित कशी होणार? म्हणून हा ईश्वरार्पणयोग वाटतो तितका सहज साध्य नाही. मन व बुद्धी तर विकारांत म्हणजे विषय-लोभ, मोह, काम-क्रोध इत्यादी प्रवृत्तींत अडकली आहे. आपले सारे जीवन भोगमयता, विषयलोलुपता, विषमता, द्वंद्वे यांत भरलेले असताना हा समर्पणयोग साधायचा कसा? ईश्वराचे नेमके स्वरूप समजल्याशिवाय त्याला कर्मे अर्पण कशी करायची? भगवंत कुठे कुठे दडला आहे? त्याचा नेमका पत्ता काय? तो कोणत्या कोणत्या रूपात विलसत आहे? हे जर समजले तरच ईश्वरार्पणयोग साधता येईल. या सर्व प्रश्नांची उत्तरे देण्यासाठीच दहाव्या अध्यायाचे प्रयोजन आहे. परमेश्वराच्या व्यक्त स्वरूपाच्या उपासनेचा जो राजमार्ग नवव्या अध्यायात सांगितला, त्याचेच उर्वरित वर्णन दहाव्या अध्यायात भगवंतांनी केले आहे.

गीतेच्या उत्तरार्धाची सुरुवातच म्हणजे हा दहावा अध्याय किती अर्थपूर्ण व मनोवेधक आहे! भगवंत स्वतःहून आपले स्वरूप, आपला पत्ता, ठिकाण या अध्यायात सांगत आहेत. हा अध्याय, अखिल मानवजातीला भगवंताचे सहजसाध्य दर्शन घडवून देणारा आहे. अश्रद्ध नास्तिक, अनीश्वरवादी व संशयग्रस्त महाभागांना भगवंताच्या या स्वरूपाचे दर्शन होणे, आकलन होणे गरजेचे असे आहे तसेच केवळ मूर्तीतच भगवंत वास करतो, अशा श्रद्धेने जे भक्ती करतात त्यांनाही हे स्वरूप समजणे गरजेचे आहे. भगवंताची विविध रूपे समजल्याशिवाय त्याने निर्माण केलेल्या विश्वाकडे व विश्वातील मनुष्य-सृष्टी, भूतमात्र यांच्याकडे पाहण्याची भक्तीची दृष्टी प्राप्त होणार नाही. ईश्वर नेमका कोठे आहे, तो आहे का, असे प्रश्न विचारणाऱ्यांना हा अध्याय मार्गदर्शन करणारा आहे. विश्वात्मक देवाची संकल्पना या अध्यायात प्रगट झाली आहे. 'विविधतेत एकता' ही आजचीच धारणा नसून गीतेने ती पाच हजार वर्षांपूर्वीच उद्घोषित केली आहे.

ह्या १० व्या अध्यायात भगवंत 'विभूतियोग' सांगत आहेत. विभूती म्हणजे ऐश्वर्य, शोभा! योग म्हणजे कौशल्य!! ऐश्वर्य किंवा शोभा प्रकट



करण्याचे कौशल्य म्हणजे 'विभूतियोग.'

भगवंत म्हणतात -

**भूय एव महाबाहो शृणु मे परमं वचः ।**
**यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया ।।१।।**
**न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः ।**
**अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः ।।२।।**
**यो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम् ।**
**असंमूढः स मर्त्येषु सर्वपापैः प्रमुच्यते ।।३।।**

''हे महाबाहो! (माझ्या भाषणाने) संतुष्ट होणाऱ्या तुला तुझ्या हितार्थ जी पुनश्च (एक) उत्तम गोष्टी मी आता सांगतो ती ऐक.'' ।।१।।

''माझी उत्पत्ती देवांच्या गणांना आणि महर्षींनाही कळत नाही. कारण देवांचे आणि महर्षींचे सर्व प्रकारे मीच आदिकारण आहे.'' ।।२।।

''मी (पृथिव्यादि सर्व) लोकांचा मोठा ईश्वर असून मला जन्म व आदि नाही, असे जो जाणतो तोच मनुष्यांमध्ये मोहरहित होऊन सर्व पापांपासून मुक्त होतो.'' ।।३।।

'भूय एव'... भगवान पुन्हा सांगण्यास प्रारंभ करीत आहेत. नवव्या अध्यायातील भक्तीचाच विषय भगवंत इथे पुढे सांगत आहेत. 'परमं वचः।' श्रेष्ठ व दैवी असे हे विचार आहेत. परम म्हणजे सत्य-असत्य याहीपलीकडचे. आजचे सत्य कालांतराने असत्यही ठरू शकते. पण जे कल्पांतापर्यंत त्रिकालाबाधित राहील, ते परम वचन. आणि हे विचार केवळ माझे तुझ्यावर अतिशय प्रेम आहे, म्हणूनच सांगतो, असे भगवंत सांगतात. आपल्या लाडक्या भक्ताचे सर्वप्रकारे कल्याण व्हावे म्हणून हे हितकारक व सुखकारक, श्रेष्ठ विचार भगवंत सांगत आहेत. अर्जुनाला मृत्यूची भीती नाही पण पापाची आहे. ही दूर होण्यासाठी भगवंताचे स्वरूप-ज्ञान होणे आवश्यक आहे. ऋषी व देवगणांनासुद्धा भगवंताची उत्पत्ती कळत नाही. कारण भगवंत त्यांचेही आदिकारण आहे. म्हणून परमेश्वर अज, अनादी आहे, असा दृढ निश्चय झाल्याशिवाय त्यांचे यथार्थ ज्ञान होणे असंभव. अशा ज्ञानानेच भक्ती उल्हसित होते. ''ते ज्ञाननिष्ठा जेथ हातवसे । तेथ भक्ती माझी उल्लसे ।।'' असें माऊलींनीही म्हटले आहे. ज्ञान व भक्ती जीवनात आली की भक्त भगवंताला अज, अनादी, लोकनियता असे जाणायला लागतो. शब्दार्थाने नव्हे तर अनुभूतीने असे जाणायला लागला की तो सर्व पापांपासून मुक्त होतो. ईश्वराशिवाय इतर पदार्थांनी सुख लागेल, असे मनुष्याला वाटत असते. यालाच मोह म्हणायचे. पण ईश्वराचे खरे-खुरे ज्ञान झाले व ईश्वरच सर्व

सुखाचे निधान आहे, अशी दृढ धारणा जेव्हा होते, तेव्हा भक्ती फुलते व ईश्वरप्राप्तीसाठी साधना सुरू होते. अशा वेळी चंचलता, मोह दूर होऊन तो 'असंमूढ' होतो व 'पापमुक्तही'. सर्व वस्तूंचा उद्भव ईश्वरापासूनच होतो, असे सांगताना भगवान श्रीकृष्ण पुढे म्हणतात -

**बुद्धिर्ज्ञानमसंमोहः क्षमा सत्यं दमः शमः ।**
**सुखं दुःखं भवोऽभावो भयं चाभयमेव च ।।४।।**
**अहिंसा समता तुष्टिस्तपो दानं यशोऽयशः ।**
**भवन्ति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः ।।५।।**
**महर्षयः सप्त पूर्वे चत्वारो मनवस्तथा ।**
**मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः ।।६।।**

"बुद्धी, ज्ञान, असंमोह, क्षमा, सत्य, दम, शम, सुख, दुःख, भव (उद्भव), अभाव (नाश), तसेच भय आणि अभय..." ।।४।।

"अहिंसा, समता, तुष्टी (संतोष), तप, दान, यश, अपयश इत्यादी अनेक प्रकारचे प्राणिमात्रांचे भाव माझ्याचपासून उत्पन्न होतात." ।।५।।

"सात महर्षी, तसेच पूर्वीचे चार मनू, ज्यांच्यापासून (या) लोकांमध्ये ही प्रजा झाली, ते माझेच मानस म्हणजे मनाने निर्माण केलेले भाव आहेत." ।।६।।

देव व ऋषी निर्माण झाले. नंतर सूक्ष्म विषयांचे आकलन करणारी बुद्धी, तर-तम जाणण्याची विवेकबुद्धी, अतुलनीय धैर्य, उत्साह अशा अनेक गुणांची संपदा निर्माण झाली. हे सर्व भगवंतापासून निर्माण झाले. ह्या सर्व शक्ती अक्षय आहेत. कल्पांतापर्यंत त्या शक्ती मनुष्यांमध्ये राहणार. या विश्वात अस्तित्व असलेल्या पंचमहाभूतांच्या शक्ती कमी-अधिक होतील, काही वेळा रूपांतरित होतील. पण या शक्ती कायम राहतील.

भगवंतांनी चौथ्या श्लोकात काही गुणांचे वर्णन केले आहे. भगवंताच्या जितक्या जवळ आपण जाऊ तितके हे गुण आपल्यात प्रकर्षाने येतात. हे दैवी गुण आहेत. १६ व्या अध्यायात भगवंतांनी २६ गुणांना दैवी संपत्ती म्हटले आहे. जितके दैवी गुण भक्तात वृत्तीरूपाने आलेत, तेवढी त्याची भक्ती दृढ झाली. संपूर्ण ज्ञान, बुद्धी, असंमोह, असम्मूढता हे गुण माझ्यापासूनच मिळतात असे समज म्हणून अर्जुनाला भगवंत समजावतात. यानंतर क्षमा, सत्य, दमः शमः अशा गुणांचे वर्णन केले. मनुष्य जेवढा क्षमाशील होतो तेवढा तो भगवंताजवळ असतो.

क्षमाशील भक्त भगवंताचा लाडका भक्त असतो. द्रौपदीच्या पाच पुत्रांची हत्या करणारा अश्वत्थामा जेव्हा द्रौपदीच्या समोर आणला गेला तेव्हा भीमाने द्रौपदीला विचारले की, याचे तुकडे तुकडे करून पशुपक्ष्यांना खायला घालू



का? शोकग्रस्त द्रौपदी याच क्षणाची वाट पाहत होती. तिच्या मनाला शांती मिळण्यासाठी अश्वत्थामाला बंदिवान करून द्रौपदीसमोर आणले होते.

द्रौपदीने ध्यानपूर्वक त्याला न्याहाळले व क्षणात तिला अश्वत्थाम्याच्या आईची आठवण झाली. द्रोणाचार्यांचा पुत्र पण आता द्रोणाचार्य मारले गेलेले. घरात एकटी आई. आणि हा एकटा मुलगा. द्रौपदीने खूप विचार केला. अश्वत्थामा तर दयेला पात्र नाही पण आईच्या करुणेने द्रौपदीला तिची दया आली. तिने भीमाला आज्ञा केली, "अश्वत्थाम्याला सोडून दे." युधिष्ठिर, अर्जुन, नकुल, सहदेव, भीम - सर्वजण आश्चर्याने चकित झाले. माझ्या मुलांना ठार करणाऱ्याला जोपर्यंत मारले जाणार नाही तोपर्यंत मी शांत राहणार नाही असे म्हणणारी द्रौपदी आता अश्वत्थामा समोर असताना त्याला माफ करण्याची भाषा बोलत आहे याचे सर्वांना आश्चर्य वाटले. अश्वत्थामासुद्धा म्हणाला, "माझ्यावर तुम्ही दया करीत आहात. मला तुम्ही मारत का नाही?" तेव्हा द्रौपदी म्हणाली, "तू दयेला पात्र नाहीस. मी तुझ्यावर उपकार करत नाही, पण ज्या स्त्रीने आपला पती गमावला आहे त्या स्त्रीला पुत्र गमावण्याची पाळी आली तर किती दुःख होईल याची मी कल्पना करू शकते. त्यामुळे मी त्या आईवर दया दाखवीत आहे." असे म्हणून द्रौपदीने क्षमाशील अंतःकरणाने त्याला सोडून दिले. श्रीकृष्णाने द्रौपदीचे कौतुक केले. "तू कृष्णाची बहीण शोभून दिसतेस," असे म्हणून तिचा गौरव केला. जिथे कृष्ण तिथे क्षमा. श्रीकृष्णाची पूजा करायची म्हणजे अंतःकरणात क्षमा रुजवायची. म्हणून क्षमा हे वीरपुरुषांचे आभूषण आहे. जेवढे आपण क्षमाशील तेवढे आपण भगवंताजवळ आहोत.

भगवंताने नंतर सत्य, दमः शमः या गुणांचे वर्णन केले. महात्मा गांधींनी या दैवी गुणांपैकी सत्य, अहिंसा, प्रेम या तिन्हींना जीवनमूल्ये मानून, आयुष्यभर त्याचे आचरण केले व जगाला त्याचा संदेश दिला. सत्य म्हणजे परमेश्वर व ईश्वर म्हणजेच सत्य, अशी त्या परमतत्त्वाची व्याख्या केली. भगवंतसुद्धा या अध्यायात म्हणतात की, सत्य ही माझी विभूती आहे, सत्य माझ्यात प्रतिष्ठित आहे, एवढेच नव्हे तर सत्य म्हणजेच मी आहे. दमः शमः - जेव्हा आपली सर्व इंद्रिये नियंत्रित होऊन जीवन संयमित होते तेव्हा आपण ईश्वरासमीप जातो व जेव्हा इंद्रिये आपल्यावर स्वार असतात व अनियंत्रित वासनांच्या अधीन होऊन पशूवत आचरण होते तेव्हा मनुष्य ईश्वरापासून खूप दूर जातो. आपल्या सर्व इंद्रियांचे आचरण कसे असावे याविषयी वेदांत एक मांगलिक प्रार्थना आहे. ती अशी - "हे भगवंता, आमच्या कानांवर भद्र

म्हणजे कल्याणकारक शब्द पडू देत, डोळ्यांना मंगल, पवित्र, कल्याणकारक गोष्टी दिसू देत. अशाच सर्व गोष्टींचा संग्रह आमच्या आयुष्यात होऊ दे." अभद्र गोष्टी ऐकून, बोलून आपल्या अंतःकरणातसुद्धा त्याच गोष्टींचा कचरा साचतो. निंदा, द्वेष हे दुसऱ्याला जसे जाळत असतात तसे ते स्वतःलाही पोखरत असतात. निंदा-द्वेष-क्रोध करणारा स्वतःही जळत असतो. म्हणून कबीर म्हणतात,

**"निंदक नियरे राखिये, आँगन कुटी छवाये।**
**बिन साबुन बिन पानी के निर्मल करे सुभाये ।।"**

आपल्या शेजारीच आपल्या निंदकांना ठेवावे. साबण, पाणी हे न वापरतासुद्धा आपल्या मनाला हे लोक निर्मळ करतात. आपल्या प्रगतीने उगाच जळत राहणाऱ्या व निंदा करणाऱ्यांना आपण त्याच भावनेने प्रतिकार न करता, भगवंताजवळ, त्यांना सुबुद्धी देऊन त्यांचेही कल्याण करण्याची प्रार्थना करावी. जिभेवर नियंत्रण आणल्यामुळे अंतःकरणात शांतीचा उदय होतो. करुणा, दया, क्षमा, सहनशीलता, शान्ती, सद्भाव हे गुण जेव्हा मनुष्यात प्रकर्षाने येतात तेव्हा ती भगवंताची कृपा असते. आसुरी वृत्ती मनुष्याला भगवंतापासून दूर नेतात म्हणून शम-दम ही साधकाला उन्नत करतात. सुख, दुःख, भय, अभय, उद्भव, नाश हे भावसुद्धा भगवंतापासून निर्माण होतात. भगवंताजवळ सुख व दुःख हे दोनच चेंडू आहेत. आपल्याजवळ बॅट आहे. भगवंत कधी सुखाचा चेंडू टाकतो तर कधी दुःखाचा. भगवंताच्या या दोन्ही चेंडूंनी आपण आऊट होतो. सुखाचा चेंडू मिळाला की हुरळून जातो व दुःखाचा चेंडू आला की, होरपळून जातो. भगवंत म्हणतात की, सुखदुःखांचा स्वीकार हा भगवंताचा प्रसाद समजून जो समतोल वृत्तीने स्वीकारतो तोच भगवंताच्या कृपेला पात्र होतो. जीवन ही क्रीडा आहे. यश, अपयश, लाभ-हानी, सुख-दुःख ही द्वंद्वे सतत येत राहणार. भगवंताजवळ इतर काहीही न मागता मनाची प्रसन्नता व निर्भयता मागावी. जेव्हा अशांती, दुःख, भय यांनी घेरले जाते त्या वेळी मनुष्य भगवंतापासून विन्मुख आहे असे समजावे. आत्मौपम्य दृष्टीने जगाकडे पाहावे. जो प्रभू माझ्यात वसत आहे तोच सर्वांत विराजमान आहे अशी धारणा झाली की, अहिंसक वृत्ती येते. प्रेम व करुणा मनात जागी होते. मन प्रसन्न, तुष्ट होते. जसे एखाद्या मुलाला त्याच्या मनासारख्या सर्व वस्तू मिळाल्या की खूश होऊन आनंदाने ते नाचायला लागते. आई-वडिलांना धन्यवाद देऊन त्यांच्याविषयी कृतज्ञता व्यक्त करते. भगवंताजवळ अशीच कृतज्ञता व धन्यता जेव्हा आपण व्यक्त करतो तेव्हा ती प्रार्थना हीच आपली खरी भक्ती होते. भगवंतांनी जे काही मला दिले



आहे त्यात मी तृप्त आहे. माझी काही तक्रार नाही. मी कृतज्ञ आहे. असा भाव जागृत होणे म्हणजे तुष्टी-संतुष्टी. भगवंताची कृपा झाली की असा आत्मतुष्ट भाव निर्माण होतो. नाहीतर भिकारी बनून भगवंताजवळ सतत याचना, कामना करणारा अशांत, असमाधानी रडका भक्त भगवंताला आवडत नाही. भगवंत सर्वज्ञ आहे. मुलाला काय पाहिजे हे न सांगतासुद्धा आईला समजते तसे भगवंताला कुणाला काय द्यावे व कुणाचे काय काढून घ्यावे हेही त्याला समजते. म्हणून कुणाला कधी यशाच्या शिखरावर नेतो तर कुणाला अपयशाच्या खाईत ढकलून देतो. एखाद्याला झोपडी देतो पण प्रसन्नतेचे अमृतही देतो. पण एखाद्याला टोलेजंग प्रासाद देऊनसुद्धा प्रसन्नतेचा प्रसाद देत नाही. एखाद्याच्या जीवनात सतत हास्याचे झरे निर्माण करतो तर एखाद्याला शेवटच्या श्वासापर्यंत दुःख व यातना वाट्याला देतो. काहींच्या वाट्याला सुखाची सर्व साधने येतात तर काहींना साध्या साध्या गरजांसाठी जिवाचे रान करावे लागते. समृद्धी, दारिद्र्य, मान, अपमान, यश, अपयश असे सर्व भाव-अभाव या परमेश्वराच्याच विभूती आहेत. असे निरनिराळे भाव व अभाव हे त्याचे ऐश्वर्य आहे.

मरीची, अत्री, अंगिरस, पुलस्त्य, पुलह, क्रतू व वसिष्ठ हे सात ऋषी. या सर्वांचे सामर्थ्य इतके प्रचंड होते की त्यांच्या आज्ञेबाहेर राजे व देवगणसुद्धा जाऊ शकत नव्हते. सनक, सनंदन, सनातन व सनत्कुमार हे चौघे वयाने लहान पण ज्ञानी आणि स्वायंभुव प्रभृती १४ मनू. हे ईश्वराच्या मनापासून निर्माण झाले म्हणून त्यांना भगवंताचे षडैश्वर्य लाभले. आता या विभूतींचे आकलन होण्यासाठी भगवंत एक अट घालीत आहेत.

**एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति तत्त्वतः ।**
**सोऽविकल्पेन योगेन युज्यते नात्र संशयः ।।७।।**

"माझी ही विभूती म्हणजे विस्तार. आणि योग म्हणजे हा विस्तार करण्याची युक्ती अगर सामर्थ्य यांतील तत्त्व जो जाणतो, त्याला स्थिरयोग प्राप्त होतो, यात शंका नाही." ।।७।।

याप्रमाणे भगवंताचे ऐश्वर्य व कौशल्य जो जाणतो तो अविचल होतो; त्याच्या साधनेत दृढता येते; स्खलन होत नाही, पतन होत नाही व बुद्धीत विकल्प नसल्याने चांचल्य राहत नाही. परमार्थात साधकाने अतिशय दक्ष, सावध असले पाहिजे. मोह, लोभ, क्रोध या आसुरी संपत्तीबरोबर श्रद्धेला तडा जाण्याच्या घटनाही भक्ताच्या जीवनात घडत असतात. पावलापावलावर संशयाचे, अविश्वासाचे, अस्थिरतेचे, दौर्बल्याचे, अनात्म्याचे, विचार-ढग अंतःकरणाच्या अवकाशात जमत असतात, पण साधकाने या कसोटीला

उतरले पाहिजे. बुद्धीची अविकम्प स्थिती, दृढता, खंबीरता, सावधता, अविचलता ज्याची टिकते तो साधनेत पुढे पुढे जातो. ईश्वराच्या कृपेला तो पात्र होतो. यशस्वी साधकांच्या जीवनकथा जशा आपण वाचतो तशा अयशस्वी साधकांच्या जीवनाचासुद्धा अभ्यास केला पाहिजे. केवळ दृढतेच्या अभावाने पतन झालेले साधक काही कमी नाहीत. ईश्वराची विभूती जाणल्यानंतर ही दृढता येते. माझ्या जीवनाचा सारथी भगवंतच आहे, तोच या विश्वाचे संचलन करणारा कर्ता आहे, सारे कर्तुमकर्तुम् त्याचेच आहे अशी दृढता जीवनात आली की मग अविकम्प योगाने तो साधक मंडित होतो.

- आता, भगवंत 'ज्ञानी'ची व्याख्या करताहेत. हा आठवा श्लोक सर्वार्थाने सुंदर आहे.

**अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते ।**
**इति मत्वा भजन्ते मां बुधा भावसमन्विताः ।।८।।**

''मी सर्वांचे उत्पत्तिस्थान व माझ्यापासून सर्व वस्तूंची प्रवृत्ती, हे जाणून शहाणे पुरुष भावयुक्त होत्साते मला भजत असतात.'' ।।८।।

गीतेमध्ये भगवंतांनी आपले कर्तेपण अनेक ठिकाणी व्यक्त केले आहे.

**''यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततं.''** (१८-४६)

''ज्याच्यापासून सर्व भूतांची प्रवृत्ती झाली आहे व ज्याने हे सर्व जग विस्तारिले किंवा व्यापले आहे,'' असे वारंवार म्हटले आहे. सर्व जगाला मीच जन्म देणारा आहे आणि या सर्वांची स्थिती माझ्यापासूनच आहे. जसा समुद्राच्या लाटांना आश्रय पाणीच असते त्याप्रमाणे ईश्वराशिवाय या जगात दुसरे काहीच नाही. संपूर्ण जग विष्णुमय आहे.

**ईशावास्यमिदं सर्वं यत्किञ्च जगत्यां जगत्** ।।ईश. उप. १०।।

''विठ्ठल जळी स्थळी भरला, रिता ठाव नाही उरला'' असे संत तुकारामांनी यथार्थ उद्गार काढले. या जगातील अणुरेणूत तोच भरून उरला आहे. माझे शरीर चालविणारा तोच आहे व सर्व प्राणिमात्रांच्या शरीरातही तोच आहे. अशा 'सोऽहं' बोधाने जो विश्वाकडे पाहतो, तो 'बुध' म्हणजे ज्ञानी असतो. **''तैसा मी एकवांचूनि काही । मन भिन्न भिन्न आन नाही.''** (ज्ञानेश्वरी) अशी दृढता अशा भक्ताच्या जीवनात आलेली असते. ही दृष्टी आली की, अंतःकरणात प्रेमभाव निर्माण होतो. पाण्यात मीठ पडले की जसे ते जलरूप होते, तसे विश्वाशी ते एकरूप झालेले असतात. जेव्हा भगवंतच कर्ता होतो, तेव्हा 'मी', 'माझे' हा अहंसुद्धा गळून पडतो. असा भक्त निर्भय, निरहंकारी, निःस्पृह, निरिच्छ राहून सर्व काही निष्काम भावनेने व ईश्वरार्पण बुद्धीने



करीत असतो. म्हणून या श्लोकाचे माहात्म्य जाणून त्यावर निरूपण करताना ज्ञानेश्वर माऊलींनी भक्तियोगाची व्याख्या केली आहे. ते म्हणतात,

**''जे जे भेटे भूत । ते ते मानिजे भगवंत ।**
**हा भक्तियोगु निश्चित । जाण माझा ।।''** (ज्ञाने. १०.११८)

''जो जो प्राणी दिसेल, तो तो प्रत्यक्ष परमात्मा आहे, असे समजावे. हा माझा भक्तियोग आहे असे निश्चित समज.''

असे झाल्यानंतर भेदाभेद तरी कसा राहणार? ''बुधा भावसमन्विताः'' हे आपल्या तत्त्वज्ञानाचे सार आहे. ज्ञान प्राप्त झाल्यावरही ज्याचे भाव टिकतात तोच खरा ज्ञानी विश्वाकडे ते प्रेमपूर्ण हृदयाने पाहतात. भगवान शंकराचार्य म्हणजे मूर्तिमंत ज्ञान! पण भावाने भरलेले हृदय व प्रेमपूर्ण अंतःकरण यामुळे त्यांनी मधुर स्तोत्रे रचली. ज्ञान व भाव जिथे एकत्र असतात तोच बुध म्हणजे ज्ञानी, शहाणा. बुद्धियुक्त भावाला गीतेने प्राधान्य दिले आहे. म्हणून ज्ञानाबरोबर हा भावही वाढला पाहिजे. हे या श्लोकात प्रतिपादिले आहे.

स्वामी रामतीर्थ हे असेच ज्ञानी पुरुष होते. त्यांच्यातसुद्धा ज्ञान व भाव याचा मधुर संगम झाला होता. सतत रामनामाचा जप असायचा. भगवंताला आपले सर्वस्व समर्पित करून आपल्याच भक्तीत तन्मय होऊन राहायचे. एक दिवस एका व्यक्तीने त्यांना विचारले, ''स्वामीजी, किती वाजलेत?'' उत्तर दिले, ''एक वाजलाय.'' पुन्हा दोन तासांनी त्याच व्यक्तीने हा प्रश्न विचारला व उत्तर मिळाले, ''एक वाजलाय!'' पुन्हा तिसऱ्यांदा प्रश्न विचारला व उत्तरही तेच मिळाले. ती व्यक्ती त्रासून, वैतागून स्वामींना म्हणाली, ''महाराज, आपले घड्याळ नादुरुस्त आहे किंवा खराब आहे. कारण एकच वेळ ते दाखवत आहे.'' स्वामीजींनी समजावत खुलासा केला, ''अरे बाबा, तू एकवेळ नव्हे दहा वेळा जरी विचारलेस तरी माझे उत्तर 'एकच' असेल. कारण या जगात त्या एकाचेच रूप, नाद निनादत आहे. माझ्या अंतःकरणात त्याचा एकच आवाज आहे. तुझ्याही अंतःकरणात तोच ध्वनी आहे. साऱ्या सृष्टीत, पाना-फुलांत, अणु-रेणूंत तोच एक वास करून राहिला आहे. तो परमात्मा सर्वत्र आहे. त्याचेच कालचक्र... त्याचीच सर्व शक्ती...'' ज्यांना सर्वत्र भगवंताचेच दर्शन होत होते, अशा स्वामींना संसारी पुरुष व्यावहारिक प्रश्न विचारत होता, ''किती वाजले?'' मग असा भगवंताला सर्वस्व अर्पण करणारा, भगवंताचा लाडका भक्त काय उत्तर देणार! अशा भक्तांना जळी-स्थळी, खाता-पिता, उठता-बसता फक्त भगवंताचाच ध्यास असतो.

अनेक जन्मांचा पुण्यसंचय असल्याशिवाय ईश्वराची ओढ लागत नाही. ''बहुता सुकृतांची जोडी । म्हणूनी विठ्ठल आवडी ।'' भगवंताचे नाव मुखात येण्यासाठी सुकृतांची रास पदरी असावी लागते. खऱ्या अर्थाने भक्ती करणारे भक्त नामस्मरणाच्या, ध्यानाच्या, कर्माच्या, ज्ञानाच्या साधनांनी केवळ भगवंताच्या रूपात तल्लीन झालेले असतात. एकदा का या रूपाचे ध्यान लागले की, मग प्रपंचातल्या भोग-विषयाविषयी अरुची निर्माण व्हायला लागते. जो आत्मलाभासारखे गोमटे काहीच पाहत नाही त्याला इंद्रिय विषयांचे आकर्षण राहत नाही. आत्मरती झालेला भक्त सतत अनुसंधान ठेवून, भगवंताच्या विविध लीलांत तन्मय होऊन नाचत असतो. अशा भक्तांच्या नामघोषांत भगवंताचा वास असतो. भगवंतालाही अशा भक्तांचे आकर्षण असते. अशा भक्तांना तो आपल्या हृदयात स्थान देतो. अशा भक्तांसाठीच सगुण रूप घेऊन त्याला मनुष्यलोकात पुनःपुन्हा यावे लागते. अशा भक्तांसाठी मी काय करतो, याचेच वर्णन पुढील श्लोकांत भगवान श्रीकृष्ण करीत आहेत.

**मच्चित्ता मद्‌गतप्राणा बोधयन्तः परस्परम् ।**
**कथयन्तश्च मां नित्यं तुष्यन्ति च रमन्ति च ।।९।।**
**तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।**
**ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते ।।१०।।**
**तेषामेवानुकम्पार्थमहमज्ञानजं तमः ।**
**नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ।।११।।**

''माझ्या ठिकाणी चित्त लावून व माझ्या ठायी जीव-प्राण ठेवून एकमेकाला बोध करीत व माझ्या कथा सांगत, त्यातच नेहमी संतुष्ट व रममाण असतात.'' ।।९।।

''त्याप्रमाणे नेहमी युक्त म्हणजे समाधानाने राहून प्रीतिपूर्वक मला भजणाऱ्या लोकांस ते मला येऊन पोचतील, असा (समत्व) बुद्धीचा योग मीच देत असतो.'' ।।१०।।

''आणि त्यांवर अनुग्रह करण्यासाठीच मी त्यांच्या आत्मभावात म्हणजे अंतःकरणात शिरून तेजस्वी ज्ञानदीपाने (त्यांच्या मनात) अज्ञानापासून उत्पन्न झालेल्या अंधकाराचा नाश करतो.'' ।।११।।

ज्यांच्या चित्तात सतत भगवंताचे स्मरण, चिंतन असते, ज्यांनी आपले चित्त भगवंताला अर्पण केले आहे ते 'मच्चित्त' भक्त! असे भक्त जीवनाच्या सर्व व्यवहारांत कर्तव्यभावनेने कार्यरत असतात. बाहेरून प्रवृत्ती व आत अंतःकरणात निवृत्ती असे त्यांचे रूप असते. हे भक्त मंदिरात असोत नाही



तर मंडईत, ऑफिसमध्ये, पेढीवर किंवा कारखान्यात... सुषुप्ती, निद्रा, जागृती अशा सर्व अवस्थांत त्यांचे चित्त भगवंताच्या ठायी एकरूप झालेले असते. नाहीतर पूजा चालू असताना किंवा मंदिरात मूर्तीसमोर उभा असताना सुद्धा आपले चित्त कुठे कुठे रमलेले असते हा एक संशोधनाचाच विषय असतो. अशा 'मच्चित्त' भक्तांच्या चित्ताची अवस्था द्रवीभूत होऊन त्यात केवळ भगवंताचा आकार स्थिर झालेला असतो. अशी स्थिर अवस्था प्राप्त होणे हीच भक्तीची उन्नत अवस्था! अशा अवस्थेत अंतःकरण-शुद्धी होऊन त्यांच्या विकार-विषयांचे उदात्तीकरण, विभूतीकरण होते. मन, बुद्धी व अहंकाराचे भगवंतचरणी समर्पण होते. असे भक्त समत्वबुद्धीने प्रपंचात वावरत असतात. तृप्त, आनंदी होऊन ते जे काही करतात, ते ईश्वरार्पण बुद्धीने व आत्मौपम्यवृत्तीने. ''आपणचि विश्व जाहला तरी भेदभावो सहजचि गेला।।'' द्वेष, मत्सर, क्रोध अशा विकारांना त्याने पचविलेले असते. विष्णुमय जगात वावरत असल्याने अशा भक्तांच्या हृदयात प्रेमच प्रेम बरसत असते. भगवंताच्या प्रेमाला पात्र होऊन, भगवंतासारखेच निःस्वार्थ प्रेम जगावर करीत असतात.

असा 'मच्चित्त'भक्त 'मद्‌गतप्राणः' असतो. 'ज्याने आपले संपूर्ण चैतन्य, प्राण भगवंताला अर्पण करून टाकले आहेत असा.' ज्यांचा श्वासही भगवंतमय झालेला असतो, अशा भक्तांना जीवन हा प्रभुप्रसाद वाटत असतो. सुख, दुःख सारे प्रभूचे, असे दृढपणाने वाटत असल्यामुळे जीवनात 'निर्भयता' आलेली असते. मृत्यूचे भय त्यांना नसते. मृत्यूचा सोहळा साजरा करण्यासाठी हरक्षणी ते तत्पर असतात. संपूर्ण विश्व ईशचैतन्याचाच आविष्कार आहे अशी बुद्धी झाल्यामुळे ते जिथे तिथे उत्साह, चैतन्य व आनंदाने वावरत असतात. भवसागरातील दुःखाच्या लाटा त्यांना विचलित करीत नाहीत. दुःखसुद्धा भगवंताचा प्रसाद समजून त्याचा आनंदाने स्वीकार करीत असतात. 'आनंदाचे डोही आनंद तरंग' अशी अवस्था झाल्यामुळे असे लोक 'तुष्यन्ति च रमन्ति च' होतात. तृप्त होऊन नाचत असतात. तुष्ट होऊन आनंदाची पेरणी करीत असतात. जीवन जगण्यासाठी आहे, ती एक क्रीडा आहे, असे समजून जीवनाकडे आशावादी दृष्टीने पाहत असतात. नैराश्य, उदासीनता, अकर्मण्यता, निष्क्रियता जाऊन, ईश्वराच्या सृष्टीतील प्रत्येक कणाकणातील आनंद लुटीत असतात. असे भक्त एकमेकांना बोध करीत करीत, भगवंताच्या कथा सांगत सांगत लोकांची दुःखे दूर करीत असतात. हृदयात आनंद दाटलेला असतो. अशा कोंडलेल्या आनंदाला भजन-कीर्तन-प्रवचन अशा साधनांनी ते लोकांना भगवंताविषयीच्या कृतज्ञतेची जाणीव करून देत असतात.

ज्याप्रमाणे पूर्ण विकसित कमळाची कळी आपला सुगंध दडवू शकत नाही, चंदनाचे झाड आपला सुवास दाबून ठेवू शकत नाही, त्याप्रमाणे हे 'मद्गतप्राण' भक्त जगात भगवंताचे वर्णन करीत आनंदाने विहार करीत असतात.

मागील श्लोकातील "बुधा भावसमन्विताः" व या श्लोकातील "तुष्यन्ति च रमन्ति च" ही भक्तीची उत्कट अवस्था भगवंतांनी इथे वर्णिली आहे. ही अवस्था ज्यांच्या जीवनात येते ते भगवंताचे लाडके पुत्र... परमभक्त! मग अशा भक्तांना मी 'बुद्धियोग' अर्पण करतो, हे भगवंतांनी आश्वासन दिले आहे. ज्यांच्या जीवनात केवळ भगवंताचे प्रेम आहे, अशा निरंतर प्रेमपूर्वक भक्ती करणाऱ्यांच्या अंतःकरणातील अज्ञानरूपी अंधकार मी नष्ट करतो, हे आश्वासन भक्तांना प्रेरक आहे. भगवंतालाच अशा प्रेमळ भक्तांची काळजी असते. उपासनेच्या विविध पायऱ्यांवर; ज्ञान प्रदान करून भगवंत अशा भक्तांना आपल्या जवळ करतो. ... आई जशी आपल्या तान्हुल्याला जवळ करते तसे... ज्ञान झाल्याशिवाय तमोरूपी अंधकार जात नाही व अंतःकरणशुद्धी झाल्याशिवाय विषय-विकार जात नाहीत. ज्ञानाशिवाय हे घडत नाही. म्हणून 'बुद्धियोग'! 'बुद्धियोग' म्हणजे ज्यांच्या बुद्धीत केवळ भगवंत आहे व जी बुद्धी सर्वार्थाने भगवंताशी जोडलेली आहे, अशा शुद्ध बुद्धीत ज्ञानाचा जन्म होतो. असे आत्मज्ञान म्हणजे भक्ताचा पुनर्जन्म! या ज्ञानाने दृष्टी बदलते व दृष्टी बदलली की सृष्टीही बदलते. सृष्टीतल्या भगवंताच्या चैतन्याची अनुभूती यायला लागते व सृष्टीविषयीची आसक्ती वाढते. ज्ञान झाल्यामुळे मी जीवस्वरूप नसून त्या चैतन्याचाच अंश आहे, याची जाणीव होते. प्रपंच जेव्हा ज्ञानाने जाणला जातो, तेव्हा तो प्रपंच न राहता परमार्थ होतो. प्रपंचाचा परमार्थ करणे व परमार्थाचा प्रपंच करणे हेच भक्तीत अभिप्रेत आहे. संसार व परमात्मा ह्या दोन वस्तू नाहीत. केवळ अज्ञानामुळे त्या वेगवेगळ्या वाटतात. यथार्थ ज्ञानाने प्रपंच व परमात्मा हे एकाच अस्तित्वाचे दोन अनुभव आहेत, ह्याची प्रचीती येते. ज्ञान प्राप्त झाले की प्रपंच परमार्थ वाटतो व अज्ञान असेल तर परमात्मा प्रपंचासमान भासतो. अशी बुद्धी मग भोगात रमत नाही. जी बुद्धी अक्षय्य सुखाकडे अनवरत आनंदाकडे नेते, ती बुद्धी अशाच 'मद्गतप्राण' भक्तांना मिळते. दुःख, वेदना देणारी प्रपंचातील बुद्धी ही अज्ञानाने ग्रासलेली आहे. पण भगवंताशी जोडलेली बुद्धी अज्ञानरूपी अंधकार नष्ट करणारी असते. या बुद्धियोगाने अंतर्ज्योती प्रज्ञा प्रगट होते व भेदमूलक अज्ञान नष्ट होते. म्हणून ज्ञानपूर्वक अनासक्ती व भक्तिपूर्ण आसक्ती म्हणजे बुद्धियोग! असा बुद्धियोग ज्याला प्राप्त होतो तो भगवंताच्या निकट जातो.



भगवंतमय होतो... पहिल्या ११ श्लोकांत स्वतः भगवंतांनी ही आश्वासने दिली आहेत. या श्लोकाधारेच पुढील श्लोकांचा अन्वयार्थ पाहायचा आहे.

अर्जुनाने पुढील श्लोकांत भगवंताच्या व्यापक स्वरूपाचे निवेदन केले आहे. अर्जुन म्हणाला,

**परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान् ।**
**पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुम् ।।१२।।**
**आहुस्त्वामृषयः सर्वे देवर्षिर्नारदस्तथा ।**
**असितो देवलो व्यासः स्वयं चैव ब्रवीषि मे ।।१३।।**
**सर्वमेतदृतं मन्ये यन्मां वदसि केशव ।**
**न हि ते भगवन्व्यक्तिं विदुर्देवा न दानवाः ।।१४।।**
**स्वयमेवात्मनात्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम ।**
**भूतभावन भूतेश देवदेव जगत्पते ।।१५।।**
**वक्तुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतयः ।**
**याभिर्विभूतिभिर्लोकानिमांस्त्वं व्याप्य तिष्ठसि ।।१६।।**

"तुम्हीच परम ब्रह्म, श्रेष्ठ स्थान, परम वस्तू (आहात). दिव्य व शाश्वत पुरुष, आदिदेव, अजन्मा, विभु म्हणजे सर्वव्यापी असे." ।।१२।।

"तुम्हांला सर्व ऋषी, तसेच देवर्षी नारद, असित, देवल व व्यासही म्हणतात आणि स्वतः तुम्हीही मला तेच सांगता." ।।१३।।

"हे केशवा! तुम्ही मला जे हे सांगता, ते सर्व मी सत्य मानतो. भगवन! तुमचे मूळ देवांना माहीत नाही आणि दैत्यांना माहीत नाही." ।।१४।।

"हे सर्व भूते उत्पन्न करणाऱ्या भूतेशा! देवदेवा, जगत्पते! हे पुरुषोत्तमा! तुम्ही स्वतःच आपण आपल्याला जाणता." ।।१५।।

"म्हणून तुमच्या ज्या दिव्य विभूती आहेत, ज्या विभूतींनी हे सर्व लोक व्यापून तुम्ही राहिला आहा, त्या आपणच मला (कृपा करून) पूर्णपणे सांगा." ।।१६।।

अर्जुन जसा महापराक्रमी होता, तसाच तो ज्ञानीही होता. तसा तो निःशंकही होता. पण भावपूर्ण अवस्थेत भगवंताची स्तुती करीत त्याने ही जिज्ञासा व्यक्त केली आहे. अर्जुनाचे सर्व प्रश्न हे आपल्या सर्वांचे प्रश्न आहेत. आज पाच हजार वर्षांनंतरसुद्धा या प्रश्नांची उत्तरे आपल्याला आवश्यक वाटतात. भक्तीत निःशंकतेला खूप महत्त्व आहे. साधनेत जे जे प्रश्न मनात उद्भवत असतात, त्यांचे पूर्ण निरसन झाल्याशिवाय प्रगती होत नाही. अर्जुनाच्या निमित्ताने परमपित्याला हे सर्व मानवजातीलाच सांगायचे आहे. श्रीकृष्णासारखा जगद्गुरू व अर्जुनासारखा महान शिष्य यांचे संवाद, नाट्य

हे दोघांपुरते नाही. अर्जुन हा आपला प्रतिनिधी आहे. भगवंताचे खरे दिव्य स्वरूप देवादिकांनाही माहीत नाही. बुद्धीच्या सामर्थ्यावर त्याला जाणणे अशक्य आहे. 'नेति, नेति' म्हणणाऱ्या वेदांनासुद्धा स्वरूपाचा थांगपत्ता लागला नाही. त्यामुळे हे दिव्य ज्ञान भगवंताकडूनच प्राप्त होऊ शकेल. आकाशाचे व्यापकत्व जसे आकाशालाच माहीत असते किंवा पृथ्वीचा भरीवपणा केवळ पृथ्वीच जाणते, तसे सर्व लोकांत व्यापून राहिलेल्या विभूतींना केवळ तो एक परमात्माच जाणतो. भगवंत अंशरूपाने आपल्यात आहे. कारण आपण आपुलिया बळे बोलू शकत नाही तर शरीराची सत्ता त्या चैतन्याच्या अंशात आहे. जसा तो सर्जक आहे तसा तो व्यापक आहे व अविकारी आहे. अशा व्यापकत्वाचा अनुभव कसा करायचा व त्या परमचैतन्याचे कोणकोणत्या भावात चिंतन करायचे, हा अर्जुनापुढील प्रश्न आहे. १४ व्या श्लोकात कृष्णाला पहिल्या प्रथमच तो भगवान म्हणतो आणि त्याला सांगतो की, तू जे सांगतोस ते सारे मला खरे वाटत आहे. जे मनात वाटते ते ते अर्जुन बोलून दाखवितो आहे. इथे त्याचे सरळ मन दिसते म्हणूनच त्याचे नाव अर्जुन होते. जो ऋजु म्हणजे जो सरळ मनाचा आहे तो अर्जुन! अर्जुन पुढील श्लोकांत नेमका प्रश्न विचारतो...

**कथं विद्यामहं योगिंस्त्वां सदा परिचिंतयन् ।**
**केषु केषु च भावेषु चिन्त्योऽसि भगवन्मया ।।१७।।**
**विस्तरेणात्मनो योगं विभूतिं च जनार्दन ।**
**भूयः कथय तृप्तिर्हि श्रृण्वतो नास्ति मेऽमृतम् ।।१८।।**

"हे योगिन! सदा तुमचे चिंतन करीत असता तुम्हांला मी कसे ओळखावे? आणि हे भगवन्! कोणकोणत्या पदार्थामध्ये मी तुमचे चिंतन करावे?" ।।१७।।

"हे जनार्दना! आपली विभूती व योग पुन्हा मला विस्ताराने सांगा. कारण, अमृततुल्य (हे तुमचे भाषण) ऐकताना माझी तृप्ती होत नाही." ।।१८।।

अर्जुनाला हे सर्व विस्ताराने ऐकायचे आहे. सातव्या व नवव्या अध्यायात तसेच या अध्यायाच्या प्रारंभी भगवंतांनी आपल्या काही मोजक्याच विभूती आधी सांगितल्या होत्या. त्याच विभूती पुन्हा एकदा विस्ताराने सांगण्याची अर्जुनाची विनंती आहे. ईश्वराचे रूप, गुण, शक्ती, तेज, वैभव सारे काही विलक्षण, अद्‌भुत आहे. तो सर्वत्र व्यापून आहे खरे पण त्याच्या सर्व विभूतींचे प्रत्यक्ष ज्ञान झाल्यास त्याचे विविध रूपाने चिंतन करता येईल. अर्जुन भगवंताला म्हणतो की, तुझे रूप तूच जाणतोस. आपणच आपल्या सर्व



विभूती संपूर्णपणे सांगण्यास योग्य आहात. त्यामुळे त्या आपणच सांगाव्यात.

दहावा अध्याय हे प्रभूचे प्रतिबिंब आहे. भगवंतांनी आपले सर्व ऐश्वर्य यात दाखविले आहे. विभूतियोग म्हणजे सृष्टीच्या वैभवाचे वर्णन! हे सर्व वैभव भगवंत अर्जुनासमोर प्रगट करीत आहेत. संपूर्ण सृष्टीत प्रभू भरून राहिला आहे. या सृष्टीविषयीचा पूज्यत्व भाव मनात येणे हीच भक्ती! या सृष्टीतील चराचरात, भूतमात्रात ईश्वराचा वास आहे, याची अनुभूती घेणे म्हणजे भगवंताचा स्पर्श होणे होय. सर्व संतांनी ही अनुभूती घेतली. 'जे जे भेटे भूत । ते ते मानिजे भगवंत ।' असे ज्ञानेश्वरांनी सांगितले. संत नामदेवांनी कुत्र्याला भाकरीवर तूप वाढण्यासाठी त्याच्या मागून धाव घेतली. सर्व प्राणिमात्रांत भगवंताचा वास आहे, याची अनुभूती झाल्यामुळे संत एकनाथांनी काशीहून आणलेली गंगेची कावड तहानलेल्या गाढवाला पाजली. संत तुकारामांनी तर प्रतिज्ञेवर सांगितले की 'विठ्ठल जळी स्थळी भरला । रिता ठाव नाही उरला ।' आणि असा भगवंत मी प्रत्यक्ष दृष्टीने पाहिला असा निर्वाळा त्यांनी दिला. रामकृष्ण परमहंसांनी आपल्या परम शिष्याला - विवेकानंदांना जगन्मातेची हाक ऐकविली. मुंगीपासून ब्रह्मांडापर्यंत सर्वत्र परमात्मा भरून राहिला आहे. 'ईशावास्यमिदं सर्वं' अशा सृष्टीतील अणूरेणूत तोच आहे. सृष्टीत नाना रूपांनी तो नटला आहे. असा भगवंत, स्वमुखाने आपण कुठे कुठे आहोत याचे दर्शन अर्जुनाला या अध्यायात घडवत आहे. या सर्व श्लोकांत, भगवंताच्या मूर्तीचे दर्शन घडते आहे. तशी गीतेच्या सर्वच श्लोकांत ईश्वराची शब्दमय मूर्ती विलसत आहे. पण १० व्या अध्यायात ती विशेषत्वाने जाणवते. श्री ज्ञानेश्वरांनी शेवटी निरूपण करताना म्हटले आहे... "**गीता जाणा हे वाङ्मयी । श्री मूर्ती प्रभूची ।।**" (ज्ञाने. १८.१६८४) हे ज्ञानेश्वरांचे उद्‌गार अतिशय समर्पक आहेत. म्हणून गीताशास्त्र हे स्वतःच परब्रह्मरूप होऊन गेले आहे.

भगवंत आता आपले विश्वव्यापी तत्त्वज्ञान अर्जुनाला सांगत आहेत.

**हंत ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतयः ।**
**प्राधान्यतः कुरुश्रेष्ठ नास्त्यंतो विस्तरस्य मे ।।१९।।**
**अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः ।**
**अहमादिश्च मध्यं च भूतानामंत एव च ।।२०।।**

"बरे, तर आता ज्या माझ्या दिव्य विभूती आहेत, त्यांपैकी हे कुरुश्रेष्ठा! मुख्य मुख्य तुला सांगतो. कारण माझ्या विस्ताराला अंत नाही." ।।१९।।

"सर्व भूतांच्या अंतरी असणारा आत्मा, हे गुडाकेशा! मी, आणि सर्व भूतांचा आदि, मध्य व अंतही मीच." ।।२०।।

'हन्त' शब्दाने भगवंत आपला आनंद प्रकट करताहेत. जीवनाकडे विशुद्ध भक्तीने पाहायला शिकणे ही आनंदाचीच गोष्ट आहे. जीवनात निखळ आनंद, पावित्र्य, मांगल्य, उदात्तता पाहण्यासाठी भगवंताचे व्यापकत्व कळले पाहिजे. संपूर्ण सृष्टी ही त्या सर्जकाची अभिव्यक्ती आहे. म्हणून ती आनंदाने भरली आहे. हे मांगल्यदर्शन घडल्यानंतरच दृष्टीत भगवंत येईल. संपूर्ण ब्रह्मांड विभूतींनी भरलेले आहे. या विभूती समजण्याची जितकी कुवत असेल तेवढ्या विभूती समजतील. म्हणून भगवान काही मोजक्याच पण मुख्य विभूती प्रसादरूपाने येथे सांगत आहेत. कारण भगवंताच्या व्यापकत्वाला अंत नाही. या नश्वर जगात जिथे अक्षय्य आनंद मिळेल तिथे भगवंताचे अधिष्ठान आहे, हे नक्की समजावे. सत्ता, संपत्ती, कीर्ती, पद, प्रतिष्ठा, प्रपंच या सर्व गोष्टींत सुखही आहे आणि दुःखही आहे. ऐहिक वस्तूतून सुख शोधण्याचा मनुष्याचा हव्यास अखंड चालत आला आहे. ज्याला सुख म्हणून कवटाळतो, ते अन्ततः दुःखकारक असते. पण याच जगात अशा काही वस्तू आहेत की, त्या सुखदुःखाच्या पलीकडे असलेला अनवरत, अक्षय आनंद देऊ शकतात. भगवंत हा आनंदस्वरूप असल्याने त्याच्या सर्व विभूती याही आनंददायकच आहेत. जे जे अतीव मंगल, पवित्र आहे, ते ते आनंद देणारे आहे. त्यात भगवंताची विभूती आहे. ''मी सर्वांच्या हृदयात स्थित असणारा आत्मा आहे.'' या अमृतमय शब्दांत पुढील सर्व विभूतिविस्ताराचे सार दडले आहे. भगवंताचे हे आश्वासन जर पुरेपूर समजले तर आपला कायापालट होईल. मी म्हणजे मर्त्य शरीर नाही, वरून दिसणारे पंचमहाभूतांचे कलेवर नाही, जन्म-मृत्यूच्या चक्रात सापडलेले व विकार-वासनांनी भरलेले शरीर नाही, तर या देहात असणारा भगवंताचाच अंश आहे. चैतन्यरूपाने तोच अंशही माझ्यात आहे, हे समजल्याशिवाय त्या परमात्म्याची सत्ता, ओळख, अस्तित्व, स्पर्श मला समजणार नाही हे निश्चित. पण हा सोऽहं बोध आपल्याला होत नाही हेच तर दुर्दैव! आपण आपली ओळख ज्या आरशातून करून घेतो, तो आरसा आपले बाह्य स्वरूपच दाखवितो. दुसऱ्यांच्या दृष्टीतून बरी-वाईट जी प्रतिमा शब्दावाटे येईल तीच आपली ओळख आपण समजतो. समाजाने आपल्याला चांगले म्हटले तर आपण चांगले, वाईट, दुष्ट म्हटले तर वाईट. मग आतून आपण कसे का असे ना? अनेक संत-महात्म्यांच्या वाट्याला समाजाची उपेक्षा, निर्भर्त्सना आली म्हणून का ते वाईट होते? त्यांच्या मृत्यूनंतर मात्र त्यांचे असाधारण माहात्म्य पटले व त्यानंतर मात्र शतकानुशतके त्यांना डोक्यावर घेतले. माझ्यात भगवंताचा वास आहे, म्हणून मी अमृतपुत्र आहे, ही माझी ओळख भगवंत या श्लोकात



करून देत आहेत. म्हणून त्या अंतरात्म्याला जाणण्याचा प्रयत्न करणे हेच आत्मज्ञान आहे. ''आत्मा वा अरे! द्रष्टव्यः मन्तव्यः श्रोतव्यः निदिध्यासितव्यः'' - हे उपनिषदांचे सांगणे आहे. याच नरदेहात, मृण्मय खेळण्यात त्या चिन्मयाचे अस्तित्व आहे व त्याची अनुभूती पाहून, ऐकून, ध्यान करून घेता येते, हे आपले केवढे मोठे भाग्य आहे! ''नर करनी करे तो नरका नारायण हो जाय'' । हे याच देहात होऊ शकते, हा भगवंताचा दिलासा आहे. भगवंताचे हे महान वक्तव्य आहे. जिथे जिथे जीवन आहे तिथे तिथे मी आहे. परमात्म्याने आपले अस्तित्व यात दाखवून दिले आहे. शरीरे अनेक आहेत पण सर्वांच्या शरीरात असणारा आत्मा एकच आहे. बाहेरून द्वैत पण आतून अद्वैत, बाहेर भेदाभेद पण आतून अभेद अशी आपली स्थिती आहे. जसे अनेक विजेचे बल्ब असावेत तेही वेगवेगळ्या आकारांचे पण ते प्रकाशमान झाले म्हणजे समजते की आतील ऊर्जा एकच आहे; तसा सर्वव्यापी आत्मा सर्वांच्या हृदयात भरून राहिला आहे. बुद्ध, महावीर, ज्ञानेश्वर, तुकाराम... सर्व संतांना हे जग विष्णुमय वाटायचे, त्याचे कारण या सर्वव्यापी आत्म्याची अनुभूती! सर्वांभूती परमेश्वर याचा साक्षात्कार झाल्याने सर्वांवर त्यांनी अपरंपार प्रेम, करुणा यांचा वर्षाव केला. सर्वांभूती परमेश्वर आहे, याची केवळ जाणीव जरी झाली तरी **''दुसऱ्यांचे दुःखे दुखावे । दुसऱ्याचे सुखे सुखावे । अवघेचि सुखी असावे । ऐसी वासना ।।''** (दासबोध) अशी वृत्ती साधकाची होते.

भगवंत या श्लोकाच्या उत्तरार्धात म्हणतात की, मी सर्व भूतमात्रांचा प्रारंभही आहे, मध्यही आहे व अंतही आहे. सर्वांचा प्रभव-प्रलय मीच आहे, प्रपंच-मोक्ष, शरीर-आत्मा सर्व काही मीच आहे. जसे आकाशातील ढगांना खाली, वर, आत, बाहेर सर्वत्र एक आकाशच आहे, त्या मेघांची उत्पत्ती, लय हे सर्व आकाशातच होते, त्याप्रमाणे प्राण्यांच्या उत्पत्तीला, अस्तित्वाला व नाशाला मीच आश्रय आहे. भारतीय दर्शन शास्त्राची हीच खासियत आहे की भगवंताला त्यांनी केवळ आकाशात ठेवले नाही. सर्व चराचरांत, प्राणिमात्रांत, अणुरेणूंत भगवंत भरून राहिला आहे. तोच या सर्वांचा पालन करणारा, हरण करणारा, जन्म देणारा आहे. जे जे दृश्यमान आहे, चैतन्यमय आहे, त्यात ईश्वराचे अस्तित्व आहे. भगवान श्रीकृष्ण अर्जुनाला गुडाकेश म्हणून हाक मारतात. गुडाकेश म्हणजे ज्याने निद्रेवर विजय मिळविला आहे असा. आता पुढील २० ते ३९ या वीस श्लोकांत भगवंत आपल्या प्रमुख दिव्य विभूती सांगत आहेत.

आदित्यानामहं विष्णुर्ज्योतिषां रविरंशुमान् ।
मरीचिर्मरुतामस्मि नक्षत्राणामहं शशी ।।२१।।
वेदानां सामवेदोऽस्मि देवानामस्मि वासवः ।
इन्द्रियाणां मनश्चास्मि भूतानामस्मि चेतना ।।२२।।
रुद्राणां शंकरश्चास्मि वित्तेशो यक्षरक्षसाम् ।
वसूनां पावकश्चास्मि मेरुः शिखरिणामहम् ।।२३।।
पुरोधसां च मुख्यं मां विद्धि पार्थ बृहस्पतिम् ।
सेनानीनामहं स्कंदः सरसामस्मि सागरः ।।२४।।
महर्षीणां भृगुरहं गिरामस्म्येकमक्षरम् ।
यज्ञानां जपयज्ञोऽस्मि स्थावराणां हिमालयः ।।२५।।
अश्वत्थः सर्ववृक्षाणां देवर्षीणां च नारदः ।
गंधर्वाणां चित्ररथः सिद्धानां कपिलो मुनिः ।।२६।।
उच्चैःश्रवसमश्वानां विद्धि माममृतोद्भवम् ।
ऐरावतं गजेंद्राणां नराणां च नराधिपम् ।।२७।।
आयुधानामहं वज्रं धेनूनामस्मि कामधुक् ।
प्रजनश्चास्मि कंदर्पः सर्पाणामस्मि वासुकिः ।।२८।।
अनंतश्चास्मि नागानां वरुणो यादसामहम् ।
पितृणामर्यमा चास्मि यमः संयमतामहम् ।।२९।।
प्रल्हादश्चास्मि दैत्यानां कालः कलयतामहम् ।
मृगाणां च मृगेंद्रोऽहं वैनतेयश्च पक्षिणाम् ।।३०।।

“(बारा) आदित्यांपैकी विष्णू मी, तेजस्व्यांमध्ये किरणमाली सूर्य, मरुतात मरीची मी आहे. नक्षत्रात चंद्र मी.” ।।२१।।

“मी वेदांपैकी सामवेद आहे. देवांपैकी इंद्र आहे आणि इंद्रियांमध्ये मन आहे. भूतांच्या ठायी चेतना म्हणजे प्राणाची हालचाल मी आहे.” ।।२२।।

“आणि (अकरा) रुद्रांमध्ये शंकर मी आहे. यक्षराक्षसात कुबेर. (आठ) वसूंमध्ये पावक मी आहे. (सात) पर्वतात मेरू मी.” ।।२३।।

“हे पार्था! आणि पुरोहितांमध्ये मुख्य जो बृहस्पती तो मी आहे असे समज. सेनानायकांत मी स्कंद (कार्तिकेय). जलाशयातला समुद्र मी आहे.” ।।२४।।

“महर्षींपैकी भृगू मी. वाणीमध्ये एकाक्षर म्हणजे ॐकार मी आहे. यज्ञांपैकी जपयज्ञ मी आहे. स्थावर म्हणजे स्थिर पदार्थांत हिमालय.” ।।२५।।

“सर्व वृक्षांमध्ये अश्वत्थ म्हणजे पिंपळ व देवर्षींमध्ये नारद व गंधर्वांपैकी चित्ररथ. सिद्धांपैकी कपिलमुनी.” ।।२६।।



“घोड्यांत (अमृतमंथनाचे वेळी निघालेला) उच्चैःश्रवस मी आहे, असे जाण. गजेंद्रांपैकी ऐरावत व मनुष्यांत राजा.” ।।२७।।

“आयुधात वज्र मी, गायींमध्ये कामधेनू मी आहे आणि प्रजोत्पादन करणारा काम मी आहे. सर्पांपैकी वासुकी मी आहे.” ।।२८।।

“आणि नागांमध्ये अनंत मी आहे. यादस् म्हणजे जलवासी भूतात वरुण मी. आणि पितरात अर्यमा मी आहे. नियमन करणाऱ्यांत यम मी.” ।।२९।।

“आणि दैत्यांपैकी प्रल्हाद मी आहे. ग्रासणाऱ्यांत काल मी. आणि पशूंपैकी मृगेंद्र म्हणजे सिंह मी. आणि पक्ष्यांत गरुड.” ।।३०।।

पवनः पवतामस्मि रामः शस्त्रभृतामहम् ।
झषाणां मकरश्चास्मि स्रोतसामस्मि जान्हवी ।।३१।।
सर्गाणामादिरंतश्च मध्यं चैवाहमर्जुन ।
अध्यात्मविद्या विद्यानां वादः प्रवदतामहम् ।।३२।।
अक्षराणामकारोऽस्मि द्वंद्वः सामासिकस्य च ।
अहमेवाक्षयः कालो धाताहं विश्वतोमुखः ।।३३।।
मृत्युः सर्वहरश्चाहमुद्भवश्च भविष्यताम् ।
कीर्तिः श्रीर्वाक्च नारीणां स्मृतिर्मेधा धृतिः क्षमा ।।३४।।
बृहत्साम तथा साम्नां गायत्री छंदसामहम् ।
मासानां मार्गशीर्षोऽहमृतूनां कुसुमाकरः ।।३५।।
द्यूतं छलयतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ।
जयोऽस्मि व्यवसायोऽस्मि सत्त्वं सत्त्ववतामहम् ।।३६।।
वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पांडवानां धनंजयः ।
मुनीनामप्यहं व्यासः कवीनामुशना कविः ।।३७।।
दंडोदमयतामस्मि नीतिरस्मि जिगीषताम् ।
मौनं चैवास्मि गुह्यानां ज्ञानं ज्ञानवतामहम् ।।३८।।
यच्चापि सर्वभूतानां बीजं तदहमर्जुन ।
न तदस्ति विना यत्स्यान्मया भूतं चराचरम् ।।३९।।

“वेगवानांत वायू मी आहे. शस्त्रधाऱ्यांत राम मी. आणि माशांमध्ये नक्र मी आहे. नद्यांत भागीरथी मी.” ।।३१।।

“हे अर्जुना! सृष्टिमात्राचा आदि, अंत व मध्यही मी. विद्यांपैकी अध्यात्मविद्या. वाद करणाऱ्यांचा वाद मी.” ।।३२।।

“अक्षरांपैकी अकार मी आहे. आणि समासांपैकी द्वंद्व. अक्षय काल

मीच. सर्वतोमुख म्हणजे चारी बाजूंनी मुखे असणारा धाता म्हणजे ब्रह्मदेव मी." ।।३३।।

"आणि सर्वांचा क्षय करणारा मृत्यू व पुढे जन्मास येणाऱ्यांचे उत्पत्तिस्थान मी. स्त्रियांपैकी कीर्ती, श्री, वाणी, स्मृती, मेधा, धृती व क्षमा मी." ।।३४।।

"तसेच साम म्हणजे गावयाच्या वैदिक स्तोत्रांत बृहत्साम (व) छंदांपैकी गायत्री छंद मी. महिन्यांत मार्गशीर्ष मी. ऋतूंत वसंत." ।।३५।।

"फसविणाऱ्यांचे द्यूत मी आहे. तेजस्व्यांचे तेज मी. (विजयशाली पुरुषांचा) विजय मी आहे. (निश्चयी पुरुषांचा) निश्चय मी आहे. सत्त्वशीलांचे सत्त्व मी." ।।३६।।

"यादवांपैकी वासुदेव मी आहे. पांडवांत धनंजय. मुनींपैकीही व्यास मी. कवींमध्ये शुक्राचार्य कवी." ।।३७।।

"शासन करणाऱ्यांचा दंड मी आहे. जयेच्छूंची नीती म्हणजे मसलत मी आहे. आणि गुह्यांपैकी मौनदेखील मी आहे. ज्ञान्यांचे ज्ञान मी." ।।३८।।

"तसेच हे अर्जुना! सर्व भूतांचे जे काही बीज ते मी. मला, सोडून असेल असे चराचर भूत नाही." ।।३९।।

अशा या एकूण ७२ विभूती! भगवंतांनी जड, चेतन या सर्वांच्या विभूती सांगितल्या. संपूर्ण सृष्टीच्या वैभवाचे हे वर्णन आहे. म्हणून तो विभूतियोग. प्रथम ब्राह्मणाचे विभूतिमत्व सांगितले. भृगु, नारद, कवि, व्यास वगैरे ब्राह्मणांच्या विभूती कथन केल्यानंतर क्षत्रियांचे विभूतिमत्व सांगितले. राम, वासुदेव, धनंजय, वासुकी, अनंत, प्रल्हाद वगैरे क्षत्रिय विभूती सांगितल्या. नंतर स्त्रीविभूती सांगितल्या आहेत. कीर्ती, श्री, वाक्, स्मृती, मेधा, धृती, क्षमा असे सात गुण स्त्रीत असले पाहिजेत. अशा गुणांनी युक्त असलेल्या स्त्रीचा जीवन-विकास होतो. ह्या सात विभूतींची नावे असलेल्या स्त्रिया होऊन गेल्या आहेत. कीर्ती नावाची स्त्री दक्षप्रजापतीची मुलगी व प्रियव्रत राजाची पत्नी होती. तिने भारतात महान सांस्कृतिक कार्य केले आहे. 'श्री' भृगू व ख्यातीची मुलगी होती. तिचा विष्णूशी विवाह झाला होता व ती स्वतंत्र वृत्तीची व तेजस्वी विचारांची स्त्री होती. 'स्मृती' ही दक्ष प्रजापतीची कन्या व अंगिरसाची पत्नी, 'मेधा' धर्म नावाच्या ऋषींची पत्नी व 'क्षमा' पुलह ऋषींची पत्नी. अशा तऱ्हेने या स्त्री-विभूतींचे वर्णन केले आहे.

देवांचे विभूतिमत्वही कथन केले आहे. वासव, विष्णू, शंकर, पवन, शशी, मरीची, वरुण, पावक वगैरे देवांच्या विभूती आहेत. नंतर पितरांच्या व यक्षगंधर्वांच्या विभूती सांगितल्या. गुणिजनांच्या गुणरूप विभूती, विद्येच्या,



वेदांच्या, पशु-पक्ष्यांच्या, इंद्रियांच्या, आयुधांच्या, जड वस्तूंच्या व शेवटी जन्म-मृत्यूंच्या अशा मुख्य मुख्य विभूतींचे वर्णन भगवंतांनी केले आहे.

हा विभूतियोग सृष्टीविषयी आत्मीयता व पूज्यभाव मनात निर्माण करतो. निसर्गाकडे पाहिले की त्या सर्जकाच्या महानतेची जाणीव होते. त्याच्याविषयीची कृतज्ञता मनात दाटून येते. निसर्ग खूप काही शिकवितो. तसा तो गुरुस्थानी आहे. शिष्य जसा गुरुसान्निध्यात राहून शिकतो तसे निसर्गात राहून खूप गोष्टी शिकता येतील. प्राचीन काळच्या ऋषिमुनींनी हे निसर्गाचे पुस्तक वाचले व संस्कृती संपन्न केली. आपले यज्ञ-याग, गुरुकुळे निसर्गाच्याच कुशीत ठेवली. विद्याभ्यासासाठी सृष्टीचे पुस्तक शिष्यगणांसमोर ठेवले. त्यामुळे भगवंताविषयीची कृतज्ञतेची, आत्मीयतेची, प्रसन्नतेची भावना त्यांच्यात निर्माण व्हायची. आपल्या संस्कृतीत, त्यामुळेच वृक्षवेलींची पूजा, गाय - बैल अशा प्राण्यांविषयीचा पूज्यभाव संपन्न झाला आहे. गवळ्याला गाय केवळ दूध देणारी वाटत नाही. भारताच्या कानाकोपऱ्यात निरनिराळ्या सणांच्या, उत्सवांच्या प्रसंगी त्यांची पूजा केली जाते. लोकवाङ्मयात अशा पशु-पक्ष्यांच्या, वृक्ष-वेलींच्या, डोंगर-नद्यांच्या अनेक कथा भावविश्व संपन्न करून जातात. निसर्ग व मानव यांच्यातील हा मधुरभाव या अध्यायात प्रकट झाला आहे.

आजच्या या विज्ञानकाळात पर्यावरणाचा प्रश्न बिकट होत चालला आहे. सृष्टीकडे पाहण्याचा दृष्टिकोण बदलल्याशिवाय हा प्रश्न सुटणार नाही. गीतेने पाच हजार वर्षांपूर्वीच ही दृष्टी या अध्यायातून दिली आहे. भारतीय दृष्टिकोणात ही निसर्गपूजा आहे, पशु-पक्ष्यांवरील प्रेम आहे. या आत्मीयतेतूनच विभूतिपूजा निर्माण होते. नदी लोकमाता होते, गाय गोमाता होते, गंगा गंगामैया होते, तुळस-पिंपळ-वटवृक्ष यांना देवत्व येते. सृष्टी म्हणजे आरसा. तुम्ही जसे असाल तशीच सृष्टी तुम्हांला दिसते. जशी दृष्टी तशी सृष्टी! सृष्टीत मांगल्य, पावित्र्य पाहायचे असेल तर दृष्टी निकोप ठेवा. केवळ उपयुक्ततेच्या भावनेतून, भोगवादी भावनेने गेलात तर विभूतिपूजा होणार नाही. परमेश्वराचा स्पर्श जाणवणार नाही. विकारमय, विषयमय, भोगमय वृत्तीने आज जडवाद बोकाळला आहे. दृष्टीवरचे हे पटल दूर झाल्याशिवाय सृष्टीतील भगवंत दिसणार नाही. सर्वत्र परमात्मा पाहावा हे सांगण्यासाठीच १० व्या अध्यायाची योजना झाली आहे. स्थूलातून सूक्ष्माकडे जाण्याचा हा मार्ग आहे. आधी पर्वत, आकाश, नद्या, सागर, यांतून त्याचे दर्शन घ्यायचे. मग अणूरेणूंतून, कणाकणांतून, पानापानांतून त्याची प्रचीती घ्यायची. माता, पिता, गुरू, संत, लहान मूल या सर्वांतून जसा भगवंत

पाहायचा तसाच तो सृष्टीच्या वैभवातून पाहायचा. सूर्याचे दर्शन म्हणजे परमात्म्याच्या दिव्य तेजाचे दर्शन आहे. आकाशातील असंख्य देदीप्यमान तारे, नभांगण, विशाल सरोवरे, अथांग सागर, पर्वत-दऱ्यांवरून वाहणारा चैतन्यपूर्ण वारा, प्रकाशमान करणारा अग्नी... ही सारी ईश्वराची रूपे आहेत. हे सर्व त्याचे वैभव आहे. यातच जीवन आहे. जसे निसर्गाचे तसे पशु-पक्ष्यांचे रामायणात पिता-पुत्रप्रेम, भ्रातृप्रेम, पत्नीप्रेम हे सर्व काही आहे. पण वानरांशी मैत्री हा रामायणाचा प्राण आहे. कृष्णाचे गायी-वासरांवरील प्रेम, नागपूजेची प्रथा, शाकुंतलातील शकुंतलेचे वृक्ष-वेलींवरील अतूट प्रेम, कोकिळेचे मधुर कूजन, मोराचा अद्भुत सुंदर पिसारा या सर्वांतून परमात्मा दर्शन देत उभा आहे. म्हणूनच संत तुकारामांना वृक्षवल्ली सग्या-सोयऱ्यासारखे वाटले. ते म्हणाले, ''देव आहे सुकाळ देशी, अभाग्यासी दुर्भिक्ष्य।।'' संतांना ही दृष्टी होती. स्थूलातील परमेश्वर पाहायला शिकल्याशिवाय अंतःस्थ सूक्ष्मातील भगवंत कसा कळणार? शेवटी अशी एकही जागा नाही की जेथे परमेश्वराचे अस्तित्व नाही.

अशा प्रकारे अनंत रूपांनी नटणारे ब्रह्म हे सत् चित् आनंद असे त्रिविधरूप आहे. सद्ब्रह्म हे आपल्या योगमायेने अनंत ब्रह्मांडे उभारण्याचे असंख्य व्यापार करीत असते. जगातल्या यच्चयावत् वस्तू या ब्रह्माच्या अस्तित्वामुळेच अस्तित्व पावतात, त्याच्याच चिच्छक्तीच्याच योगाने त्या आनंदित होत असतात. म्हणजे सच्चिदानंद ब्रह्माचीच ती लहान-महान रूपे होत. यामुळेच प्रत्येक वस्तूच्या अंतर्यामी त्याच्या अस्तित्वाचा, भातित्वाचा आणि प्रीतित्वाचा अंश हा असतोच. उपनिषदातून ईश्वराच्या सृष्टिविलासाचा असा सिद्धान्त विशद झाला आहे. प्रत्येक दर्शनकाराने असे काही वैश्विक सिद्धान्त सांगितले आहेत. त्यातील सांख्यांचा विकासवाद अथवा परिणामवाद, नैयायिक व वैशेषिकांचा परमाणूवाद व वेदांतीयांचा ब्रह्मपरिणामवाद ही तीन मते प्रभावी आहेत. त्यात सांख्य जगाच्या सुरुवातीमध्ये प्रकृती नावाचे तत्त्व मानतात. प्रकृती व पुरुष. त्यातून जगाची उत्पत्ती झालेली आहे असे ते मानतात. नैयायिकांनी वैज्ञानिकांप्रमाणे आपली भूमिका मांडली. ज्याच्यातून सृष्टी निर्माण झाली ते तत्त्व म्हणजे परमाणू. काही वेदांती सांख्यांना धरून चालतात तर काही वेदांती नैयायिकांचे मत मानतात. सांख्यांच्या प्रकृतीला पकडून चालणाऱ्या वेदांतीयांना माया नावाचे तत्त्व मानावे लागले. गीता हा अशा तत्त्वज्ञानाची सखोल चर्चा करणारा ग्रंथ नाही. १० व्या अध्यायात तर बिलकूल नाही. येथे भगवंत आपल्या लाडक्या सख्याला स्वतःचे मन्तव्य सांगत आहेत. न्यायदर्शनाच्या दृष्टीने गीता येथे स्वतंत्र विचार सांगत आहे.



२१ व्या शतकातील विज्ञानही त्याच वाटेवर आहे. आज विज्ञान जड मानीत नाही. अणुशक्तीचा शोध लागल्यानंतर केवळ जडतत्त्व राहिले नाही. परमाणू चेतन आहे हे मान्य केल्यावर जडवाद राहतच नाही. 'Science Today & Tomorrow' व 'Frustration of Science' ही पुस्तके लिहिणारे केम्फर्ड (Campherd) म्हणतात, ''विचारवंतांना जर विज्ञानाच्याही पुढे पाऊल टाकायचे असेल तर ते पाऊल अध्यात्माचे आहे. त्याशिवाय दुसरे पाऊल ते टाकूच शकत नाहीत.''

विज्ञान व अध्यात्म दोन्हीही एकाच सत्याचा शोध घेतात. फक्त मार्ग भिन्न. या अध्यायात भगवंत स्पष्ट सांगतात की, जगाचा आदि, मध्य व अन्त मीच आहे. अणुरेणूतही तोच आहे. मुंगीपासून ब्रह्मांडापर्यंत सर्वत्र तोच भरून राहिला आहे. या सृष्टीत नाना रूपांनी तोच विलसत आहे. अशा या एकूण ७२ विभूतींचे हे वर्णन आहे. भगवंतांच्या केवळ एका अंशाचे हे मर्यादित वर्णन आहे. म्हणून भगवंतांनी हे समजावण्यासाठी अर्जुनाला सांगितले की, जेथे जेथे ऐश्वर्य आहे, कांती, शक्ती, वैभव तसेच कोणत्याही अभिव्यक्तीचे शिखर आहे, तेथे तेथे माझाच अंश आहे. हे सर्व माझ्यापासूनच आहे असे जाण. भगवंताच्या षड्गुणांपैकी ऐश्वर्य, शोभा हा एक गुण आहे. अकबर-बिरबल यांच्या जीवनातील एका प्रसंगात, भगवंताच्या या ऐश्वर्यगुणाचे उत्कटतेने दर्शन घडते. अकबर बादशहाला नेहमी वाटायचे की, तानसेनचे सूर ही भगवंताची कृपा आहे, त्याचा प्रसाद आहे. एक दिवस तानसेनचे संगीत ऐकताना अकबराच्या मनात विचार आला की, तानसेनपेक्षा या जगात कोणी सवाई गायक असेल का? निश्चितच! तानसेनचे गुरू तरी वरचढ असतील. मग त्या गुरूचे गाणे ऐकण्यासाठी खजिना रिकामा झाला तरी चालेल पण ते श्रेष्ठतम गाणे ऐकायचेच, असा निश्चय अकबर बादशहाने केला. तानसेनला बोलावून आपली इच्छा त्यांनी सांगितली. तानसेन म्हणाला, ''कितीही बिदागी दिली तरी माझे गुरू दरबारात गाणार नाहीत. अहंकाराने ते असे म्हणत नाहीत तर त्यांच्या गाण्यावरील ईश्वरीय श्रद्धेमुळे! त्यांच्या अंतर्यामात ज्या वेळी स्वयंस्फूर्त स्फुरण येते तेव्हाच ते वाद्याला हात लावतात. मग ते झोपडीत असोत अगर राजवाड्यात. कोणत्याही वेळी ते गाऊ शकतात पण आजकाल ते ब्राह्ममुहूर्तावर प्रभूची स्तुती गातात. मग कधी दोन वाजता गातील, कधी चार वाजता. आपल्या झोपडीत बसून ते गात असतात. फकिराची अवस्था स्वीकारल्यामुळे ते आपल्याच मस्तीत, गानसमाधीत असतात. कुणाचा अडथळा त्यांना आवडत नाही. म्हणून आपण रात्री झोपडीच्या मागे लपून त्यांचे गाणे ऐकू शकतो.'' अकबर बादशहाने हे सर्व आनंदाने

मान्य केले. पहाटे चारच्या सुमारास ते दिव्य गाणे ऐकण्याची दैवदुर्लभ संधी राजाला मिळाली. राजाने कानात प्राण आणून संगीताचा स्वर्गीय आनंद लुटला. तानसेनपेक्षा अधिक श्रेष्ठ असे गाणे ऐकल्यावर राजा तानसेनला म्हणाला, ''तुझ्या गुरूशी तुझी तुलनाच होऊ शकत नाही. हा असा एवढा फरक तुझ्या अन् त्यांच्या गाण्यात कसा?'' तेव्हा तानसेन नम्रतेने म्हणाला, ''मी काही प्राप्त करण्यासाठी गातो तर माझे गुरू सर्वकाही प्राप्त झाल्यामुळे, तृप्त होऊन केवळ दिव्यानंदासाठी गात असतात. त्यांच्यासाठी संगीत हा आत्मा आहे. म्हणून आत्मतृप्त होऊन प्रभूसाठी ते गात असतात.'' अकबर बादशहाला त्याचे मर्म समजले. बादशहा म्हणाला, ''आयुष्यात पहिल्यांदाच संगीताचे ऐश्वर्य पाहिले. एखाद्या कलेत सर्वोच्च शिखर कसे असते ते जाणले.''

म्हणून १० व्या अध्यायात भगवंतांनी पुनःपुन्हा सांगितले की, असे कोणतेही ऐश्वर्य जेथे प्रकट होते तेथे मीच अंशरूपाने व्यक्त होत असतो. भगवंताची पूर्ण कृपा झाल्याशिवाय असे ऐश्वर्य प्रकट होत नाही. ऐश्वर्याचे दर्शन हेच ईश्वराचे दर्शन! भगवंताच्या तेजाने ते तेज विलसते म्हणून तेथे ईश्वराचाच वास असतो.

१० वा अध्याय भगवंताचे स्वरूप विशद करणारा अध्याय आहे. भगवंताचे रूप सागरासारखे आहे. भगवंताच्या विभूती या, त्या सागरावरील लाटांसारख्या आहेत. केवळ लाटांना जाणून भगवंताप्रत जाता येणार नाही. ईश्वराला आपण आकार देतो. ज्याला आकार नाही, जो सर्वव्यापी आहे त्याला आपण निरनिराळी नावे ठेवतो. सागरावरच्या लहरींना आपण ईश्वराचे पूर्ण रूप मानतो व खऱ्या सागराला दूर ठेवतो. सागर विशाल आहे. लाटा वरवरच्या आहेत. सागराला जाणायचे असेल तर त्यात बुडी मारावी लागेल. झोकून द्यावे लागेल. जो अज, अमर, सदोदित आहे तो परमात्मा, सागर आहे. व जे येतात, काही काळ राहतात व सागरात विलीन होऊन जातात त्या लाटा आहेत, विभूती आहेत. विभूती म्हणजे प्रतिमा! ईश्वराला प्राप्त करण्यासाठी प्रतिमा जरूर पाहिजेत पण प्रतिमातच अडकायचे नाही. केवळ प्रतिमांचेच चिंतन करून ईश्वर प्राप्त होत नाही. सागराच्या किनाऱ्यावर राहून सागराचे स्वरूप समजत नाही. विभूतींना पकडून ईश्वराप्रत जायचे भान सतत ठेवले पाहिजे. जसे मैलाचे दगड असतात. आपल्या ध्येयाप्रत जाण्याच्या मार्गावर असणारे मैलाचे दगड केवळ दिशा, मार्ग दाखवितात. मैलाच्या दगडाजवळ थांबायचे नाही. हे दगड म्हणजे प्रतीकासारखे असतात. केवळ त्यांचीच पूजा करीत राहिले तर अंतिम ध्येयाप्रत जाता येणार नाही.



ही प्रतीके आपल्याला मार्गदर्शक जरूर ठरतात पण तेथेच थांबायचे नाही. या अध्यायात भगवंतांनी ज्या विभूती सांगितल्या आहेत त्या सर्व ईश्वराप्रत जाणाऱ्या महायात्रेच्या किनाऱ्यावर असणारे मैलाचे दगड आहेत. ही सर्व प्रतीके निश्चित उपयोगी ठरणारी आहेत. पण ती अंतिम नाहीत याची पक्की जाणीव ठेवली पाहिजे. मंदिर, गुरुद्वार, मशीद, चर्च... ही सर्व प्रतीके भक्तांना परमतत्त्वाकडे नेणारी आहेत. फक्त त्यांनाच सर्वस्व मानून तिथेच थांबायचे नाही. भगवंतांनी हे विश्वव्यापी तत्त्वज्ञान या अध्यायात सांगितले आहे. विभूतिपूजा म्हणजे मूर्तिपूजा व्यापक करणे. मूर्तीतच भगवंताला जखडून न ठेवता त्याला मूर्तीबाहेर काढले पाहिजे. प्रथम स्थूलपूजा, नंतर गुणपूजा व शेवटी तत्त्वपूजा असा क्रम आध्यात्मिक विकासासाठी स्वीकारला पाहिजे. गणेशचतुर्थी आली की, मूर्तीची प्रतिष्ठापना करायची व मग त्याच मूर्तीचे विसर्जन करायचे. विसर्जन म्हणजे त्याच मूर्तीला सर्वत्र पाहणे. स्थूलपूजेतून गुणपूजेकडे जाणे. मूर्तीतले तत्त्व व्यापक करायचे. चित्ताची एकाग्रता साधण्यासाठी स्थूलपूजा अत्यंत आवश्यक आहे. मूर्तिपूजा ही भारतीय संस्कृतीची जगाला देणगी आहे. निराकार, निर्गुण, अज, अक्षर, अमर परमात्मतत्त्वाला सगुण रूपात पाहायचे. म्हणून ही पूजा शास्त्र समजून करायची. आपण ज्या एकाग्रतेने मूर्तीत भगवंताला पाहत होतो त्याच समग्रतेने त्याला संपूर्ण सृष्टीत पाहू लागलो म्हणजे त्या मूर्तीला - प्रतिमेला - प्रतीकाला व्यापक करण्याची प्रक्रिया सुरू होते. असे झाले की, मनुष्याची जगाकडे पाहण्याची दृष्टीही बदलते. आत्मौपम्य दृष्टीने जगाकडे पाहता पाहता, त्याची भोगवृत्ती जाऊन विभूतियोगापर्यंत त्याची उन्नती होते. आपल्या प्राचीन ऋषिमुनींनी या अनुभूतींचे सार ग्रंथरूपाने आपल्याला आधीच देऊन ठेवले आहे. सृष्टीकडे जडवादी, भोगवादी वृत्तीने न पाहता विभूतीच्या दृष्टीने पाहावे. हे सांगण्यासाठी या अध्यायाची योजना गीतेच्या मध्यावर झाली आहे. भारतीय संस्कृतीत निसर्गपूजेतून विभूतिपूजा याचसाठी साकार झाली आहे. ही पूज्यबुद्धी आल्यावर सृष्टीत सर्वत्र भगवंत दिसतो. सृष्टीतल्या सर्व वस्तू भगवद्रूप दिसणे ही भक्तीची फलद्रूप साधना होय. संपूर्ण जग विभूती आहे हे सांगण्यासाठी भगवंताने आपल्या विभूती सांगितल्या.

या सर्व विभूती सांगितल्यानंतर शेवटच्या तीन श्लोकांत भगवंत आपल्या अमर्याद स्वरूपाची पुन्हा जाणीव करून देतात -

**नांतोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनां परंतप ।**
**एष तूद्देशतः प्रोक्तो विभूतेर्विस्तरो मया ।।४०।।**

**यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा ।**
**तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसंभवम् ।।४१।।**
**अथवा बहुनैतेन किं ज्ञातेन तवार्जुन ।**
**विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत् ।।४२।।**

''हे परंतपा! माझ्या दिव्य विभूतींना अंत नाही. विभूतींचा हा विस्तार (केवळ) दिग्दर्शनार्थ मी सांगितला आहे.'' ।।४०।।

''जी जी वस्तू वैभव, लक्ष्मी किंवा प्रभाव यांनी युक्त आहे, ती ती माझ्या तेजाच्या अंशापासून झाली आहे, असेच तू समज.'' ।।४१।।

''अथवा हे अर्जुना! तुला हा पसारा जाणून काय करायचे? (थोडक्यात सांगतो की) मी आपल्या एकाच अंशाने हे सर्व जग व्यापून राहिलो आहे.'' ।।४२।।

- केवळ एका अंशाने हे जग व्यापून राहिलेल्या भगवंतांचा महिमा किती अमर्याद आहे! ''स्थिरचर व्यापुनि दशांगुळे उरला,'' असे म्हटले आहे. या अध्यायात ''भरला घनदाट हरी दिसे,'' हे सार अर्जुनाला भगवंतांनी समजावून सांगितले आहे. अर्जुन शांत, प्रसन्न राहून हे वैभव जाणून घेतो व पुढे भगवंतांना विचारतो, की ''ह्या सर्व विभूती कोठे आहेत? आणि भगवंताला स्वतःचे रूप दाखवायला भाग पाडतो. म्हणून विश्वरूपाचे प्रात्यक्षिक ११ व्या अध्यायात योजले आहे. विभूतियोग समजल्यावरच हा अध्याय समजेल.

**।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**



## अध्याय अकरावा
## विश्वरूपदर्शनयोग

भगवंतांनी दहाव्या अध्यायात आपल्या दिव्य विभूतींचे वर्णन केल्यावर परमेश्वराचे हे विश्वरूप पाहण्याची अर्जुनास इच्छा होऊन त्याच्या प्रश्नावरून भगवंतांनी त्याला जे विश्वरूप दाखविले त्याचे वर्णन या अध्यायात आहे. गीता ही प्रत्यक्ष भगवंतांनी गायिली आहे. या अध्यायातील शब्द-सौंदर्य, भाषाशैलीच्या वैविध्यपूर्ण छटा, नेमक्या शब्दांतून प्रकट झालेले कलात्मक व भावपूर्ण वर्णन यांमुळे ११ वा अध्याय म्हणजे संस्कृत भाषेतील अत्युत्कृष्ट साहित्यकृतीचा एक आदर्श नमुना झाला आहे. अध्यात्मशास्त्र सांगतानासुद्धा इतक्या अत्युत्तम काव्याची रचना करता येते हे व्यासांनी या अध्यायात सिद्ध केले आहे.

या अध्यायात शांत व अद्‌भुत रसांचा उत्कट आविष्कार साधला आहे. शांत रसाच्या घरी अद्‌भुत रस हा पाहुणचारास आला आहे. पण इतर रसांनाही यांच्या पंक्तीचा मान मिळाला आहे. त्यामुळे ११ वा अध्याय हा प्रयाग-क्षेत्रच बनला आहे. अर्जुनावरच्या, भगवंताच्या प्रेमाला इथे भरती आली आहे. अर्जुनाने केवळ विचारण्याचाच अवकाश की, भगवंतांना किती आणि कसे देऊ याचेच कोडे पडले आहे. वासरू पाहिले की लागलीच प्रेमाने गाय खडबडून उभी राहते. मग प्रत्यक्ष तिच्या स्तनांची व वासराच्या मुखाची गाठ पडल्यावर तिला पान्हा फुटणार नाही का ? आजवर कोणाही भक्ताला न दाखविलेले अद्‌भुत विश्वरूप आता अर्जुन पाहणार आहे. दहाव्या अध्यायातच याची पूर्वसूत्रे आली आहेत. केवळ एका अंशानेच हे जग जर व्यापून राहिले आहे, तर संपूर्ण विश्वाचा विस्तार किती प्रचंड असला पाहिजे! हे जग म्हणजे विश्वाचा एक लहानसा भाग. पण त्याचेही आकलन आपल्या चर्मदृष्टीला होत नाही. अंधाऱ्या रात्री स्वच्छ आकाशात लुकलुकणाऱ्या तारका पाहिल्या की ब्रह्मांडाची पुसटशी कल्पना येते. पण पुढे विचार करायला लागलो की आपल्या बुद्धीची झेप काही मर्यादेपलीकडे जात नाही. या अनादि अनंत विश्वाचा विस्तार, स्थळ-काळ यांच्या अमर्यादतेत पसरलेला आहे. पण या सर्वांत तो विराट परमेश्वर भरून उरला आहे. असा भगवंत त्यांच्या दिव्य विभूतींसह एकाच वेळी पाहावयास मिळावा व ते दर्शन आपण

घ्यावे अशी इच्छा अर्जुनाला झाली आहे. या दिव्य इच्छेतून हा अध्याय प्रगट झाला आहे. हा अध्याय म्हणजे अर्जुनावरच्या प्रेमाचा प्रसाद आहे.

प्रथम अर्जुन असे विचारतो की....

**मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसंज्ञितम् ।**
**यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम ।।१।।**
**भवाप्ययौ हि भूतानां श्रुतौ विस्तरशो मया ।**
**त्वत्तः कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाव्ययम् ।।२।।**
**एवमेतद्यथाऽऽत्थ त्वमात्मानं परमेश्वर ।**
**द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वरं पुरुषोत्तम ।।३।।**
**मन्यसे यदि तच्छक्यं मया द्रष्टुमिति प्रभो ।**
**योगेश्वर ततो मे त्वं दर्शयात्मानमव्ययम् ।।४।।**

''माझ्यावर अनुग्रह म्हणून अध्यात्मसंज्ञक जी परमगुह्य गोष्ट तुम्ही सांगितली त्याने माझा हा मोह नाहीसा झाला.'' ।।१।।

''तसेच हे कमलपत्राक्षा! भूतांची उत्पत्ती व लय आणि (तुमचे) अक्षय माहात्म्यादी तुमच्यापासून मी सविस्तर ऐकले.'' ।।२।।

''(आता) हे परमेश्वरा! तुम्ही आपले हे जसे वर्णन केले तशा प्रकारे तुमचे ईश्वरी स्वरूप हे पुरुषोत्तमा ! मी (प्रत्यक्ष) पाहू इच्छितो.'' ।।३।।

''हे प्रभो! तशा प्रकारचे रूप मी पाहणे शक्य आहे असे जर तुम्हांस वाटत असेल, तर हे योगेश्वरा ! तुम्ही आपले अव्यय रूप मला दाखवा!'' ।।४।।

पहिल्या श्लोकात मोह-नाश झाल्याची कबुली अर्जुनाने दिली आहे. विश्वरूपदर्शनाच्या आधीच अर्जुनाचा मोह-निरास झाला आहे. पहिल्या सहा अध्यायांत जीवाच्या स्वरूपाचे वर्णन आहे. सात ते दहा अध्यायांपर्यंत परब्रह्माच्या स्वरूपाचे वर्णन झाले. सातव्या अध्यायात ज्ञान-विज्ञान सांगण्यास सुरुवात करून सातव्या व आठव्या अध्यायांत परमेश्वराच्या अक्षर, अव्यक्त रूपाचे वर्णन तसेच नवव्या व दहाव्यात व्यक्त रूपांचे, विभूतींचे जे ज्ञान सांगितले, त्यासच 'अध्यात्म' ही संज्ञा अर्जुनाने पहिल्या श्लोकात दिली आहे. हे अध्यात्म-ज्ञान झाल्यामुळे आपला मोह निरास झाला आहे असे अर्जुन प्रथमच सांगतो. १८ व्या अध्यायात "नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा......" अशी पुनरुक्ती जरी केलेली असली तरी या अध्यायात त्याची कबुली आरंभीच अर्जुनाने दिली आहे. पहिल्या अध्यायात अर्जुनाला मोह झाला. तो दूर करण्यासाठी दुसऱ्या अध्यायात ज्ञानयोग सांगितला पण त्याचाही फारसा उपयोग न झाल्याने ३,४,५ या अध्यायांत कर्मयोग सांगितला व



त्यानंतरच्या ७ ते १० अध्यायांत भगवंतांनी स्वमुखाने भक्तियोग कथन केला. हे सर्व अध्याय ऐकून अर्जुनाला अध्यात्मज्ञान यथार्थपणे समजले व त्याचा निर्वाळा त्यांनी पहिल्याच श्लोकात मांडला. वास्तविक ही तृप्ती आहे. पण त्यातही शक्य असेल तर भगवंताचे परम ऐश्वर्यसंपन्न रूप पाहण्याची अभिलाषा अर्जुनाला झाली आहे. माझी योग्यता असेल तरच मला तुझे रूप दाखव असे म्हणण्यात अर्जुनाची नम्रता, ऋजुता, अनाग्रह, स्पष्टोक्ती दिसून येते. अर्जुनाच्या अंतःकरणातील हे सर्व भाव 'मन्यसे....' या शब्दातून व्यक्त झाले आहेत. अर्जुनात अलौकिक गुण होते. तो अत्यंत बुद्धिमान, शूर असूनसुद्धा तितकाच हळवा, मृदू, कोमल अंतःकरणाचा होता. ऋजुता हा अर्जुनाचा स्थायिभाव होता. श्रीकृष्णावर अपरंपार भक्ती होती. म्हणूनच विश्वरूप पाहण्यास तो सर्वथैव पात्र होता. पहिल्या चरणात 'प्रभो' असे संबोधिले आहे व पुढील चरणांत पुन्हा त्यांना 'हे योगेश्वरा!' असे प्रार्थिले आहे. अर्जुनाला दिव्य स्वरूप पाहायची उत्कंठा आहे. तो ईश्वर की, जो योगेश्वर आहे. स्वतःमध्ये सर्व शक्तिमत्त्व, सर्वज्ञत्व, सर्वव्यापकत्व, तेजस्विता, सर्वगुणसंपन्नता, सामर्थ्यसंपन्नता अशा षड्गुणांनी, स्वभाववैशिष्ट्यांनी युक्त आहे. धनंजयाचे हे भावपूर्ण शब्द ऐकून श्री भगवान म्हणाले,

**पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशः ।**
**नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च ।।५।।**
**पश्यादित्यान्वसून्रुद्रानश्विनौ मरुतस्तथा ।**
**बहून्यदृष्टपूर्वाणि पश्याश्चर्याणि भारत ।।६।।**
**इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम् ।**
**मम देहे गुडाकेश यच्चान्यद् द्रष्टुमिच्छसि ।।७।।**
**न तु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा ।**
**दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम् ।।८।।**

" हे पार्था ! माझी अनेक प्रकारांची आणि अनेक रंगांची व आकारांची (ही) शेकडो अथवा हजारो दिव्य रूपे पाहा." ।।५।।

"हे पाहा, (बारा) आदित्य, (आठ) वसू, (अकरा) रुद्र, (दोन) अश्विनीकुमार, तसेच (एकूण पन्नास) मरुद्‌गण! हे, भारता ! पूर्वी कधीही न पाहिलेली अनेक आश्चर्ये पाहा." ।।६।।

"हे गुडाकेशा ! आज येथे एकत्र झालेले सर्व चराचर जग आणि दुसरेही जे काय तुला पाहण्याची इच्छा असेल ते माझ्या (या) देहात पाहून घे." ।।७।।

"परंतु तुझ्या याच दृष्टीने मला तू पाहू शकणार नाहीस, तुला मी दिव्य दृष्टी देतो. (तिने) माझा हा ईश्वरी योग म्हणजे योगसामर्थ्य पाहा !" ।।८।।

अर्जुनावरच्या प्रेमामुळे भगवान किती उतावळे झाले आहेत ! "पाहा पाहा" म्हणून आपली दिव्य रूपे त्यांनी दाखववयास सुरुवातही केली. जे विश्वरूप इंद्रियगोचर नाही, चर्मचक्षूंना पाहणे शक्य नाही ते अर्जुन पाहणार तरी कसे ? दगडावर पेरलेले बीज जसे उगवत नाही तशी अवस्था अर्जुनाची झाली. 'पश्य मे पार्थ' असे म्हणून त्यांनी आपले दिव्य रूप दाखविले व नंतर भगवंताच्या ध्यानात आले की, दिव्यदृष्टी प्रदान केल्याशिवाय अर्जुन हे पाहू कसे शकणार! भक्त भगवंताला किती वेड लावू शकतात, हे अर्जुनाच्या भक्तीने इथे व्यासांनी दाखविले आहे. संत नामदेवांच्या हट्टासाठी श्री विठोबांनी भोजन केले, श्री एकनाथांच्या घरी श्रीखंड्या म्हणून पडेल ते काम केले, श्रीरामकृष्णांच्या आर्त हाकेला कालिमातेने दर्शन दिले.... अशी भक्तांची इच्छा पूर्ण करणारे भगवंत इथेसुद्धा भक्तवत्सल झाले आहेत. संतांना ही दिव्यदृष्टी लाभली होती. पंचमहाभूतांनी बनलेल्या या मृण्मय देहातील मर्त्य इंद्रिये बदलल्याशिवाय ही दिव्यानुभूती येऊ शकत नाही. मन, बुद्धी, चित्त, अहंकार हे सर्व विशुद्ध झाल्याशिवाय ही दृष्टी कशी येणार ? भगवंताच्या अस्तित्वाचा स्पर्शसुद्धा व्हावयाचा असेल तरी हे सर्व दिव्यरूप व्हावयास पाहिजे. जन्मतःच जे संस्कारबंधनाच्या जन्मोजन्माच्या गाठी घेऊन आलो आहोत, त्यातून मुक्त झाल्याशिवाय स्वस्वरूपाची दिव्य अनुभूती येऊ शकत नाही. जिवंतपणी पुन्हा पुनर्जन्म होण्याचा हा प्रकार आहे. येशू खिस्तांनी म्हटल्याप्रमाणे ``Ye must be born again" ! संत तुकारामसुद्धा हीच भाषा वापरतात. "मीच मज व्यालो, पोटी आपुलीया आलो" ही स्थिती आल्यानंतरच ईश्वराच्या अनुभूतीसाठी या देहाला पात्रता प्राप्त होईल. अर्जुनाच्या निमित्ताने, श्री भगवान कृष्णांनी समस्त जगाला हा संदेश दिला आहे. दिव्य दृष्टी म्हणजे दिव्य साधने प्राप्त होणे. दिव्य प्रकाश पाहण्यासाठी तेजस्वी दृष्टी यावी लागते. अमृत प्राशन करण्यासाठीसुद्धा बळ यावे लागते. भगवंत आपले अस्तित्व नाना साधनांनी प्रगट करत असतो पण त्याची अनुभूती घेण्याचे सामर्थ्य कठोर साधनेने मिळत असते. अर्जुनासमोर सारथी म्हणून भगवंत सतत होते. पण 'योगेश्वरांचे रूप पाहण्याची अंतर्दृष्टी, ज्ञान, अर्जुनाजवळ नव्हते.

'दिव्यं ददामि' म्हणून भगवंतांनी अर्जुनाला दिव्यचक्षू दिले. परमतत्त्व अगोचर, अतिन्द्रिय आहे. आपली इंद्रिये जड आहेत. मन, बुद्धीची मर्यादा



आहे. त्यामुळे अशा इंद्रियांनी भगवंताचे दर्शन होणे दुरापास्त आहे. ज्यांची अंतःप्रज्ञा जागृत झाली, ज्यांचे अंतःस्वरूप जागे झाले त्यांनी भगवंताच्या अस्तित्वाची अनुभूती घेतली आहे. ज्यांना आंतरिक आनंदाच्या अनुभूती येतात, ते आत्मलाभ प्राप्त करतात, मग प्रपंचाच्या भोगानंदात ते रममाण होत नाहीत. त्यांची आसक्ती, अहंकार, ममत्व सुटलेले असते. येथे अर्जुन भाग्यवंत आहे, म्हणून प्रत्यक्ष भगवंत त्याला दिव्य दृष्टी देणारे डोळे देत आहेत. अत्यंत कठोर साधना, दृढनिश्चय, अविचल निष्ठा, दुर्दम्य अव्यभिचारिणी श्रद्धा असल्याशिवाय परमार्थाचे हे फळ प्राप्त होत नाही. परमार्थात यशस्वी साधकांची आपण चरित्रे वाचतो पण अयशस्वी साधकांचीसुद्धा चरित्रे वाचली पाहिजेत. भक्तीच्या राजमार्गावरून वाटचाल करीत असताना मध्येच निराशेने वाट सोडणारेसुद्धा असंख्य आहेत. मोहवश होऊन भोगात रुतणारे साधक काही कमी नाहीत. भल्याभल्यांची वाताहत होते. किनारा दिसत असतो पण मध्येच धीर सुटतो, अवधान हरपते, धैर्य लुप्त होते व पथभ्रष्ट होतात.

नव्या जगाचा शोध घेण्यासाठी सफरीवर निघालेले कोलंबस व त्याचे साथीदार यांचे उदाहरण बोलके आहे. साधना अध्यात्मातील असो अगर कोणतेही उत्तुंग ध्येय प्राप्त करण्याची असो, मनाची दृढता, धैर्य या दैवी गुणांची अत्यंत आवश्यकता आहे. कोलंबसच्या बोटीतील तीन महिन्यांचे सर्व धान्य व इतर सामग्री संपत आली होती. कोलंबसचे सर्व साथीदार हतबल झाले होते. अत्यंत निराश होऊन सर्वांनी मिळून रात्री एक योजना आखली. ज्या कोलंबसने आपल्याला या मृत्यूच्या दाढेत ढकलले त्याला समुद्रात फेकून देऊन ठार करण्याचे त्यांनी ठरविले. हवालदिल झालेल्या आपल्या सहकाऱ्यांचे बोलणे त्यांनी ऐकले. सहकाऱ्यांना वाटले होते, कोलंबस झोपेत आहे. उठून त्यांनी सर्वांना विनविले, "हे पाहा, आपण निघताना तीन महिन्यांचा शिधा घेतला होता. आता फक्त तीन दिवसांचाच शिल्लक आहे. एवढ्या दिवसांत किनारा गाठता येणार नाही म्हणून तुम्ही निराश झाला आहात. आता माझ्यावर एक अखेरचा विश्वास ठेवा. माझी पुरेपूर खात्री आहे की, आपल्याला नवा प्रदेश दिसणार व किनाऱ्याला आपण निश्चित पोहोचणार. शेवटचा एक पल्ला शिल्लक आहे. मला ठार करून तुम्ही मायदेशीही परतू शकणार नाही. राहिलेल्या तीन दिवसांत, निश्चित आपल्याला ध्येय गाठता येईल." कोलंबसवर सर्वांनी पुन्हा विश्वास ठेवला. व घडलेही तसेच कोलंबसने नवा देश शोधून काढला. जगात तो कीर्तिवान झाला. जीवनात अनेक वेळा असे घडते. शेवटच्या टप्प्यात माणसे निराशेने

गर्भगळीत होतात व ध्येयापासून दूर जातात. दृढता व निष्ठा यांनी एक अंतर्दृष्टी प्राप्त होते. अंतरीचा आवाज साथ देतो. नवी दृष्टी प्राप्त होते. परमार्थातही हा अंतर्चक्षू उघडण्यासाठी भगवंताच्या कृपेबरोबरच दुर्दम्य साधनेची आवश्यकता आहे.

श्रीव्यासांच्या प्रतिभेचा उत्तुंग आविष्कार या पुढील श्लोकांत झाला आहे. उत्कृष्ट नाट्य-माध्यमाचा वापर यात करून रंगमंचकावरील पात्रे व स्थान यांत बदल केला आहे. युद्धभूमीवरून थेट धृतराष्ट्राच्या राजवाड्यात! दुर्योधनादी दुष्ट बंधूंच्या अंध राजपित्याला संजय युद्धभूमीवरचा वृत्तान्त कथन करीत आहे. संजयची 'खास वार्ताहर' म्हणून नियुक्ती झाली आहे. सत्याच्या, न्यायाच्या बाजूने त्याची सहानुभूती आहे. संपूर्ण युद्ध-संहार टाळणे ज्याच्या हातात होते, पण पुत्रप्रेमाने अंध झालेल्या धृतराष्ट्राला निवेदन करीत असता, हे राजा, एवढ्याच शब्दांत तो राजाला संबोधितो. पण पांडवांच्या बाजूने असलेल्या भगवान श्रीकृष्णांना मात्र 'महायोगेश्वर' व सत्य, न्याय यांची प्रतिस्थापना करणारा ''हरिः'' अशी संज्ञा वापरतो. संजय म्हणाला,

**एवमुक्तो ततो राजन्महायोगेश्वरो हरिः ।**
**दर्शयामास पार्थाय परमं रूपमैश्वरम् ।।९।।**
**अनेकवक्त्रनयनमनेकाद्‌भुतदर्शनम् ।**
**अनेकदिव्याभरणं दिव्यानेकोद्यतायुधम् ।।१०।।**
**दिव्यमाल्याम्बरधरं दिव्यगंधानुलेपनम् ।**
**सर्वाश्चर्यमयं देवमनंतं विश्वतोमुखं ।।११।।**
**दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता ।**
**यदि भाः सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः ।।१२।।**
**तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा ।**
**अपश्यद्देवदेवस्य शरीरे पांडवस्तदा ।।१३।।**
**ततः स विस्मयाविष्टो हृष्टरोमा धनंजयः ।**
**प्रणम्य शिरसा देवं कृतांजलिरभाषत ।।१४।।**

संजय म्हणाला, ''याप्रमाणे बोलल्यावर मग हे राजा, धृतराष्ट्रा ! योगांचा मोठा ईश्वर जो हरी त्याने अर्जुनाला (आपले) श्रेष्ठ ईश्वरी रूप म्हणजे विश्वरूप दाखविले.'' ।।९।।

''त्याला म्हणजे त्या विश्वरूपाला अनेक तोंडे व डोळे असून त्यात अनेक अद्‌भुत देखावे दिसत होते व त्यावर अनेक प्रकारचे दिव्य अलंकार असून अनेक प्रकारची दिव्य आयुधे उभारलेली (चमकत) होती.'' ।।१०।।



''त्या अनंत, सर्वतोमुख व सर्व आश्चर्यांनी भरलेल्या देवास दिव्य सुगंधाची उटी लाविली होती व त्याने दिव्य पुष्पे व वस्त्रे धारण केलेली होती.'' ।।११।।

''आकाशात एक हजार सूर्यांची प्रभा जर एकदम उठेल, तर ती त्या माहात्म्याच्या कांतीसारखी दिसेल.'' ।।१२।।

''देवदेवाच्या या शरीरात नानाप्रकारे विभागलेले सर्व जग एकत्र झाले आहे असे अर्जुनाच्या तेव्हा दृष्टीस पडले.'' ।।१३।।

''मग आश्चर्याने थक्क होऊन त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले आणि शिरसा नमस्कार करून व हात जोडून तो देवाला म्हणाला.'' ।।१४।।

दिव्यदृष्टी प्राप्त झाल्यानंतर श्रीकृष्ण परमात्म्यांनी आपला ऐश्वर्ययोग दाखविला. बालपणी, जेव्हा श्रीकृष्णांनी माती खाल्ली होती, तेव्हा यशोदेने त्यास रागावून हाताने धरले व तोंड उघडावयास सांगितले. त्या निमित्ताने श्रीकृष्णांनी यशोदामातेला विस्तारासह चौदाही लोक आपल्या मुखात दाखविले. संजयाच्या शब्दांत भगवंताच्या विश्वरूपाचे त्रोटक असे चित्रण आले आहे. 'अनेकानेक मुखे व नेत्र असलेले', 'अनेक विस्मयकारक दृश्ये असलेले', 'अनेक दिव्यालंकार असलेले' अशा सर्व शब्दसमुच्चयांतून भगवंताच्या विराट रूपाचे काव्यमय वर्णन श्रीव्यासांनी केले आहे. त्या विराट पुरुषाची तेजस्वी प्रभा हजारो सूर्य जर एकाच वेळी आकाशात उगवले तर जवळजवळ त्यांच्या प्रभेइतकी झाली असती. भगवंताच्या या दिव्य रूपामध्ये अनेकविधतेच्या नाना प्रकारांचे संपूर्ण ब्रह्मांड एकत्रित झालेले अर्जुनाने पाहिले. हे अनुभवातीत दृश्य पाहिल्यावर अर्जुनामध्ये विस्मयाची भावना व रोमांच उभे राहिले. अर्जुनाच्या शरीरावरील रोमांचाइतकेच त्याच्या अंतःकरणातील विस्मय-भावनादेखील संजयाने टिपल्या. युद्धभूमीवरील बारीकसारीक तपशील कथन करण्यात संजय कुशल होता. अर्जुनाच्या नेमक्या स्थितीचे वर्णन संजयाने केले आहे. हे सर्व पाहिल्यावर अर्जुनाचे अंतःकरण आत्मिक आनंदाने भरून आले. पूज्यभावाने सद्‌गदित, कृतार्थ होऊन भगवंताला हात जोडून त्याने नमस्कार केला व भगवंताला तो म्हणाला,

**''पश्यामि देवांस्तव देव देहे**
**सर्वांस्तथा भूतविशेषसंघान् ।**
**ब्रह्माणमीशं कमलासनस्थ -**
**मृषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान् ।।१५।।**
**अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं**
**पश्यामि त्वां सर्वतोऽनंतरूपम् ।**

नान्तं न मध्यं न पुनस्तवादिं
पश्यामि विश्वेश्वर विश्वरूप ।।१६।।
किरीटिनं गदिनं चक्रिणं च
तेजोराशिं सर्वतो दीप्तिमन्तम् ।
पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं सन्ताद्
दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम् ।।१७।।
त्वमक्षरं परमं वेदितव्यं
त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।
त्वमव्ययः शाश्वतधर्मगोप्ता
सनातनस्त्वं पुरुषो मतो मे ।।१८।।
अनादिमध्यांतमनंतवीर्य -
मनंतबाहुं शशिसूर्यनेत्रम् ।
पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं
स्वतेजसा विश्वमिदं तपन्तम् ।।१९।।
द्यावापृथिव्योरिदमंतरं हि
व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः ।
दृष्ट्वाद्भुतं रूपमुग्रं तवेदं
लोकत्रयं प्रव्यतिथं महात्मन् ।।२०।।
अमी हि त्वां सुरसंघा विशन्ति
केचिद्भीताः प्रांजलयो गृणन्ति ।
स्वस्तीत्युक्त्वा महर्षिसिद्धसंघाः
स्तुवन्ति त्वां स्तुतिभिः पुष्कलाभिः ।।२१।।
रुद्रादित्या वसवो ये च साध्या
विश्वेऽश्विनौ मरुतश्चोष्मपाश्च ।
गंधर्वयक्षासुरसिद्धसंघा
वीक्षन्ते त्वां विस्मिताश्चैव सर्वे ।।२२।।

''अर्जुन म्हणाला, ''हे देवा ! तुमच्या या देहात सर्व देव आणि नाना प्रकारच्या भूतांचे समुदाय, तसेच कमलासनावर बसलेला (सर्व देवांचा) स्वामी ब्रह्मदेव, सर्व ऋषी आणि सर्व दिव्य सर्पही मला दिसत आहेत.'' ।।१५।।

''अनेक बाहू, अनेक उदरे, अनेक तोंडे व अनेक नेत्र असणाऱ्या अनंतरूपी तुम्हांलाच मी चोहोंकडे पाहतो. पण हे विश्वेश्वरा ! तुमचा ना अंत, ना मध्य, किंवा ना आदिही मला (कोठे) दिसत नाही.'' ।।१६।।



''किरीट, गदा व चक्र धारण करणारे, चोहोंकडे प्रभा फाकलेले, तेजःपुंज, रखरखीत, अग्निसूर्याप्रमाणे देदीप्यमान, डोळ्यांनी पाहण्यासही अशक्य आणि अपरंपार (भरलेले) असे तुम्हीच मला जिकडे तिकडे दिसत आहा.'' ।।१७।।

''तुम्हीच अखेरचे ज्ञेय अक्षर, (ब्रह्म) तुम्हीच या विश्वाचे शेवटचे आधार, तुम्हीच अव्यय असून शाश्वत धर्माचे रक्षक आणि सनातन पुरुष तुम्ही, असे मला वाटते.'' ।।१८।।

''आदि, मध्य किंवा अंत नसून ज्याला अनंत बाहू, चंद्र व सूर्य हे ज्याचे डोळे आणि पेटलेला अग्नी हे ज्याचे तोंड, असे अनंतशक्तिमान तुम्हीच आपल्या तेजाने या सर्व जगाला तापवीत आहा, असे मी पाहतो.'' ।।१९।।

''कारण आकाश व पृथ्वी यामधील हे (सर्व) अंतर आणि सर्व दिशा तुम्ही एकट्याने व्यापून टाकल्या आहेत व तुमचे हे अद्‌भुत व उग्र रूप पाहून हे महात्मन् ! त्रैलोक्याची (भीतीने) गाळण उडाली आली आहे.'' ।।२०।।

''हे पाहा, देवांचे हे गण तुमच्या ठायी प्रवेश करीत आहेत व (काही) भयाने हात जोडून प्रार्थीत आहेत (आणि) 'स्वस्ति' 'स्वस्ति' असे म्हणून पुष्कळ प्रकारच्या स्तोत्रांनी महर्षी व सिद्ध यांचे गण तुमचे स्तवन करीत आहेत.'' ।।२१।।

''(तसेच) रूद्र व आदित्य, वसु आणि जे साध्य गण ते, विश्वदेव, (दोन्ही) अश्विनीकुमार व मरुद्‌गण व पितर आणि गंधर्व, यक्ष, राक्षस व सिद्ध यांचे मेळे सर्वच विस्मित होऊन तुमच्याकडे पाहत आहेत.'' ।।२२।।

तिन्ही काळांत व तिन्ही स्थळांत, सर्वत्र चराचरात भरून राहिलेला विराट परमेश्वर एकाचवेळी पाहावयास मिळावा ही अर्जुनाची इच्छा भगवंतांनी पूर्ण केली. अर्जुनाने या दिव्यरूपाचे वर्णन वरील श्लोकांत केले आहे. या विश्वरूप वर्णनावर कोण कसले भाष्य करणार ? हे पवित्र, मंगल श्लोक केवळ चिंतनीय आहेत.

१५ व्या श्लोकापासून अर्जुन भगवंताच्या रूपाचे वर्णन करीत आहे. ब्रह्मांडाच्या साऱ्या शक्ती, दिव्य स्वरूप, भगवंताच्या विविध रूपांचे जे जे वर्णन व स्तुतिपर स्तोत्रे ऋषिमुनींनी केली होती ती आजवर त्याने कानांनी ऐकली होती. पण तोच महिमा आज अर्जुन प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहत होता. अर्जुन या अनुभूतींनी रोमांचित झाला. साधनेत जेंव्हा प्रत्यक्ष अनुभूती यायला लागते तेव्हा साधकाचीही दशा अशीच होते. भगवंतांनी मनुष्याला अनंत शक्तींचे वरदान दिले आहे. मनुष्याच्या मस्तिष्कामध्ये

अशा अनेक अद्भुत शक्ती सुप्तावस्थेत आहेत. विज्ञान म्हणते की, मनुष्य केवळ २ ते १० प्रतिशत शक्तींचा वापर करतो. बाकीच्या शक्ती झोपलेल्या अवस्थेत असतात. साधनेच्या बळावर ज्यांच्या शक्ती जेवढ्या प्रमाणात जागृत होतात तेवढी ती माणसे महान होतात. अमेरिकेचे राष्ट्रपती जॉर्ज वॉशिंग्टन यांचे सहकारी, बेंजामिन फ्रँकलीन अशीच एक अद्भुत शक्ती धारण करणारी व्यक्ती होती. शूर योद्धा, संगीतज्ञ, पत्रकार, नामवंत खेळाडू, राजनीतिज्ञ, लेखक, कवी अशा विविध अंगांनी त्याचे चतुरस्र व्यक्तिमत्त्व संपन्न झाले होते. एकदा फ्रँकलीनला असे विचारले की, कोणत्या दिव्य शक्तींनी व देवतांनी त्याला वरदान दिले आहे. तेव्हा फ्रँकलीन म्हणाला, "मला सहा दिव्य देवतांनी वरदान दिले आहे. सतत या देवता माझ्याबरोबर असतात. यातील पहिली देवता म्हणजे उत्साह, दुसरी आशा, तिसरी प्रसन्नता, साहस, श्रद्धा व समर्पण. या देवता माझ्याबरोबर असतात व मीही त्यांच्या समवेत असतो." खरे म्हणजे या देवी-देवता आपल्याही अंतर्यामी वसत असतात, पण त्या जागृत नसतात. या देवता म्हणजे मनुष्याच्या अंतःकरणातील दैवी शक्ती-दैवी गुण आहेत. अनंत ऊर्जेची शक्ती भगवंतांनी सर्वांना दिली आहे. सर्व देवी-देवता अंशरूपाने मनुष्याच्या देहात आहेत. म्हणून नराचा नारायण होण्याचे ठरविले तर मनुष्य 'याचि देहीं याची डोळा' ते अमृततत्त्व प्राप्त करू शकतो. अर्जुनाने भगवंताच्या देहात या सर्व शक्तींचे दर्शन घेतले. प्रथम अर्जुनाच्या देहातील दिव्य शक्ती जागृत झाली. दिव्य दृष्टी लाभल्यावरच त्याने भगवंताच्या देहातील अद्भुत शक्तींचे दर्शन घेतले. व नंतर पुन्हा त्याचे वर्णन करावयास सुरुवात केली.

भगवंताच्या विराट, दिव्यरूपाचे वर्णन पुढील श्लोकात अर्जुनाने सुरू ठेवले आहे, तो म्हणतो,

**"रूपं महत्ते बहुवक्त्रनेत्रं**
**महाबाहो बहुबाहूरुपादम् ।**
**बहूदरं बहुदंष्ट्राकरालं**
**दृष्ट्वा लोकाः प्रव्यथितास्तथाहम् ।।२३।।**
**नभःस्पृशं दीप्तमनेकवर्णं**
**व्यात्ताननं दीप्तविशालनेत्रम् ।**
**दृष्ट्वा हि त्वां प्रव्यथितांतरात्मा**
**धृतिं न विंदामि शमं च विष्णो ।।२४।।**
**दंष्ट्राकरालानि च ते मुखानि**
**दृष्ट्वैव कालानलसंनिभानि ।**



**दिशो न जाने न लभे च शर्म**
**प्रसीद देवेश जगन्निवास ।।२५।।**
**अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः**
**सर्वे सहैवावनिपालसंघैः ।**
**भीष्मो द्रोणः सूतपुत्रस्तथासौ**
**सहास्मदीयैरपि योधमुख्यैः ।।२६।।**
**वक्त्राणि ते त्वरमाणा विशन्ति**
**दंष्ट्राकरालानि भयानकानि ।**
**केचिद्विलग्ना दशनांतरेषु**
**संदृश्यन्ते चूर्णितैरुत्तमांगैः ।।२७।।**
**यथा नदीनां बहवोऽबुवेगाः**
**समुद्रमेवाभिमुखा द्रवन्ति ।**
**तथा तवामी नरलोकवीरा**
**विशन्ति वक्त्राण्यभिविज्वलन्ति ।।२८।।**
**यथा प्रदीप्तं ज्वलनं पतंगा**
**विशन्ति नाशाय समृद्धवेगाः**
**तथैव नाशाय विशन्ति लोका**
**स्तवापि वक्त्राणि समृद्धवेगाः ।।२९।।**
**लेलिह्यसे ग्रसमानः समता -**
**ल्लोकान्समग्रान्वदनैर्ज्वलद्भिः ।**
**तेजोभिरापूर्य जगत्समग्रं**
**भासस्तवोग्राः प्रतपन्ति विष्णो ।।३०।।**
**आख्याहि मे को भवानुग्ररूपो**
**नमोऽस्तु ते देववर प्रसीद ।**
**विज्ञातुमिच्छामि भवन्तमाद्यं**
**न हि प्रजानामि तव प्रवृत्तिम् ।।३१।।**

"हे महाबाहो ! तुमचे हे अवाढव्य, अनेक तोंडाचे, अनेक डोळ्यांचे, अनेक बाहूंचे, अनेक मांड्यांचे, अनेक उदरांचे व अनेक दाढांमुळे विक्राळ दिसणारे रूप पाहून" सर्व लोकांना व मलाही भीती उत्पन्न झाली आहे." ।।२३।।

"आकाशाला जाऊन भिडलेले तेजस्वी, अनेक रंगांचे, जबडा पसरलेले आणि मोठ्या व प्रदीप्त डोळ्यांनी युक्त अशा तुम्हांला पाहून अंतरात्मा व्याकूळ झाल्याने हे विष्णो! माझा धीर सुटला व शान्तीही नाहीशी झाली." ।।२४।।

“आणि दाढांनी विक्राळ व प्रलयकाळच्या अग्नीसारखी तुमची (ही) तोंडे पाहूनच, मला दिशा कळत नाहीत, आणि समाधानही वाटत नाही (असे झाले आहे.) हे जगन्निवासा देवदेवा ! प्रसन्न व्हा.” ||२५||

“हे पाहा, राजांच्या गणांसह धृतराष्ट्राचे सर्व पुत्र, भीष्म, द्रोण आणि तसाच हा सूतपुत्र (कर्ण) आमच्या बाजूच्याही मुख्य मुख्य योद्ध्यांसह.” ||२६||

“तुमच्या विक्राळ दाढांच्या या अनेक भयंकर तोंडात भराभर शिरत आहेत व काही दातांमध्ये सापडून डोक्याचा चुराडा झालेले नजरेस येत आहेत.” ||२७||

“नद्यांच्या पाण्याचे अनेक लोट समुद्राकडेच ज्याप्रमाणे धाव घेतात तसे मनुष्यलोकांतील हे वीर ! तुमच्या अनेक प्रज्वलित मुखात शिरत आहेत.” ||२८||

“पेटलेल्या अग्नीत मरण्यासाठी मोठ्या वेगाने पतंग जसे उड्या टाकतात, तद्वतच तुमच्याही अनेक जबड्यांत (हे) लोक मरण्यासाठी मोठ्या वेगाने शिरत आहेत.” ||२९||

“हे विष्णो ! आसमंतात सर्व लोकांना आपल्या जाज्वल्य मुखांनी ग्रासून टाकीत तुम्ही जिभा चाटीत आहां ! व तेजाने सर्व जग व्यापून तुमच्या उग्र प्रभा (चोहोंकडे) तळपत आहेत.” ||३०||

“हे उग्र रूप धारण करणारे तुम्ही कोण हे मला सांगा. हे देवश्रेष्ठा! तुम्हाला नमस्कार करतो ! प्रसन्न व्हा ! तुम्ही आदिपुरुष कोण हे जाणण्याची मला इच्छा आहे. कारण तुमची ही करणी मला (काहीच) कळत नाही.” ||३१||

- भगवंताच्या भव्य, विराट रूपाचे वर्णन काव्यमय, सरस, चित्रमय पण सत्य आहे. अर्जुनाच्या दिव्य दृष्टीला परमात्म्याचे जे विश्वरूप दिसले ते त्याच्या जन्मोजन्मीच्या पुण्यकर्मांचे फळ म्हणूनच, साधकाची पूर्णावस्थेला गेलेली साधना, अशा अद्‌भुत, दिव्य दृश्यांची फलप्राप्ती करून देण्यास कारणीभूत होते.

अंतश्चक्षूनेच भगवंताच्या दिव्य साक्षात्काराचा स्पर्श होऊ शकतो. मन, बुद्धी, चित्त, अहंकार जेवढी विशुद्ध होईल तेवढी शक्ती अंतश्चक्षूला प्राप्त होते. परमात्म्याच्या निकट जाण्यासाठी भगवंताने सर्व व्यवस्था मनुष्यदेहात करून ठेवली आहे. सत्पुरुषांचा सत्संग, शास्त्राभ्यास, ध्यान, चिंतन, आत्मौपम्य भावनेने विश्वाकडे पाहणे, अहंकाराचा त्याग, सेवा, विनम्र वृत्तीने दीनदुबळ्यांची सेवा, सर्वांसाठी मंगल-कामना करणे, समचित्त



होऊन सुखदुःखाकडे पाहणे, सोऽहं बोधाने अनन्यचित्त होऊन भगवंताशिवाय या विश्वात काहीही नाही, असा दृढभाव हृदयात ठेवणे व भगवंताला आवडणारी कर्मे करणे..... अशा साधनेने ही अंतःशक्ती, ऊर्जा वाढत असते. आपली जेवढी अंतःप्रज्ञा जागी होईल, तेवढे भगवंताचे दर्शन शक्य होते. पण त्या दिव्य आनंदाच्या अनुभूतींचा स्वाद चाखण्यासाठी आपली मर्त्य इंद्रियेसुद्धा दिव्य बनली पाहिजेत. भगवान अतींद्रिय, अगोचर असल्याने आपली मन-बुद्धी तेथपर्यंत पोहोचू शकत नाहीत. परमात्म्याच्या कृपाप्रसादानेच हे एखाद्याच्या बाबतीत शक्य होते. अर्जुनावर अशी महत्कृपा भगवंतांनी केली व त्यामुळे त्याला विश्वरूपदर्शन घडले. अर्जुनाने भगवंतांच्या आनंददायक रूपाचेही वर्णन केले आणि भीतिदायक विनाशकारक अशा अक्राळ, विक्राळ, महाभयंकर रूपाचेही वर्णन केले. भगवंतांनी अर्जुनाला जसा संपूर्ण विश्वाचा भूतकाळ दाखविला तसा संपूर्ण विश्वाचा भविष्यकाळही दाखविला. अर्जुनाला भीती वाटत होती ती मृत्यूची, आपल्या हातून आपल्या आप्तजनांचा मृत्यू घडून होणाऱ्या पापाची भीती अर्जुनाच्या मनात होती. पण ह्या दर्शनामुळे मृत्यूचे दडपण त्याच्या मनातून निघून गेले. २८ व २९ व्या श्लोकांत या विनाशाचे वर्णन आहे. या जगात जे जे उत्पन्न होते त्याचा त्याचा नाश होतो. व्यक्तीचाही तसाच सृष्टीचाही. हे सत्य अटळ आहे. सर्वच देहांचा नाश होतो. देह म्हणजे ज्याला आकार व गुण आहे, स्वतः भगवानही सगुणाकारात अवतार घेतो तेव्हा त्यांच्याही शरीराचा नाश अटळ असतो. अर्जुनाने विश्वरूप दर्शनात लोकांचे समूह विनाशाकडे जात असलेले पाहिले. त्यासाठी त्याने दोन उपमा दिल्या. नद्यांच्या पाण्याचे अनेक लोट जसे समूहाकडे वेगाने वाहतात किंवा पतंग जसे आत्मनाशासाठी प्रदीप्त दिव्यावर झेप घेतात तसे लोक प्रभूच्या मुखात मरण्यासाठी उड्या घेत आहेत. भतृहरीने म्हटल्याप्रमाणे,

**भोगा न भुक्ता वयमेव भुक्ताः**
**तपो न तप्तं वयमेव तप्ताः ।**
**कालो न यातो वयमेव याताः**
**तृष्णा न जीर्णा वयमेव जीर्णाः ॥** (भर्तृ. ३-८)

आम्ही भोग भोगत नाही तर भोगांनी आम्हांला भोगून क्षीण करून टाकले आहे. तप कधीही तप्त होत नाही. आम्हीच तप्त होतो. काळ कधी क्षीण होत नाही, आम्हीच क्षीण होतो. तृष्णा कधीही जीर्ण होत नाही, आम्हीच जीर्ण होत असतो.

२८, २९ व ३० ह्या तिन्ही श्लोकांत मृत्यूची प्रक्रिया सांगितली आहे. हे सर्व पाहिल्यावर अर्जुन विचारतो की, "मग तुम्ही कोण आहांत ?" तेव्हा भगवान सांगतात,

"सृष्टिकर्ता म्हणून सृष्टीचे पालन करण्याची जशी माझी भूमिका आहे तशीच सृष्टीचा संहारकर्ता म्हणूनही भूमिका माझीच आहे." या वचनात भूत, भविष्य, वर्तमान ह्यांचा समावेश आहे. भगवंत सांगतात,

**कालोऽस्मि लोकक्षयकृतप्रवृद्धो**
**लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः ।**
**ऋतेऽपि त्वां न भविष्यन्ति सर्वे**
**येऽवस्थिताः प्रत्यनीकेषु योधाः ।।३२।।**
**तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व**
**जित्वा शत्रून् भुंक्ष्व राज्यं समृद्धं ।**
**मयैवैते निहताः पूर्वमेव**
**निमित्तमात्रं भव सव्यसाचिन् ।।३३।।**
**द्रोणं चं भीष्मं च जयद्रथं च**
**कर्णं तथाऽन्यानपि योधवीरान् ।**
**मया हतांस्त्वं जहि मा व्यथिष्ठा**
**युध्यस्व जेतासि रणे सपत्नान् ।।३४।।**

"मी लोकांचा क्षय करणारा व वृद्धिंगत झालेला 'काळ' आहे आणि येथे लोकांचा संहार करण्यास निघालो आहे. तू नसलास तरी, म्हणजे तू काहीही केले नाहीस तरीही, सैन्यासैन्यातून उभे असलेले हे सर्व योद्धे नाहीसे होणार आहेत." ।।३२।।

"म्हणून तू ऊठ, यश मिळव आणि शत्रूंना जिंकून समृद्ध राज्याचा उपभोग घे. मी त्यांना पूर्वीच मारलेले आहे (म्हणून आता) हे सव्यसाची ! तू निमित्ताला मात्र (पुढे) हो !" ।।३३।।

"द्रोण, भीष्म, जयद्रथ आणि कर्ण तसेच दुसरेही वीरयोद्धे मी (पूर्वीच) मारलेले आहेत. त्यांना तू मार! घाबरू नकोस! लढ ! लढाईत तू शत्रूला जिंकणार आहेस." ।।३४।।

– भगवंताच्या मुखातील हे तिन्ही श्लोक अर्थाच्या दृष्टीने महान आहेत. भगवंतांनी काही मौलिक सिद्धांत त्या श्लोकांतून कथन केले आहेत. जीवन समजण्यासाठी ते चिंतनीय, मननीय आहेत.

पहिला सिद्धांत असा की, "तुझ्याशिवायही सर्व होणार आहे, "तुझ्यावाचून जगाचे काहीही अडणार नाही. आपला 'अहं' जाण्यासाठी



ही गोष्ट समजणे जरुरीचे आहे. 'मी आहे म्हणून घर आहे,' 'मी आहे म्हणून संस्था आहे,' 'माझ्यामुळे हे कार्य चालले आहे,' अशी वक्तव्ये अनेकांच्या मुखात असतात. पण वास्तविक भगवंताच्या इच्छेविना झाडाचे पानही हालत नाही. असे असले तरी भगवंत पुढे म्हणतात की, 'मला तुझी गरज आहे,' आपल्याशिवाय जरी जग चालणार असले तरीही आपली जरूर आहे म्हणून भगवंतांनी आपल्याला निर्माण केले आहे. म्हणून भगवंत सांगतात, 'निमित्तमात्रं भव सव्यसाचिन्' सृष्टीचा संहार तू करत नाहीस. तो होणारच आहे. तू फक्त त्याला निमित्त हो. निमित्तमात्र हा शब्द नसून मंत्र आहे. आपलेदेखील जीवन हलके नाही. माझीदेखील गरज आहे पण ती निमित्तमात्र होण्यातच ! ह्या समर्पणाच्या भावनेतून जेव्हा आपण जगतो तेव्हाच ते जीवन सुगंधित, अहंकारशून्य होते. संकल्प भगवंताचा, कर्म आपले पण तेही निमित्तमात्र बनून ! आपण भगवंताच्या हातातील हत्यार म्हणून अभिमानशून्य होऊन काम करायचे ! भगवंताचे मोठ्यात मोठे हत्यार मुरली आहे. मुरली जशी पोकळ झाल्यानंतरच मधुर आवाज देते तसे अहंकार टाळून आपणही पोकळ व्हायचे हा श्लोक आपल्याला कार्यप्रवण करण्याची प्रेरणा देतो. आपल्या जीवनात अहंकारशून्य होऊन माधुर्य उभे करतो. दुसरे या श्लोकात महत्त्वाचे हे की अर्जुनाला भगवंत यश, सिद्धी मिळवायला सांगतात, भगवंताला लाचार, रडके, दुबळे जीवन आवडत नाही. सदोदित उत्साहित होऊन कार्यरत राहत यशसिद्धी मिळवण्यात जीवनाचे सार दडले आहे. पण या कार्यामध्ये क्षुद्रपणा नको. जीवपण टाकून शिवमय होणे यातच जीवनाची सिद्धी, साफल्य, कृतार्थता आहे. प्रपंचात यश प्राप्त करणे म्हणजे शत्रूंना जिंकणे. आपल्या जीवनातील शत्रू हे अंतर्बाह्य आहेत. आतील विकारांना जिंकणे हा एक भाग व बाहेरच्या जगात प्रेम, आत्मौपम्यभाव, द्वेषमत्सररहित जगणे हा दुसरा भाग. तसे महाभारत आजही घडते आहे. स्वरूप फक्त वेगळे ! आपण सर्वच जण अर्जुन आहोत. मोहग्रस्तता ही अपरिहार्य बाब झाली आहे. आंतरिक जीवन कुरुक्षेत्र झाले आहे. त्याचे धर्मक्षेत्र करायचे असेल तर आतील विकारांना बदलले पाहिजे. विकारांचे रूप व मुख बदलविणे म्हणजे त्याचे उदात्तीकरण करणे. विकार हेच खरे आध्यात्मिक शत्रू आहेत, त्यामुळेच आपण दीन, दुबळे, लाचार, भोगवादी, भ्रष्ट झालो आहोत. या शत्रूंना मारायचे नाही, तर त्यांना जिंकायचे आहे. म्हणून भगवंत 'जित्वा' हा शब्दप्रयोग करतात. विकारांना जिंकण्याची, बदलण्याची शक्ती जीवात आहे, परंतु मारण्याची शक्ती फक्त भगवंताची आहे. जीव विकार बदलून उन्नत होतो. पण शेवटी त्याच्या विकारांना

मारून जीवाला मुक्त करण्याचे काम भगवंताचे. विकारांना मारणे म्हणजे आध्यात्मिकरीत्या द्वैत खलास करणे. अद्वैताच्या स्थितीत राहणे. शरीर व जग विकारांनी भरलेले आहे. विकारांना जिंकूनच हे आध्यात्मिक शत्रू संपवायचे, विकारांशी सख्य ठेवायचे, पण त्यांच्या आहारी जाऊन नव्हे तर त्यांना ताब्यात ठेवून आपल्या तालावर नाचवायचे. म्हणून या श्लोकात भगवान अर्जुनाद्वारे आपल्याला आध्यात्मिक तसेच सांस्कृतिक दोन्ही कार्यात एकदमच निमित्त बनायला सांगत आहेत.

भगवंतांनी अर्जुनाला सांगितले की, मीच काळ आहे. म्हणून तू जे जे पाहतोस ते सर्व नष्ट होणार आहे. जगातील सर्व पदार्थ मर्त्य आहेत. शेवटी सर्वजण याच गतीने माझ्याकडे येणार आहेत. सृष्टीचा संहार तू करत नाहीस. तो होणारच आहे. तुझ्याशिवाय हे सर्व चालणार आहे. तरी सुद्धा 'तू ऊठ । उभा राहा, लढ व यश मिळव.' तू ह्या संहाराला केवळ निमित्तमात्र हो. तू आपले केवळ कर्तव्य कर. भगवंताने या सृष्टीच्या चक्राविषयी अर्जुनाला येथे समजावले. सृष्टीच्या क्रमात या सर्व गोष्टी अशा घडतच राहणार. या प्रपंचातील भोग भोगून शेवटी देह सोडावाच लागणार. पण शरीर सुटल्यानंतर परब्रह्मापर्यंत येण्यासाठी संसारात असताना व्यवस्था करावी लागते. जशी नदी समुद्राला मिळाल्यानंतर समुद्ररूप होते तसे मृत्यूनंतर मनुष्यसुद्धा परमेश्वरापर्यंत पोहोचू शकतो, पण त्याआधी जीवनही तसे जगावे लागते. जीवनात यशस्वी व्हायचे असेल तर शत्रूंना जिंकले पाहिजे. जसे बाहेरचे शत्रू असतात तसे आंतरिक शत्रूही बलवान असतात. आपल्यातील उणिवा शोधून त्यावर मात केली पाहिजे. विकारांना काबूत ठेवून आंतरिक शुद्धी साधली पाहिजे. शुद्ध अंतःकरणाने आत्मकल्याणही साधता येते व परकल्याणाची वृत्तीही निर्माण होते. सतत कर्मशील राहून वाट्याला आलेले, सुखदुःखाचे भोग ईश्वरार्पणबुद्धीने भोगण्यात जीवनाचा आनंद साठला आहे. लौकिक जीवन यशस्वी जगून, परमेश्वरप्राप्ती करून घेण्यात जीवनाची सार्थकता आहे. भगवंताने अर्जुनाला असे कृतार्थ जीवन जगण्याचा मंत्र दिला. जीवनात केवळ माध्यम, निमित्त बनून कर्म करण्याचा संदेश दिला आहे. भगवान अर्जुनाला मानवी जीवनाचे साफल्य समजून घ्यायला सांगत आहेत. जसे संत तुकाराम म्हणाले, "याचसाठी केला होता अट्टाहास । शेवटचा दिस गोड व्हावा ।" शेवटचा श्वास परमेश्वराच्या नामोच्चारात जाण्यासाठी आधीचे जीवनसुद्धा साधनेत घालवावे लागते. मृत्यू निर्भयतेने स्वीकारण्यासाठी व मृत्यूचा उत्सव होण्यासाठी परमेश्वराचे सतत चिंतन, स्मरण राहावे लागते.



भगवंताच्या ३२, ३३ व ३४ या श्लोकातील वचनांनी अर्जुनाला धीर आला. अर्जुनाला आपली भूमिका समजलीच, पण भगवंताचे हे नवे रूपही त्याला ज्ञात झाले. भगवंत कोण आहेत, ते काय करणार आहेत हेही त्याने पाहिले, जाणले. म्हणूनच गद्‌गदित अंतःकरणाने तो भगवंताची स्तुती करू लागला. अर्जुनाच्या या स्थितीचे वर्णन संजयाने पुढील श्लोकात केले आहे.

**एतच्छ्रुत्वा वचनं केशवस्य**
**कृतांजलिर्वेपमानः किरीती ।**
**नमस्कृत्वा भूय एवाह कृष्णं**
**सगद्‌गदं भीतभीतः प्रणम्य ।।३५।।**

"केशवाचे हे भाषण ऐकून अत्यंत भयभीत होत्साता, कंठ दाटून येऊन, कापत कापत हात जोडीत नमस्कार करून अर्जुन श्रीकृष्णास लवून पुनश्च असे म्हणाला की,"

अर्जुन उवाच -

**स्थाने हृषीकेश तव प्रकीर्त्या**
**जगत्प्रहृष्यत्यनुरज्यते च ।**
**रक्षांसि भीतानि दिशो द्रवन्ति**
**सर्वे नमस्यन्ति च सिद्धसंघाः ।।३६।।**
**कस्माच्च ते न नमेरन्महात्मन्**
**गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे ।**
**अनंत देवेश जगन्निवास**
**त्वमक्षरं सदसत्तत्परं यत् ।।३७।।**
**त्वमादिदेवः पुरुषः पुराण -**
**स्त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।**
**वेत्तासि वेद्यं च परं च धाम**
**त्वया ततं विश्वमनन्तरूप ।।३८।।**
**वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशांकः**
**प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च ।**
**नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः**
**पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते ।।३९।।**
**नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते**
**नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व ।**

अनंतवीर्यामितविक्रमस्त्वं
सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः ।।४०।।
सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं
हे कृष्ण हे यादव हे सखेति ।
अजानता महिमानं तवेदं
मया प्रमादात्प्रणयेन वापि ।।४१।।
यच्चावहासार्थमसत्कृतोऽसि
विहारशय्यासनभोजनेषु ।
एकोऽथवाप्यच्युत तत्समक्षं
तत्क्षामये त्वामहमप्रमेयम् ।।४२।।
पितासि लोकस्य चराचरस्य
त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान् ।
न त्वत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यो
लोकत्रयेऽप्यप्रतिमप्रभावः ।।४३ ।।
तस्मात्प्रणम्य प्रणिधाय कायं
प्रसादये त्वामहमीशमीड्यम् ।
पितेव पुत्रस्य सखेय सख्युः
प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम् ।।४४।।
अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा
भयेन च प्रव्यथितं मनो मे ।
तदेव मे दर्शय देव रूपं
प्रसीद देवेश जगन्निवास ।।४५।।
किरीटिनं गदिनं चक्रहस्त -
मिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव ।
तेनैव रूपेण चतुर्भुजेन
सहस्रबाहो भव विश्वमूर्ते ।।४६।।

"हे हृषीकेशा ! (सर्व) जग तुमच्या (गुण) कीर्तनाने आनंदते व (त्यात) अनुरक्त असते. राक्षसही तुम्हांला भिऊन (दाही) दिशांस पळून जातात आणि सिद्ध पुरुषांचे मेळे तुम्हांलाच नमस्कार करतात. हे (सर्व) योग्यच होय." ।।३६।।"

"हे महात्मन् ! ब्रह्मदेवाचेही आदिकारण व त्यापेक्षाही श्रेष्ठ जे तुम्ही त्या तुम्हांला ते का बरे वंदन करणार नाहीत ? हे अनंता ! देवदेवा ! हे जगन्निवासा । तुम्हीच सत् व असत् असून या दोहोंच्याही पलीकडचे जे



अक्षर ते तुम्हीच आहात." ।।३७।।"

"तुम्ही आदिदेव, (तुम्ही) पुरातन पुरुष, तुम्हीच या जगताचे परम आधार, तुम्ही ज्ञाते व ज्ञेय, तुम्ही श्रेष्ठ स्थान, आणि तुम्हीच हे अनंतरूपा ! (हे) विश्व विस्तारिले, व्यापिले आहे." ।।३८।।"

"वायू, यम, अग्नी, वरुण, चंद्र, प्रजापती म्हणजे ब्रह्मदेव आणि पणजोबाही तुम्हीच आहा. तुम्हांला हजार वेळा नमस्कार असो ! आणि फिरून आणखीही तुम्हांलाच नमस्कार असो." ।।३९।।"

"तुम्हाला पुढून नमस्कार आणि पाठीमागून नमस्कार. सर्वच बाजूंनी हे सर्वात्मका ! तुम्हांला नमस्कार असो! तुमचे वीर्य अनंत व तुमचा पराक्रम अतुल असून सर्वांना पुरे पडत असल्यामुळे तुम्हीच 'सर्व' आहा." ।।४०।।

"तुमचा हा महिमा न ओळखता, मित्र समजून रे कृष्णा! रे यादवा! 'रे सखे'! असे चुकीने किंवा सलगीने जे काही मी अमर्याद बोललो असेन." ।।४१।।"

"आणि आहारविहारात किंवा निजण्याबसण्यात, हे अच्युता, एकट्याला किंवा चारचौघात मी जो काही तुमचा थट्टेने अपमान केला असेल, त्याची आपण मला क्षमा करावी, असे तुम्हां अप्रमेयाजवळ (अपरिमिताजवळ) माझे मागणे आहे." ।।४२।।"

"तुम्हीच या चराचर जगताचे पिता असून पूज्य व गुरूचेही गुरू आहात ! सर्व त्रैलोक्यात तुमच्या बरोबरीचा कोणी नाही. मग हे अतुलप्रभावा! अधिक कोठून असणार ?" ।।४३।।

"यासाठी स्तुत्य व समर्थ अशा तुमची, 'प्रसन्न व्हा' म्हणून शरीर वाकवून नमस्कार करून मी प्रार्थना करीत आहे. पिता ज्याप्रमाणे आपल्या पुत्राचे, सखा ज्याप्रमाणे आपल्या सख्याचे (अपराध क्षमा करतो), त्याप्रमाणे हे देवा ! 'प्रियाने' म्हणजे तुम्ही, 'प्रियाय' म्हणजे तुमचा प्रिय जो मी त्याला किंवा तत्प्रीत्यर्थ (माझे सर्व) अपराध क्षमा करावे." ।।४४।।

"कधी न पाहिलेले पाहून मला हर्ष झाला आहे (पण तसेच) भयानेही माझे मन व्याकूळ होत आहे. हे जगन्निवासा देवदेवा ! प्रसन्न व्हा ! आणि हे देवा ! आपले ते पूर्वीचे (चतुर्भुज) स्वरूप दाखवा." ।।४५।।

"किरीट व गदा धारण करणारे, हातात चक्र घेतलेले, पूर्वीप्रमाणेच मी तुम्हांला पाहू इच्छितो. (म्हणून हे, सहस्रबाहो विश्वमूर्ते ! त्याच चतुर्भुज रूपाने प्रकट व्हा." ।।४६।।

भगवंताचे दिव्य स्वरूप पाहून अर्जुन भावविभोर झाला आहे. अशा अवस्थेत त्याने भगवंताच्या विराट स्वरूपाचा महिमा गायिला आहे. जगातल्या कोणत्याही धर्माच्या, संप्रदायाच्या लोकांना प्रभुप्रीतीतून गायिलेली ही प्रार्थना निश्चित भावेल.

भगवंताची ही स्तुती अपूर्व आहे. इथे समर्पक शब्दांची आतषबाजी आहे, उत्कट काव्याचा आविष्कार आहे, अद्भुतरसाचा परिपोष आहे, भक्तीचा परमोत्कर्ष आहे, माधुर्य आहे; अर्जुनाने आपले हृदय यात ओतले आहे. या स्तोत्रांना मंत्राचा महिमा प्राप्त झाला आहे. म्हणून या श्लोकाचे पावित्र्य जाणून त्यांचे मनन करावे, भावाने यावर अनुरक्त व्हावे. "विश्वतश्चक्षुरुत विश्वतोमुखो विश्वतोबाहुरुत विश्वतस्पात्..." अशा विराट, अनंत, सर्वव्यापी, अव्यय रूपाचे वर्णन गाऊन मनबुद्धी शुद्ध, पवित्र करावी, असे हे वर्णन आहे.

अर्जुनाची ऋजुता, विनम्रता या श्लोकातून प्रकट झाली आहे. इथे भावही आहे आणि ज्ञानही! 'नमो नमस्तेऽस्तु' म्हणावयास अर्जुन पूर्णपणे पात्र आहे. भगवंताच्या रूपाचे यथार्थ ज्ञान अर्जुनास झाले आहे, म्हणूनच तो नतमस्तक झाला आहे. त्याने जाणले आहे की, भगवंतच प्रकृती व पुरुषाचे मूळ आहे, महत्तत्त्वाचा शेवटही तोच आहे, तो जन्मरहित, अव्यय आहे. सर्व जगाचे जीवनही तोच आहे व जीवांचा शेवटही तोच आहे. तोच श्रेष्ठ असे आश्रयस्थान आहे. अनंत रूपांनी नटलेला, सर्वव्यापी, सर्वतोमुख, सर्वभूताधिवासी तोच आहे. ब्रह्मदेवाचा श्रेष्ठ असा आदी जनक जगन्नाथ तोच आहे. विश्वात जे जे काही आहे, ज्याला रूप आहे अथवा नाही ते सर्व तोच आहे.... म्हणून अशा भगवंताला प्रीतियुक्त अंतःकरणाने अर्जुन वारंवार नमस्कार करीत आहे. अशा वेळी त्याला भूतकाळाचे स्मरण झालेले आहे. ४१ व ४२ व्या श्लोकात अर्जुनाचे हृदय ओतप्रोत भरले आहे. लहानपणापासून एवढे महान तत्त्व आपल्या बरोबर होते, या जाणिवेने तो रोमांचितही झाला आहे. पण थोडा ओशाळलाही आहे. कारण अशा जगन्नियंत्याबरोबर राहत असताना किती वेळा थट्टामस्करी, हास्यविनोद, उणे-पुरे बोलणे केले याची अर्जुनाला आठवण झाली आहे. जवळ अमृत होते, पण ते प्राशन न करता त्याचा सड्यासाठी उपयोग केला, परिस असताना त्याला स्पर्श केला नाही, चिंतामणी हातात असून त्याचा खड्यासारखा वापर केला व कल्पवृक्षाखाली बसूनही रिता राहिलो व अशा मूर्तिमंत परब्रह्माला युद्धात सारथीसुद्धा केले... अशा अनेक आठवणींनी अर्जुनाला अपराधित्वाची जाणीव होते. म्हणून पुनःपुन्हा भगवंताची तो क्षमायाचना करतो आहे.



साष्टांग प्रणिपात करून, सद्‌गदित होऊन या सर्व अपराधांना क्षमा कर अशी तो विनवणी करतो आहे.

४५ व ४६ व्या श्लोकात, अर्जुनाने भगवंताचे चतुर्भुज रूप पाहण्याची इच्छा व्यक्त केली आहे. ज्या वेळी विराट विश्वरूप पाहिले त्या वेळी तो त्यामधील रुद्र रूप पाहून भयाने व्यथित झाला. ४५ व्या श्लोकात पहिल्यांदा अर्जुन 'अदृष्टपूर्व' स्वरूप पाहिल्यामुळे हर्षभरित झाल्याचे सांगतो. पण नंतर थरकाप उडाला असेही सांगतो. असा घाबरलेला अर्जुन भक्तांना नेहमी आवडणारे चतुर्भुज देवरूप पाहण्याची इच्छा करतो.

अर्जुन भगवंताच्या चतुर्भुज रूपावर संतुष्ट आहे. जो परमेश्वर विराट विश्वात भरून राहिला आहे, तो संपूर्ण तसाच्या तसा लहानशा मूर्तीत, अणूरेणूंत, कणाकणांत, पानापानांत भरून राहिला आहे. सागराचे सर्व गुण जसे एका थेंबात असतात किंवा पृथ्वीचे रूप एका परमाणूतसुद्धा सामावलेले असते तशी या विराट विश्वरूपाची दिव्यता लहानशा मूर्तीतही आहे. या लहान रूपाची ओळख झाली की विराट रूपाची कल्पना येते. लहानशा स्वरूपातही तो अनंत परमेश्वर सामावलेला आहे. वास्तविक मूर्तिपूजेचे हेच रहस्य आहे. लहानशा प्रतिमेत, मूर्तीत विश्वात्मक भगवंताला पाहणे म्हणजे मूर्तिपूजा. जसा माझ्यात भगवंत आहे तसा सर्वांत तो आहे अशी आत्मौपम्य दृष्टी लाभणे म्हणजे खरी भक्ती ! अर्जुनाने भगवंताचे सर्व विभूतिमय विराट रूप पाहण्याची इच्छा केली म्हणूनच भगवंताने विश्वरूप दर्शन दाखविले, पण आता मला परमेश्वराचे छोटे रूप पुरेसे आहे अर्जुन म्हणतो.

यावर भगवान म्हणतात -

**मया प्रसन्नेन तवार्जुनेदं**
**रूपं परं दर्शितमात्मयोगात् ।**
**तेजोमयं विश्वमनंतमाद्यं**
**यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम् ।।४७।।**
**न वेदयज्ञाध्ययनैर्न दानै -**
**र्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रैः ।**
**एवंरूपः शक्य अहं नृलोके**
**द्रष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर ।।४८।।**
**मा ते व्यथा मा च विमूढभावो**
**दृष्ट्वा रूपं घोरमीदृङ्ममेदम् ।**

**व्यपेतभीः प्रीतमनाः पुनस्त्वं**
**तदेव मे रूपमिदं प्रपश्य ।।४९।।**

"हे अर्जुना (तुझ्यावर) प्रसन्न होऊन तुझ्याखेरीज दुसऱ्याने पूर्वी न पाहिलेले हे तेजोमय, अनंत, आद्य व परम विश्वरूप माझ्या योगसामर्थ्याने मी तुला दाखविले." ।।४७।।

"हे कुरुवीरश्रेष्ठा ! वेदांनी, यज्ञांनी, स्वाध्यायाने, दानाने, कर्मांनी किंवा उग्र तपाने माझे या प्रकारचे स्वरूप तुझ्याखेरीज दुसऱ्या कोणासही मनुष्यलोकी पाहावयास मिळणे शक्य नाही." ।।४८।।

"(म्हणून) माझे असले हे घोर रूप पाहून तुझ्या चित्ताला व्यथा होऊ देऊ नको अगर गांगरल्यासारखाही होऊ नको. भीती सोडून देऊन संतुष्ट मनाने पुन्हा तेच हे माझे (चतुर्भुज) स्वरूप तू पाहा." ।।४९।।

- भगवंताने अत्यंत प्रसन्न होऊन अर्जुनाला 'आत्मयोगात्' म्हणजे स्वतःच्या योगशक्तीने ते विश्वरूप दाखविले होते. असे दर्शन होण्यासाठी भक्त व भगवंत एकरूप झाले पाहिजेत. केवळ यज्ञ, दान, तप भगवंताच्या दिव्य रूपाचे दर्शन घेण्यासाठी पुरेशी नाहीत. ही केवळ साधने आहेत. ज्यांच्या अंतःकरणात केवळ भगवंतच राहिला आहे, फक्त त्यांनाच ही दृष्टी प्राप्त होते. मधुसूदन सरस्वतींनी अशा भक्तीचे वर्णन समर्पक शब्दांत केले आहे. ते म्हणतात,

**"द्रुते चित्ते प्रविष्टा या गोविंदाकारता स्थिरा सा भक्तिः ।।"**

चित्त जेव्हा द्रवीभूत होते, ते गोविंदाकारात स्थित होते, त्याला भक्ती म्हणतात. अशा भक्तीने भगवंताची प्राप्ती होते. संजय म्हणतात,

**इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा**
**स्वकं रूपं दर्शयामास भूयः ।**
**आश्वासयामास च भीतमेनं**
**भूत्वा पुनः सौम्यवपुर्महात्मा ।।५०।।**

"असे याप्रमाणे भाषण करून वासुदेवांनी अर्जुनाला पुन्हा आपले (पूर्वीचे म्हणजे चतुर्भुज) स्वरूप दाखविले आणि पुन्हा सौम्यरूप (मानवी रूप) धारण करून त्या महात्म्याने भ्यालेल्या अर्जुनास धीर दिला" ।।५०।।

असे सौम्य रूप पाहून अर्जुन म्हणाला,

**दृष्ट्वेदं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन ।**
**इदानीमस्मि संवृत्तः सचेताः प्रकृतिं गतः ।।५१।।**

"हे जनार्दना ! तुमचे हे सौम्य व मनुष्यदेहधारी रूप पाहून आता मन ठिकाणावर येऊन मी पूर्ववत सावध झालो आहे." ।।५१।।



अर्जुन हे मानुषीरूप पाहून शांत झाला आहे.

११ व्या अध्यायाच्या शेवटच्या चार श्लोकांत भगवंतांनी भक्तीचे रहस्य सांगितले आहे. ५५ वा श्लोक याचा कळस आहे. संपूर्ण अध्यायाचे सार या श्लोकात सामावले आहे. श्री भगवान म्हणतात,

**सुदुर्दर्शमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम ।**
**देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकांक्षिणः ।।५२।।**
**नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया ।**
**शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा ।।५३।।**
**भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ।**
**ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप ।।५४।।**
**मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः संगवर्जितः ।**
**निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पाण्डव ।।५५।।**

"माझे जे हे (चतुर्भुज) रूप तू पाहिलेस ते पाहण्यास मिळणे फार कठीण आहे. देवसुद्धा हे रूप पाहण्याची नेहमी इच्छा करीत असतात." ।।५२।।

"तू जसे मला पाहिलेस तसे मला वेदांनी, तपाने, दानाने किंवा यज्ञानेही (कोणी) पाहणे शक्य नाही." ।।५३।।

"केवळ अनन्यभक्तीनेच हे अर्जुना ! याप्रमाणे माझे ज्ञान होणे, मला पाहणे, आणि हे परंतपा ! माझ्या ठायी तत्त्वाने प्रवेश करणे शक्य आहे." ।।५४।।

"सर्व कर्मे माझी म्हणजे परमेश्वराची होत, या बुद्धीने कर्म करणारा, मत्परायण, संगविरहित आणि सर्व भूतांचे ठायी निर्वैर असा जो माझा भक्त तो हे पांडवा ! मलाच येऊन पोचतो." ।।५५।।

केवळ अनन्यभक्तीनेच भगवंताला जाणणे, पाहणे व भगवंताशी एकरूप होणे शक्य आहे. भगवंताला अनन्यशरण जाऊन, केवळ ईश्वरार्पणबुद्धीने जो कर्मे करतो, तोच श्रेष्ठ भक्त आहे. असा भक्त ईश्वरावर केवळ प्रेमच प्रेम करतो. भीती, जिज्ञासा, आर्तता, कामना न ठेवता गुणनिरपेक्ष प्रेम करतो. सुखदुःखे ही भगवंताचा प्रसाद मानून समत्वबुद्धीने जीवनातील कर्मे करणारा असा भक्त कधीही विचलित होत नाही. सर्व शास्त्रांचे, वेदांचे हेच सार आहे. एका चरणात संत तुकारामांनी हा बोध असा सांगितला,

**"वेद अनंत बोलिला । अर्थ इतुकाचि साधला ।**
**विठोबाशी शरण जावे । निजनिष्ठा नाम गावे ।**
**सकळ शास्त्रांचा विचार । अंती इतुकाचि निर्धार ।।"**

भगवंताला अनन्यशरण होणे ही खरी उत्कट भक्ती, यासाठी जे गुण हवेत ते भगवंतांनी शेवटच्या एकाच श्लोकात साररूपाने कथन केले आहेत.

१) **'मत्कर्मकृत्'** - जो केवळ माझ्यासाठीच कर्म करतो, अशा भक्ताचे संकल्प प्रभूचे संकल्प असतात. तो जे काही करतो, खातो, पाहतो, देतो, तप, साधना, सर्व काही भगवंतासाठी त्याला अर्पण करून करतो. 'मी' - 'माझे' विसरून ईश्वरार्पणबुद्धीने केलेले कर्मरूपी पुष्प भगवंताला अधिक आवडते. भोजन तेच असते पण भगवंताला अर्पण केल्यानंतर तो 'प्रसाद' बनतो. सर्व कर्मे भगवंताला अर्पण केल्यानंतर त्यांना दिव्यत्वाचा स्पर्श होतो, ती कर्मे सुगंधित होतात. धन, ज्ञान हे भगवंताच्या चरणी वाहिल्यानंतर त्याविषयीचा अभिमान, गर्व, आसक्ती नाहीशी होते. मनुष्याला ती बाधक ठरत नाहीत.

२) **'मत्परम'** बन - 'या विश्वात माझ्यावाचून दुसरा कोणी श्रेष्ठ नाही, जे काही आहे ते मी आहे, असा दृढ भाव ठेवून मलाच अंतःकरण दे' असे भगवंत सांगतात. अशा भगवत्परायण होण्यात भक्तीचे रहस्य आहे. जगातले सर्व व्यवहार करावेत पण त्यांच्या केंद्रस्थानी केवळ भगवंत असावेत. कुठेही जावे, काहीही करावे; पण प्रत्येक क्षणी भगवंताचे ध्यान असावे. तो केंद्रबिंदूच्या ठिकाणी असावा व आपण त्याभोवती परिक्रमा करीत राहावे असा भक्त भगवंताचा प्रिय असतो.

३) **'मद्भक्त'** हो - भक्त म्हणजे जो विभक्त नाही तो. जो सदोदित भगवंताला चिकटून आहे, जो सतत भगवंताचे कीर्तनात, भजनात, जप-जाप्यात रममाण झालेला असतो. त्या भगवंताचे स्मरण, त्याचेच चिंतन, त्याचेच गुणगान.... असा भक्त होऊन तू ये, असे भगवंत म्हणतात.

४) **'सङ्गवर्जित'** हो - 'अनासक्त होऊन भक्ती करणारा भगवंताला आवडतो, प्रपंचातली सर्व कर्मे आसक्तिविरहित होऊन केवळ कर्तव्यभावनेने करावीत. जो भोगविषयात असा राहतो, त्याला आत्मलाभातच गोडी वाटते. पण वस्तुमात्रातच जर आसक्ती असेल, तर त्यांच्या मिळण्यात व गमावण्यात भक्तीपासून दूर जाण्याची शक्यता असते. 'अनासक्त' हा गीतेचा मंत्र आहे.

५) **'निर्वैर'** हो - ईर्ष्या, द्वेष, राग, मत्सर, वैर, क्रोध ही भक्तीतील मोठी विघ्ने आहेत. आत्मौपम्य भावनेने जो जगाकडे पाहतो व सर्वांभूती परमेश्वर समजून जगावर प्रेम करतो, त्याच्या मनात वैरभाव राहत नाही. असा निर्वैर होऊन तू मजजवळ ये, असे भगवंत म्हणतात.



भगवान श्रीकृष्णाने गीतेमध्ये 'द्वेष', 'वैर' या शब्दांचा खूप ठिकाणी वापर केला आहे. कुरुक्षेत्रावर जे महाभारत घडले त्याचे मूळ या दोन शब्दात साठले आहे. कौरवांनी पांडवांबरोबर केलेली ईर्ष्या, ही केवळ वैरभावाने वाढली होती. तेच युद्धाचे मूळ ठरले. म्हणून भगवंतानी ''निर्वैर'' होण्यास सांगितले आहे. निर्वैर झाल्याशिवाय भगवंताजवळ पोहोचता येत नाही.

विश्वामित्रांनी कठोर तपश्चर्या केली पण ते ब्रह्मऋषी काही झाले नाहीत. वशिष्ठ ऋषींशी वैरभावनेने त्यांनी सतत व्यवहार केला. एक दिवस या द्वेषभावनेने, विश्वामित्रांनी वशिष्ठ ऋषींना मारण्याचे ठरविले. जेव्हा ते वशिष्ठ ऋषींजवळ पोहोचले तेंव्हा ते आपल्या शिष्यासमवेत चर्चा करीत होते. विश्वामित्रांनी त्यांचे बोलणे ऐकले व त्यांना आश्चर्याचा धक्का बसला. ज्यांना मारण्यासाठी विश्वामित्र आले होते ते वशिष्ठ सर्वांसमोर विश्वामित्राच्या कल्याणाची इच्छा करीत होते. विश्वामित्राच्या अचाट बुद्धिमत्तेची प्रशंसा करीत होते. विश्वामित्रासारखा दुसरा कोणी महान झाला नसता पण केवळ द्वेषभावनेने ते आपले अकल्याण करून घेत आहेत अशी प्रांजळ भावनाही त्यांनी व्यक्त केली. हे सर्व ऐकून विश्वामित्र खजिल झाले. आपल्या कल्याणासाठी प्रार्थना करणाऱ्या वशिष्ठांच्या समोर जाऊन त्यांनी क्षमायाचना केली. पश्चात्तापाने दग्ध होऊन अश्रू ढाळले. व म्हणाले, "मी तर ऋषी बनण्यासाठीसुद्धा पात्र नाही तर ब्रह्मर्षी काय बनणार ?" हे ऐकून वशिष्ठांनी निर्वाळा दिला, "तुझ्या डोळयातील आसवांनी तुला आज पवित्र, शुद्ध केले आहे. तुला झालेल्या प्रायश्चित्तामुळे तुझे जीवन पूर्णपणे बदलले आहे. आजपासून तू ब्रह्मऋषी झाला आहेस. तुझ्या या आंतरिक बदलामुळे तू परमेश्वराजवळ पोहोचला आहेस. तुझे स्थान निश्चित श्रेष्ठ झाले आहे."

म्हणून गीतेमध्ये अनेक ठिकाणी 'निर्वैर' होण्यासाठी भगवान सांगत आहेत. जो प्राणिमात्राशी निर्वैर भावनेने वागतो तो मलाच येऊन मिळतो हे भगवंताचे आश्वासन आहे.

हा श्लोक ११ व्या अध्यायातील मुकुटमणी आहे. गीतेचे सार या श्लोकात सामावले आहे. श्री भगवान शंकराचार्यांनी आपल्या गीताभाष्यात या श्लोकाला 'सर्वार्थ सार' असे म्हटले आहे. या सुंदर, महान श्लोकावर श्री ज्ञानेश्वर महाराजांनी तितकेच सुंदर भाष्य केले आहे. ते म्हणतात.

**जो मजचि एकालागी । कर्मे वाहातसे आंगी ।**
**जया मीवांचोनि जगी । गोमटे नाही ।।६९६।।**
**दृष्टादृष्ट सकळ । जयाचे मीचि केवळ ।**
**जेणे जिणयाचे फळ । मजचि नाम ठेविले ।।६९७।।**

भूते हे भाष  विसरला । जे दिठी मीचि आहे बांधला ।
म्हणोनि निर्वैर जाहला । सर्वत्र भजे ।।६९८।।
ऐसा जो भक्तु होये । तयाचे त्रिधातुक हे जै जाये ।
तैं मीचि होऊनि ठाये । पांडवा गा ।।६९९।।

"जो भक्त माझ्या एकट्याकरिताच शरीराने कर्मे आचरितो आणि ज्याला जगामध्ये माझ्यावाचून दुसरे काही चांगले नाही." ।।६९६।।

"ज्याचा इह परलोक हे सर्व केवळ मीच होऊन राहिलो आहे व ज्याने आपले जगण्याचे प्रयोजन माझीच प्राप्ती होणे हेच ठरविले आहे." ।।६९७।।

"तो, भूते ही भाषा विसरला, कारण त्याच्या दृष्टीला माझ्याशिवाय दुसरा विषय नाही. म्हणून तो निर्वैर झाला असता तो सर्व ठिकाणी मला ओळखून माझी भक्ती करतो." ।।६९८।।

"अरे अर्जुना! असा जो भक्त आहे, त्याचे हे शरीर ज्या वेळी पडते, त्या वेळी तो मीच होऊन राहतो." ।।६९९।।

११ व्या अध्यायात भगवंतांनी परमभक्तांना दिलेले हे आश्वासन आहे.

।।श्रीकृष्णार्पणमस्तु।।



# अध्याय बारावा
# भक्तियोग

गीतेच्या १२व्या अध्यायाला भगवान श्रीकृष्ण स्वतःच अमृतधारा असे म्हणताहेत. वीस श्लोकांचा हा छोटासा अध्याय अर्थाच्या दृष्टीने महान आहे. भक्तिशास्त्राचे मौलिक सिद्धांत विशद करून, भक्तिरसाच्या महिम्याचे तत्त्व या अध्यायात गायिले गेले आहे. विश्वरूप दर्शनानंतरचा हा अध्याय असल्यामुळे या अध्यायाला अनन्य महत्त्व प्राप्त झाले आहे. या अध्यायात भगवान श्रीकृष्णाने संपूर्ण भक्तिशास्त्र सांगितले आहे. अकराव्या अध्यायापर्यंत निरनिराळे संप्रदाय, मते सांगून झाली व शेवटी भक्तीशिवाय ती मते म्हणजे कोरडी गंगा आहे असे स्पष्ट करण्यासाठी भक्तीचा प्रवेश गीतेच्या नाट्यसंवाद मंदिरातील पीठावर झाला आहे. गीतामंदिराच्या गाभ्यात आपण प्रवेश केला आहे. गीतेचा प्रमुख विषय कोणता याबाबत लोकमान्य टिळक प्रभृतींनी खूप ऊहापोह केला आहे. गीतेचा सर्व ओघ कळण्यास, अर्जुनाची मनोवृत्ती कळणे महत्त्वाचे आहे. अर्जुनाची भगवंताच्या ठायी झालेली अनन्यशरणता हीच खरी मनोवृत्ती आहे. ह्या मनोवृत्तीतच गीतेचा तत्त्वार्थ, रसाशय स्थिर आहे. अर्जुन अनन्यशरण झाल्याशिवाय श्रीकृष्ण गवळी उपनिषद् गायींची, अर्जुन या आर्त वत्सासाठी धार काढत नाही. भक्तिशास्त्र जेथून सुरू होते तेथेच या शरणभावाचे दर्शन होते. १८ व्या अध्यायातील ७३ व्या श्लोकात "तत्प्रसादान्मयाच्युत" या पदाने तर भक्तियोगाचाच विषय गीतेचा प्रतिपाद्य विषय आहे हे सिद्ध होते. गीतेचा आरंभ विषादापासून सुरू झाला पण शेवट प्रसादामध्ये-प्रसन्नतेमध्ये झाला आहे. प्रथम प्रेरणा-शरणता व अंतिम प्रसाद-प्रसन्नता हा प्रवास भक्तियुक्तच आहे. प्रसादाचे मांगल्य व अनन्यशरणता या दोन्ही अवस्थांचा पूर्ण परिचय १२ व्या अध्यायात होतो. पू. विनोबा भावेंनीही गीतेचा क्रम लावताना गीता योगपरच मानली आहे. पण योग, ज्ञान व कर्म यातील भेद मिटविणारे शास्त्र भक्ती हे असल्यामुळे वरील तिन्हींपैकी कोणाकडेही गीतेचा तोल झुकत नाही. अर्थात वैदिक कांडतंत्राचा विचार गीतेने समन्वयवादी दृष्टी ठेवून केला आहे हे सर्वमान्यच आहे. या समन्वयवादी तत्त्वातच भक्तीची मुळे आहेत. ज्ञान,

कर्म, उपासना या त्रिविध विचारांत सकळ शास्त्रांचा समावेश होतो. ही शास्त्रे जेव्हा जीवननिष्ठ होतात तेव्हा त्याचेच रूप भक्तियुक्त होते. म्हणून भक्तिशास्त्र हे जीवननिष्ठ दर्शन आहे. १२ व्या अध्यायात याची पूर्तता पाहावयास मिळते. ज्ञान व उपासना यांचे मधुर मिलन या अध्यायात घडले आहे. १२ व्या अध्यायात ज्ञानाचे, उपासनेचे व कर्माचे बीज समरस झाले आहे. व या तिन्हींचा विस्तार १३ व्या अध्यायापासून पुढे झाला आहे. १२ व्या अध्यायापर्यंत अर्जुनाच्या प्रमुख शंकांचे निरसन झाले आहे. १३ व्या अध्यायापासूनचे अर्जुनाचे प्रश्न हे केवळ श्रद्धाशील जिज्ञासेचे आहेत. या अध्यायाच्या शेवटी भगवंत म्हणतात की, भक्ती हे 'धारामृत धर्म' जे घेतात तेच मला आवडतात. भक्तीचे अमृत जो पितो तो निस्तेज, दरिद्री, निर्दय, निष्प्रभ राहत नाही. भक्तीशिवाय परमार्थ म्हणजे अरण्यरुदनच असते. ज्ञान, कर्म वा योग हे काही कमी दर्जाचे नाहीत. पण ते भक्तीशिवाय निष्प्रभ आहेत. ते भक्तीतच उगवतात व भक्तिरूप होऊन भक्तविलासात प्रकट होतात, हे यातील वर्म आहे. भक्त हा एकाच वेळी योगी, ज्ञानी, कर्मवादी, वैराग्यशील व उत्तम तपस्वी असू शकतो. भक्तीची ही जीवननिष्ठा ध्यानी घेऊन गीतेचा हा १२ वा अध्याय तत्त्व व जीवन यांचे सामरस्य घडविणारा अध्याय आहे.

११ व्या अध्यायात भगवान श्रीकृष्णांनी परमेश्वराचे दिव्य वैभव व त्याचे विराट स्वरूप अर्जुनाला दाखविले व भक्तीचा महिमाही गायिला. ते म्हणाले की, "एकाग्र भक्तीने कोणालाही हे विराट रूप जाणता येईल, पाहता येईल व त्याचा अनुभव घेता येईल." हे जाणून १२ व्या अध्यायात अर्जुनाने, भक्तीचे समग्र स्वरूप जाणण्यासाठी भगवंताला उद्युक्त केले. परमेश्वराची भक्ती हीच जर, ते ईश्वरी साम्राज्य प्राप्त करण्याची युक्ती असेल तर, त्या भक्तीतील यथार्थ तत्त्व, मर्म समजून घेणे प्राप्त आहे. म्हणून अर्जुनाने भगवंताला प्रश्न केला. हा प्रश्न धर्मामधील एक विवाद्य मुद्दा उपस्थित करतो. वेगवेगळ्या काळात धर्मवेत्ते आणि संत-महात्मे हे ईश्वरतत्त्वाची उपासना सगुण रूपात करण्यास अनुकूलताही दर्शवितात व त्यास विरोधही करतात. आज २१ व्या शतकातही हा प्रश्न या ना त्या रूपात चर्चिला जात आहे. मूर्तिपूजा ही समर्थनीय आहे की त्याज्य? भगवंताला सगुण रूपात पाहावे की निर्गुण रूपात? त्या अनंततत्त्वाला जाणण्यास मूर्तिपूजा ही सहाय्यभूत होते का? जर होत असेल तर त्याची निश्चित पद्धती कोणती? १२ वा अध्याय हा ह्या प्रश्नांची उत्तरे देण्यासाठी योजला आहे. साकार स्वरूपाची पूजा करणारे व निराकार शक्तीची पूजा करणारे



या दोघांनाही या अध्यायात योग्य ती दिशा दाखविली आहे. एक ज्ञानमार्गी व दुसरा प्रेममार्गी. भक्तीचे हे शास्त्र समजले की मग, साधक निश्चिंत, निवांत होतो.

या अध्यायाचा प्रारंभ अर्जुनाच्या एका मौलिक प्रश्नाने झाला आहे. अर्जुन म्हणतो,

**एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते ।**
**ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः ।।१।।**

"याप्रमाणे नेहमी युक्त म्हणजे योगयुक्त होत्साते जे भक्त तुमची आणि जो (साधक) अव्यक्त अक्षराची म्हणजे निर्गुण ब्रह्माची उपासना करतात, त्यांपैकी उत्तम योगवेत्ते कोण?" ।।१।।

- या प्रश्नात अर्जुनाने सगुण-निर्गुण यांत श्रेष्ठ कोण? कोणता मार्ग स्वीकारावा? 'निराकार अव्यक्ता'ची उपासना करावी की 'व्यक्ता'ची? हे विचारले.

भगवंताचे नेमके स्वरूप कोणते? तो निर्गुण की सगुण आहे? जर निर्गुण असेल तर सगुण कसा होईल? किंवा सगुण असेल तर तो निर्गुण कसा होईल? की भगवंताची ही दोन्हीही रूपे आहेत. सगुण-निर्गुणात काही भेद आहेच का?

संपूर्ण जगातील ईश्वरोपासकांची विभागणी या दोन संकल्पनांत झाली आहे. आपण भारतीयसुद्धा यात विभागले गेलो आहोत. काही पंथ, संप्रदाय मूर्तिपूजा अव्हेरून निराकाराची पूजा करतात. तर काही जण सगुण साकाराची. ११ व्या अध्यायापर्यंत या दोन्हीही रूपांचे वर्णन झाल्यामुळे भक्तितत्त्वाचे पूर्णत्व समजून घेण्यासाठी अर्जुनाने हा प्रश्न विचारला.

याबाबतीत, आपल्या महान संतांनी खूप लिहून ठेवले आहे. या सर्वांचे सांगणे एकच आहे; कोठेही कुणाचीही तक्रार नाही, विवाद नाही. संत नामदेव महाराजांनी एका पंक्तीतच याचे उत्तर दिले आहे,

**"सगुण-निर्गुण दोन्ही विलक्षण ।"**

म्हणजे ही एकच स्थिती आहे. उपासनेचे फक्त हे दोन भाग आहेत. श्री ज्ञानेश्वर महाराज या दोन्हींचे एकत्व दाखवून देताना म्हणतात,

**"तुज सगुण म्हणो कीं निर्गुण रे ।**
**सगुण-निर्गुण एक गोविंद रे ।।"**

पायरी-पायरीनेच साधकाला सगुण भक्तीच्या अभ्यासाने भगवंताचे सर्वज्ञत्व, सर्वशक्तिमत्त्व व सर्वसाक्षित्व समजून घ्यावयाचे असते. सगुणाच्या आधाराने साधकाला निर्गुणाकडे जावे लागते. याविषयी संत रामदासांनी उत्तम मार्ग दाखविला आहे. त्यांचे हे वचन उद्बोधक आहे.

**"सगुणाचेनि आधारे निर्गुण पाविजे निर्धारे ।**
**सारासार विचार संतसगे ।।"**

वास्तविक दोघेही भक्त त्या एकाच परमात्म्याची तेवढ्याच चित्तैकाग्रतेने भक्ती करतात. एक भगवंताविषयी आत्यंतिक प्रेम बाळगणारा, सर्वस्व अर्पण करून समर्पित होऊन, सर्वेंद्रियांनी त्यांची पूजा करणारा तर दुसरा सतत इंद्रियनिग्रह करून निष्काम भावनेने जगणारा, सर्वभूतहितात रत राहून सर्वांकडे आत्मौपम्य दृष्टीने पाहणारा व ईश्वराशी एकरूप झालेला. दोन्हीही भक्त सारख्याच योग्यतेचे! तर-तम काहीच नाही. सगुण भक्तीत इंद्रियांना कार्यरत ठेवून समर्पित करता येते. इंद्रिये ही अशा साधकाला साधनरूप आहेत. डोळ्यांत सगुण गोड रूप साठवून फुलांनी तो भगवंताची पूजा करतो, तोंडाने हरिनामाचा घोष, कानांनी भगवंताच्या गुणांचे श्रवण, हातांनी सेवा आणि पायांनी तीर्थयात्रा करीत सर्व इंद्रिये तो भगवंताला वाहतो. श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य आणि आत्मनिवेदन या नवधा म्हणजे नऊ प्रकारांनी तो भगवंताच्या भक्तीत सतत अनुसंधान ठेवत असतो. अव्यभिचारी, एकविध भक्तीने आपल्या मनात भाव फुलवीत असतो. देव भावाचा भुकेला असल्यामुळे सगुण भक्ताचा असा भाव भगवंताला आवडतो. निर्गुणोपासकाला इंद्रिये ही भक्तीतील विघ्ने वाटतात; म्हणून सतत इंद्रियदमनाने तो त्यांना ताब्यात ठेवतो. ज्ञानसाधनेत व्यग्र होऊन सतत विश्वाचे कल्याण चिंतीत साधना करीत राहतो. दोन्ही भक्तांचे ध्येय एकच. मग सगुण-निर्गुण यात उच्च-नीच असा भाव कुठे येतो? दोन्ही एकमेकांना पूरक व पोषकच आहेत, परस्पर विरोधी नाहीत. संत शिरोमणी एकनाथ महाराज म्हणतात,

**निर्गुणाहुनी सगुण न्यून ।**
**म्हणे तो केवळ मूर्ख जाण ।**
**सगुण-निर्गुण दोन्ही समान ।**
**न्यून पूर्ण असेना ।।**

मूर्तिपूजेला निर्गुणाची जेव्हा मर्यादा असते, तेव्हा ती निर्दोष राहते. सगुणाला निर्गुणाची साथ पाहिजे. मूर्तीच्या आकारातून विश्वाचा वेध घेत, आपला भाव व्यापक झाला पाहिजे. सगुण उपासना प्रेममय, रसमय व भावनेने ओथंबलेली आहे. अष्टसात्त्विकभाव फुलविणारी आहे. निर्गुण उपासना ज्ञानमय व कठीण आहे. पण तरीसुद्धा जन्मजन्मांतरींच्या वासनांचे मूळ व मनाचे सूक्ष्म मळ केवळ ज्ञानाने पुसून टाकता येत नाहीत, त्याला भक्तीची साथ पाहिजे. भक्तीला ज्ञानाची फुले आली पाहिजेत व ज्ञानाला भक्तीची



जोड पाहिजे. सगुणातून निर्गुणात जाणे हे सगुण भक्तीचे साध्य आहे. गणेशोत्सवात आपण मृत्तिकेची मूर्ती आणतो, घरी प्रतिष्ठापना करतो, विसर्जनापर्यंत साग्रसंगीत पूजा-अर्चा करतो व शेवटी पाण्यात विसर्जित करतो. आधी सगुणाची पूजा व शेवटी निर्गुणाची पूजा ही आपली संस्कृती आहे. विसर्जन म्हणजे मर्यादित ठेवलेल्या मूर्तीला व्यापक करणे. कणाकणांत, अणूरेणूंत, आकाशात मूर्तीला घेऊन जाणे म्हणजे विसर्जन. भक्तीचा झरा प्रथम सगुणातून निघाला तरी तो निर्गुणाला जाऊन पोहोचतो.

श्री ज्ञानेश्वरांनी या श्लोकावर निरूपण करताना, अर्जुनाच्या तोंडी त्याचे मनोगत सांगून सगुण-निर्गुणाचा योग्य तो निवाडाही केला आहे.

**तरि व्यक्त आणि अव्यक्त । हे तूंचि एक निभ्रांत ।**
**भक्ती पाविजे व्यक्त । अव्यक्त योगे ।।२३।।**
**या दोनी जी वाटा । तू ते पावावया वैकुंठा ।**
**व्यक्ताव्यक्त दाखंठा । रिगिजे येथ ।।२४।।**

"तर व्यक्त रूपाने व अव्यक्त रूपाने तूच एक आहेस, याविषयी संशय नाही. भक्तीने व्यक्त स्वरूपाची व योगाने अव्यक्त स्वरूपाची प्राप्ती होते." ।।२३।।

"हे वैकुंठा, व्यक्त व अव्यक्त असा जो तू, त्या तुझ्या प्राप्तीच्या उंबण्यात सोडणारे, भक्ती व योग हे दोन मार्ग आहेत." ।।२४।।

- अर्जुनाने विश्वरूप पाहिले पण ते पाहून तो भीतीने ग्रस्त झाला. श्रीकृष्णाच्या सगुण रूपाची सवय असल्यामुळे त्याने पुन्हा त्याच रूपात दर्शन द्यायची विनंती केली. दोन्हीही रूपे एकाच परमतत्त्वाची. व्यक्त व अव्यक्त हे दोन्ही एकाच श्रीकृष्णाचे आविष्कार होत हे स्वात्मलक्षण घट्ट धरूनदेखील त्याने प्रश्न केला आहे. विश्वरूप विराटाने व आदिअंतीच्या आकारभेदाने जरी द्वित्त्व भासत असले तरी अनुभवाच्या कक्षेत भगवंत एकच आहे याचा प्रत्यय अर्जुनाने घेतल्यामुळे तो निःशंक आहे. व्यक्ताव्यक्त हे एकच कसे आहे हे संत रामदासांनीही पुढील ओवीत प्रकट केले आहे -

**द्वैत पाहता ब्रह्म नसे । ब्रह्म पाहता द्वैत नसे ।**
**द्वैताद्वैत भासे । कल्पनेसी ।।** (दास. ७.५.१७)

सगुणरूप लाभण्यासाठी भक्तीची गरज व निर्गुण रूपासाठी योगभक्तीची आवश्यकता प्रतिपादिली आहे. "समत्वं योग उच्यते" या दुसऱ्या अध्यायातील योगानुभवाचा प्रत्यय भक्तीनेच येतो व असे झाले की,

**"जे जे भेटे भूत ।**
**ते ते मानिजे भगवंत ।।"** (ज्ञाने. १०.११८)

अशा वैश्विक ऐक्यतेचा बोध भक्तजीवनात सहजच साकार होतो. महाप्रभू चैतन्यसुद्धा असाच अनुभव स्पष्ट करतात.

**स्थावर जंगम देखे ना देखे तौर मूर्ति ।**
**जाहाँ जाहाँ दृष्टि पडे ताहाँ ताहाँ इष्टस्फूर्ति ।।**

भक्तभावातील अशा अनुभवास अव्यक्त बोधाचे आंदणच लाभलेले असते. भक्तीस सर्वत्र प्रभूचे रुपडे दिसते व त्यातच अद्वैत प्रकाशते. अव्यक्त रूपाला जाणण्यासाठीही मानवी बुद्धीत प्रभूप्रेमाचा आश्रय करावाच लागतो. ध्यानकाळीही स्वरूपाच्या प्रीतीने योगमार्गाचा अवलंब करावा लागतो. एकूण सगुण स्वरूपाच्या ठायी भक्ती आल्याशिवाय योगही अव्यक्त रूपापर्यंत नेऊ शकत नाही.

सोने अग्नीच्या ठायी प्रविष्ट झाल्यावर सोनेपणा सांडत नसून त्यात असलेला कलंक फक्त दूर होतो व निष्कलंक सुवर्ण बाहेर येऊन त्याचा कस उत्तम लागतो. त्याप्रमाणे अर्जुनाची एकदेशीय जाणीव शुद्ध करण्याकरिता अर्थात सर्वदेशीय करण्याकरिता 'विश्वरूप दर्शनाचा' प्रसंग निर्माण झाला. त्यानंतर सगुणाच्या ठायी वसत असलेली सर्वदेशीय अद्‌भुतता अर्जुनाला कळताच पुन्हा अर्जुनाच्या विनंतीने भगवंत आपल्या मूळ स्वरूपाला म्हणजे सगुणाला धारण करते झाले. सगुणरूपात तो आपल्या षड्गुणैश्वर्याने (ज्ञान, शक्ती, ऐश्वर्य, बल, वीर्य, तेज) विलसत असतो. एका सगुणातच व्यक्ताव्यक्त अशी दोन्ही रूपे नांदत असतात. भक्तियुक्त उपासनेत ज्ञान सहजच उगवते. भक्तिप्रेमातच ज्ञान विलसते. अर्जुनाने दोन्हीही रूपे पाहिली. योग व भक्ती या दोन्ही साधनांनी ते परब्रह्मरूपच प्राप्त होते असा त्याचा निश्चय होता. केवळ भक्तीनेच हे प्राप्त झाल्यामुळे त्याच्या मनात संदेह निर्माण झाला. म्हणूनच त्याने हा प्रश्न केला. भगवंताचे खरे स्वरूप भक्तीने की योगाने प्राप्त होते हे त्याला जाणावयाचे होते म्हणून हा अलौकिक प्रश्न केला. दोन्ही मार्गांनी हे जाणता येते हे माहीत असूनही त्यातील श्रेष्ठ मार्ग कोणता हे प्रत्यक्ष भगवंताकडून ऐकावे, अशी त्याची धारणा होती.

अर्जुनाप्रमाणे आपल्याही मनात वारंवार साधनाकाळात असे प्रश्न निर्माण होत असतात. अशा वेळी ज्ञात असलेले सर्व उपचार आपण अवलंबितो. कधी योगमार्ग स्वीकारतो, कधी ज्ञानमार्ग तर कधी कर्ममार्ग. प्रभूचे शाश्वत सुख लाभावे म्हणून जरी आपण प्रयत्नशील असलो, तरी कोणत्या मार्गाने प्रभूचे खरेखुरे स्वरूप लाभेल हे निःसंदेह न आकळल्यामुळे संभ्रमावस्थेतच साधना सुरू असते. आता अर्जुनाच्या प्रश्नाने हे संदेहाचे वादळ संपेल, कारण प्रत्यक्ष भगवंतच अर्जुनाच्या या प्रश्नाचे उत्तर देत आहेत.



अर्जुनाच्या या एका प्रश्नावर १२ व्या अध्यायाची मांडणी झाली आहे. उरलेल्या १९ श्लोकांत श्री भगवान कृष्णांनी भक्तिशास्त्र सांगितले. पहिल्याच श्लोकात श्री भगवान म्हणाले,

**मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते ।**
**श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः ।।२।।**

''माझ्या ठिकाणी मन ठेवून नेहमी युक्तचित्त होत्साते, परमश्रद्धेने जे माझी उपासना करतात ते माझ्या मते सर्वांत उत्तम, 'युक्त' म्हणजे योगी होत.'' ।।२।।

या एकाच महान श्लोकात भगवंतांनी भक्तीचे सार सांगितले आहे. संपूर्ण मूर्तिपूजेचे रहस्य ह्या श्लोकात मांडले आहे. भक्तियोगात 'मय्यावेश्य मनो ये माम्' हा भक्तीचा कणा आहे. 'नित्ययुक्त्या उपासते' - 'नित्ययुक्त हो', हा गीतेचा आग्रह आहे. भगवंताशी सतत जोडले जाणे म्हणजे 'नित्ययुक्त'. प्रथम मनाचे समर्पण व नंतर संपूर्ण जीवनाचे समर्पण यात सांगितले आहे. या संपूर्ण श्लोकात सगुणाच्या, 'व्यक्ता'च्या पूजेचे महत्त्व सांगितले आहे. निराकारात बसून चित्त एकाग्र करणे कठीण आहे. निर्गुण भगवंतात चित्तैकाग्रता साधणे अवघड असल्याने भगवंतांनी सगुण साकार रूपाचा आग्रह धरला आहे. जिथे गुण व आकार आहे अशा ठिकाणी मन स्थिर होऊ शकते. 'मन्मना भव' (९.३४) - 'तू मला मन दे' - हा आग्रह गीतेत भगवंतांनी सतत केला आहे. ''तू मन हे मीचि करी । माझ्या भजनी प्रेम धरी ।'' तुझ्या मनात केवळ मीच असलो पाहिजे. माझेच चिंतन, भजन झाले पाहिजे. माझ्याशिवाय कुठेही प्रेम असू नये ही भक्तीत भगवंताची मागणी आहे. उदबत्ती, अत्तर, फुले, प्रसाद ही सर्व साधने वातावरण निर्मिती व भक्तिरसाच्या उद्दीपनासाठी आहेत. पण जर अशा गोष्टींनाच आपण सर्वस्व मानले व भक्ती केली तर अपेक्षित फळ प्राप्त होत नाही. 'आनंदाचे डोही आनंद तरंग' हे भक्तीचे फळ आहे. आत्मानंद किंवा आत्मनिष्ठ आनंद जर लाभला नाही तर भक्तीच्या साधनात न्यूनता आहे हे पक्के समजले पाहिजे. 'मनो वा संकल्पः' - मन म्हणजे संकल्प, अशी उपनिषदांची व्याख्या आहे. संकल्प व विकल्प या मनाच्या दोन स्थिती आहेत. विकल्प म्हणजे करावे की न करावे? स्वीकारावे की न स्वीकारावे अशी अनिश्चित अवस्था! एक क्षणभरसुद्धा संकल्प-विकल्पाशिवाय मन स्वस्थ बसू शकत नाही. अशा अवस्थेत मनाची स्थिरता होण्यासाठी 'मय्यावेश्य...' होणे आवश्यक आहे.

मनाचा एक विशिष्ट स्वभाव आहे की, त्याला जिथे सुख प्राप्त होते तेथेच ते रमते व स्थिरही होते. ज्या ठिकाणी मन एकाग्र करतो त्याचा मनावर परिणाम होतो. म्हणून आपले मन सर्वशक्तिमान, षड्ऐश्वर्यसंपन्न, व्यापक अशा भगवंताच्या ठायी ठेवले पाहिजे. जसे आपले चिंतन असते, आपले मन तसेच बनते. स्त्रीचिंतनाने स्त्रैण, शौर्य-चिंतनाने शूर आणि हीन, क्षुद्र विचारांच्या चिंतनाने क्षुद्र बनते. मनातील भावना सगुण-साकार परमात्म्याशी जोडल्या की मनही तदाकार होते. अशा भगवंताशी जोडलेल्या मनात मग आत्मनिष्ठ आनंद निर्माण होईल. दिव्य, भव्य विचारांनी मनातील वासनांची जळमटे दूर होतील. हे सर्व होण्यासाठीच सगुण साकाराची पूजा! संत तुकारामांनी परखडपणे यातले तत्त्व समजावले आहे. ते म्हणतात,

**पाषाण देव, पाषाण पायरी ।**
**पूजा एकावरी, पाय ठेवी ।।**
**सार तो भाव, सार तो भाव ।**
**अनुभवी देव तेचि झाले ।।**

ज्या पाषाणावर आपण उभे असतो त्याच पाषाणाची भगवंताची मूर्ती असते. पण त्यातले मर्म वेगळेच आहे. जसा आपला भाव तशी व तेवढी भव्य मूर्ती! भावच नसेल तर कितीही आकर्षक मूर्ती असेल तर त्या नमस्काराला काय अर्थ? ती केवळ क्रियाच होईल. मूर्तिपूजा समजून केली पाहिजे. प्रथम स्थूलपूजा... पाना-फुलांनी व गंध-प्रसादांनी हळूहळू स्थूलपूजेतून गुणपूजेत यायला पाहिजे. ''शिवो भूत्वा शिवं यजेत् । देवो भूत्वा देवं यजेत् । कृष्णो भूत्वा कृष्णं यजेत् ।...'' शिवाचे गुण आत्मसात करून शिव, कृष्णाचे गुण घेऊन कृष्ण व्हायला पाहिजे. भक्तीच्या या अवस्थेत, भक्त व भगवान यांच्यात ऐक्य आहे. मूर्तीत एकाग्र होणे म्हणजे सर्वगुणसंपन्न अशा भगवंतासारखे होण्याची वृत्ती ठेवणे... भगवंताचे गुण जाणून घेऊन तसे होण्याचा प्रयत्न करणे. हीच भक्ती... यासाठीच स्थूल, साकार, सगुण रूपाची पूजा!

नंतर भगवंत म्हणतात,

''श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः'' परमात्म्यावर जर अचल श्रद्धा असेल तर मन इथे-तिथे भटकणार नाही. हरिनामात ज्याला गोडी वाटते, त्याला इतर क्षुद्र वस्तूंमध्ये फारसा रस वाटत नाही.

ज्याची श्रद्धा अतूट असते, तो या जगात भगवंतापेक्षा अधिक श्रेष्ठ काही मानत नाही. शिवाय कोणी कितीही त्याच्या श्रद्धेला तडा देण्याचा प्रयत्न केला तरी, जो अविचल, दृढ असतो व तसूभरही ढळत नाही, तो



भगवंताला प्रिय असतो. संत मीराबाईंची श्रद्धा व समर्पण इतके उत्कट होते की, महान संकटांनासुद्धा तिने हसत हसत स्वीकारले. कृष्णभक्तीत रंगून गेलेली मीरा म्हणत होती -

**''राणा जी मैं गोविन्द के गुण गाना ।**
**राणा रुठे नगरी लेले हरी रुठे कहाँ जाना ।''**

''राजा रागावला तर अधिकात अधिक काय होईल? नगरीतून बाहेर हाकलले जाईल. पण माझा भगवंत नाराज झाला तर मग मी कुठे जाऊ?'' किती आर्ततेने मीराने भगवंताला आळविले होते! भक्तीपासून परावृत्त करण्यासाठी राजाने सर्व काही प्रयत्न केले पण गोविन्दाच्या गुणगानापासून मीरा ढळली नाही. राजाने एकदा नागसापाचाही प्रयोग केला, पण त्या नागाच्या रूपातसुद्धा तिने भगवंताचे दर्शन घेतले. तिला जिथे तिथे गोविन्दच दिसत होता. श्रद्धेचे हे अनोखे दर्शन आहे. अशी श्रद्धा तर्क-वितर्क, प्रमाण, युक्ती-प्रयुक्ती या सर्वांच्या पलीकडे असते.

श्रद्धेचे स्थान हृदयात आहे. बुद्धीत विचारांना स्थान आहे. बुद्धी पिता तर हृदय आई आहे. या दोन्हींचा ताळमेळ, समतोल झाला तर जीवन सुस्थिर होते. हृदयामध्ये भक्ती, प्रेम यांचा विकास करायचा व बुद्धीने ज्ञान ग्रहण करायचे. केवळ बुद्धिवादी बनून तर्क-कुतर्क करण्यात काहीही प्राप्त होत नाही. कारण प्रेम-भक्ती हा हृदयाचा विषय आहे. जेव्हा चित्त द्रवते तेव्हा हृदय उचंबळून येते, प्रेमाची स्पंदने अशा वेळी निर्माण होतात व अशा द्रवलेल्या हृदयात भगवंताची मूर्ती स्थिरावते. जेवढी श्रद्धा अविचल, दृढ तेवढी भक्ती उत्कट. बुद्धीचे हे क्षेत्र नाही. आईची ममता-प्रेम, उत्कटता जसा बुद्धीचा विषय होऊ शकत नाही तसे भक्तिप्रेमाचे आहे. श्रद्धा हा विषय केवळ अंतःकरणाचा आहे. हृदयालाच हृदयाची भाषा समजते. भगवंतावर संपूर्ण एकाग्रतेने ध्यान करणाऱ्याला इतर विषयांचे आकर्षण राहत नाही. पूर्ण प्रेमाने भगवंताचे चिंतन करणाऱ्या भक्ताला संसाराचे व भोगविषयांचे प्रेम व आसक्ती राहत नाही. केवळ आध्यात्मिक क्षेत्रातच नव्हे तर लौकिक जीवनातसुद्धा ध्येयप्राप्तीसाठी श्रद्धेची नितांत आवश्यकता असते. श्रद्धेच्या जोरावर पंगूसुद्धा हिमालयाच्या उंच शिखरापर्यंत जाऊ शकतो. हेलन किलर- सारखी अंध, जगाच्या कल्याणासाठी महान कार्य करू शकते. ज्यांनी ज्यांनी उत्तुंग यश मिळविले त्या त्या महान व्यक्तींची श्रद्धा तशीच महान होती. श्रद्धा व समर्पण हे बिंब-प्रतिबिंबासारखे आहे. जितकी श्रद्धा अधिक तितके समर्पण अधिक.

श्री ज्ञानेश्वरांनी या दुसऱ्या श्लोकावर, पाच ओव्यांमध्ये सुंदर चित्रण

केले आहे. भगवंताला आवडणाऱ्या लाडक्या भक्ताचे हे वर्णन आहे. त्या ओव्या अशा -

**तरि अस्तुगिरीचा उपकंठी । रिगालिया रविबिंबापाठी ।**
**रश्मी जैसे किरीटी । संचरती ।।३५।।**
**वर्षाकाळी सरिता । जैसी चढों लागे पांडुसुता ।**
**तैसी नीच नवी भजता । श्रद्धा दिसे ।।३६।।**
**परि ठाकिलियाहि सागरू । जैसा मागीलही यावा अनिवारू ।**
**तिये गंगेचिये ऐसा पडिभरू । प्रेमभावा ।।३७।।**
**तैसे सर्वेंद्रियासहित । मजमाजी स्नि चित्त ।**
**जे रातिदिवो न म्हणत । उपासिती ।।३८।।**
**यापरी जे भक्त । आपणपे मज देत ।**
**तेचि मी योगयुक्त । परम मानी ।।३९।।**

"तर अर्जुना, अस्ताचलाच्या समीप सूर्य गेल्यानंतर सूर्यबिंबामागून जशी किरणे जातात." ।।३५।।

"अर्जुना, ज्याप्रमाणे पावसाळ्यात नदीचे पाणी रोज वाढते, त्याप्रमाणे माझे भजन करीत असताना माझ्या भक्तांचे प्रेम नित्य नवे वाढणारे दिसते." ।।३६।।

"परंतु गंगानदी समुद्रास प्राप्त झाल्यानंतरही जसा मागील पाण्याचा अनिवार लोट येत राहतो, ह्या गंगेसारखा ज्याच्या प्रेमभावाला जोर असतो." ।।३७।।

"तसेच जे रात्र आणि दिवस असे काही न म्हणता सर्व इंद्रियासहित माझ्या स्वरूपी दृढ अंतःकरण ठेवून माझी उपासना करतात." ।।३८।।

"याप्रमाणे जे भक्त मला आपला आत्मभाव देतात, त्यांनाच मी श्रेष्ठ प्रतीचे योगयुक्त मानतो." ।।३९।।

पहिल्या ओवीत निसर्गाचे नयनमनोहर दर्शन डोळ्यापुढे उभे राहते. उदयगिरीचा सूर्य अस्तंगिरीकडे निघाला आहे. सूर्य पश्चिमेला अस्तंगिरीवर आल्यावर पृथ्वीवर श्याम व मंद प्रकाश पसरला आहे. सूर्य आपली द्युतिमान किरणे वेचून क्षितिजापलीकडे कलंडत आहे. त्याची अंगभूत किरणे स्वभावानेच सूर्याकडे निघाली आहेत. या निसर्गदृश्यात श्री ज्ञानेश्वरांनी पारमार्थिक रहस्य सांगितले आहे. या प्रसंगाशी तंतोतंत जुळणारा एक वेदांतर्गत प्रसंग आहे. त्यावरील निसर्गदृश्यातून हा वैदिक संकेत प्रकट झाला आहे. सूर्य-किरणांना वेदामध्ये गायींची उपमा दिली आहे व सूर्य म्हणजे गोपवेषधारी श्रीकृष्ण. संध्याकाळची वेळ आहे. श्रीकृष्ण घराकडे परतत आहे. आणि



त्याच्या मागून या गायी वळत आहेत. गोकुळाच्या वाटेवरील रमणीय संध्याकाळ डोळ्यांसमोर उभी राहते. किरणरूप गायी विष्णुरूप सूर्यामागे स्वगृही-विष्णुपदी निघाल्या आहेत. सूर्य-कृष्ण हे उपास्य, किरण-गायी हे साधक व अस्तंगिरी-गोलोक हे भक्तिलीलास्थान असे भक्तीचे नितांत रमणीय चित्र, भक्तीची उदात्त कल्पना या ओवीतून प्रकट झाली आहे. सूर्य व किरणे म्हणजे भगवान व भक्त. किरण जसे एकनिष्ठतेने सूर्यामागून जातात तसे भक्ताने अव्यभिचारी निष्ठेने व समर्पित वृत्तीने भगवंतामागून जावे.

३६ व्या ओवीमध्येसुद्धा ज्ञानेशांनी श्रद्धेचे स्वरूप सांगितले आहे. येथे श्रद्धा ही सरिता-नदी व वर्षाकाल ही भगवत्कृपा वा भक्तिसुखानुभव! पावसाळ्यात दुथडी भरून वाहणाऱ्या नदीचे पाणी सतत वाढत असते. वर्षाकाळाची ही कृपा असते. त्याचप्रमाणे भक्त जेव्हा सगुण भक्तीत आत्यंतिक श्रद्धेने समरस होऊन भक्ती करतो तेव्हा परमात्मा आपल्या कृपेचे मेघ पालथे करून भक्ताच्या श्रद्धेने अतिसुखाची गोडी वाढवीत असतो. मेघातील पाणी नदीच्या पाण्यात जसे मिसळून जाते त्याप्रमाणे भगवंताच्या ठिकाणी असलेले भक्तप्रेम भक्ताच्या श्रद्धेत श्रद्धारूप होऊन नांदू लागते. भक्त जसजसा भगवंतावर प्रेम करू लागतो, तसतसा भगवंतही प्रेमरूपच असल्यामुळे प्रेमाने पाझरू लागतो. श्रद्धेतून भक्ताचे चित्त शुद्ध होऊ लागते. मग त्याला भगवत्कृपेने व आत्यंतिक सुखाने ज्ञान प्राप्त होते. चित्तशुद्धी होऊ लागणे ही अंतःकरणात पडणाऱ्या भगवद्कृपेच्या पावलांची साक्ष होय. श्रद्धेच्या निर्मळ प्रवाहाने परमात्मा स्निग्ध-प्रेमळ होऊन प्रकट होतो. म्हणून श्रद्धा ही जीवन घडविणारी महान शक्ती आहे. श्रद्धेतूनच जीवनात मूलभूत असलेली सर्व शक्तिमान तत्त्वे प्रकट होतात. श्रद्धाच चित्कला आहे. अंतःप्रेमसंवेदनाच सकंप होऊन श्रद्धेचा आकार घेते. श्रद्धेद्वारे चैतन्याची ज्योती भक्तसदनात हळूहळू प्रकाशमान होते. श्रद्धेचे उद्भवन भक्तजीवनात लाभणे ही ईश्वरकृपाच असते. सत्संगतीत व संतकृपेने सात्त्विकी श्रद्धेचे उद्भवन होते. श्रद्धा ही मानण्याची बाब नाही तर ती एक आत्मप्रत्ययी संज्ञा आहे. जीवनात श्रद्धेचे रूप ज्या अभिरुचीचे असेल त्या पातळीचे जीवन मनुष्य जगत असतो. श्रद्धा म्हणजे चित्ताच्या अवस्थेचे; अभिप्रायाचे दर्शन आहे. आपण जे मन-वाणीद्वारे प्रकटीकरण करतो तेच आपल्या श्रद्धेचे रूप असते. जीवनाला उच्चतेकडे नेणारे श्रद्धा हेच एकमेव साधन आहे. जीवन दिव्य, उदात्त व परिपूर्ण करू इच्छिणाऱ्या प्रत्येकाला श्रद्धेनेच पुरस्सर व्हावे लागते. परमार्थात तर श्रद्धेवाचून 'प्रगती' हा शब्दच उद्भवत नाही. म्हणून १२ व्या अध्यायाच्या

या महान, मंगल श्लोकात भगवंतांनी ''श्रद्धया परयोपेतास्ते'' या शब्दांची योजना केली आहे. परमश्रद्धेने जे भगवंताची उपासना करतात व ज्यांनी आपले मन भगवंताला अर्पण केले आहे असे, निरंतर अनुसंधान ठेवून भक्ती करणारे भक्त सर्वांत उत्तम योगी आहेत असा भगवंताचा निर्वाळा आहे.

'श्रद्धावान लभते ज्ञानम्' - श्रद्धा असेल तरच माणसाला ज्ञानप्राप्ती होते. श्रद्धा म्हणजे समर्पण, प्रेम! भगवंताविषयी जेवढे प्रेम वाढेल तेवढी प्रपंचातील नश्वर वस्तूंविषयीची आसक्ती कमी होईल. जेवढी एकाग्रता वाढेल तेवढी ईश्वराविषयीची ओढ वाढेल. अशा समर्पित स्थितीचे नाव श्रद्धा आहे. लौकिक व्यवहारातसुद्धा माणसाची आपल्या कार्यावर जर दृढ श्रद्धा असेल तर तो प्रगतिपथावर निश्चितपणे पुढे जातो. परमार्थातही असेच आहे. म्हणून भगवंत या श्लोकात म्हणतात की, श्रेष्ठ भक्त तोच आहे की, जो प्रभूशी सतत जोडलेला आहे, ज्याचे मन प्रभुचरणी अर्पित झाले आहे, ज्याची श्रद्धा अगाध आहे, असा भक्त भगवंताला अत्यंत प्रिय आहे.

उपासना निर्गुण असो की सगुण, जो भक्त भगवंताशी सदैव जोडलेला राहतो, तोच भगवंताच्या मते सर्वोत्तम योगी होय. सगुणापेक्षा निर्गुणाची भक्ती अधिक अवघड आहे, हाच त्या दोन्ही भक्तांमधील फरक होय.

हीच बाब अधिक स्पष्टपणे सांगण्यासाठी भगवंत पुढे म्हणतात -

**ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते ।**
**सर्वत्रगमचिन्त्यं च कूटस्थमचलं ध्रुवम् ।।३।।**
**सन्नियम्येन्द्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः ।**
**ते प्राप्नुवन्ति मामेव सर्वभूतहिते रताः ।।४।।**
**क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।**
**अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ।।५।।**

''पण जे अनिर्देश्य (प्रत्यक्ष दाखविता न येणारे), अव्यक्त, सर्वव्यापी, अचिंत्य आणि कूटस्थ [म्हणजे सर्वोपरी तसेच सर्वांच्या बुडाशी असणारे (मूळ तत्त्व)], अचल व नित्य अशा अक्षराची म्हणजे परब्रह्माची उपासना - सर्व इंद्रिये आवरून, सर्वत्र समबुद्धी होत्साते करितात ते सर्व भूतांच्या हितात गढलेले (लोकदेखील) मलाच येऊन पोचतात.''

''(तथापि) ज्यांचे चित्त (त्या) अव्यक्त (अक्षर तत्त्वा)च्या ठिकाणी आसक्त आहे, त्यांना (साधना करतेवेळी) क्लेश अधिक पडतात. कारण, व्यक्त देहधारी मनुष्यास अव्यक्तोपासनेचा मार्ग कष्टाने सिद्ध होतो.''



हे सगळे विश्व, जे व्यक्त आहे ते आणि जे अव्यक्त आहे ते, दोन्ही 'एकमेवाद्वितीयम्' (छा. उप. ६.२.१) म्हणजेच 'एकमेव' आणि 'अद्वितीय' अशा परब्रह्माचीच अभिव्यक्ती आहे. खरेतर, परब्रह्म मूलतः अव्यक्त (न दिसणारे), अक्षर (अविनाशी) तत्त्व आहे. ते सर्वव्यापी, अचल (सदैव स्थिर असणारे) आणि ध्रुव (कधीही न बदलणारे) असून ते निर्गुण (कोणतेही गुण नसणारे) असल्याने अनिर्देश्य आणि अचिंत्य आहे. त्याचे वर्णन किंवा चिंतन करता येत नाही. योगी लोक ध्यानात स्थिर होऊन, आपल्या सर्व इंद्रियांना आपल्या अधीन करून, मनाच्या निर्विकार आणि प्रशांत स्थितीत त्या परमशांत परमतत्त्वाला फक्त सूक्ष्म बुद्धीने अनुभवू शकतात. ज्याप्रमाणे शांत सरोवरात आकाशाचे प्रतिबिंब पडते त्याप्रमाणे गहनतम ध्यानाच्या स्थितीत 'सोऽहम्' (ईशा. उप. १६) म्हणजे 'मी तेच आहे' या प्रचीतीने ते योगी तृप्त होतात. सर्व जग ईश्वराचीच अभिव्यक्ती आहे, हा बोधही मनाला होतो. सर्व प्राणिमात्र तोच आहे, अशा बोधाने प्राणिमात्रांविषयी आत्मीयतेचा अनुभव येतो आणि सर्वांविषयीच्या मंगल भावनेने मन भरून येते. आणि म्हणून त्यांचे आयुष्य सर्वांच्या कल्याणात गुंतून जाते. परंतु देहधारी असल्याने मनुष्यास अशाप्रकारे या निर्गुण, इंद्रियातीत अक्षरतत्त्वाशी जोडले जाणे फार कठीण होते. या स्थितीत पोचण्यासाठी बहुतेक साधकांना जन्मोजन्मी साधना करावी लागते. उलटपक्षी, भगवंतांचे 'सगुण निराकार' ईश्वर-रूप किंवा 'सगुण साकार' अवतार-रूपाशी आपले मन सहजपणे जोडले जाऊ शकते. सगुण निराकारापेक्षा सगुण साकार मूर्तिरूपाशी जोडले जाणे आपल्याला आणखी सोपे पडते, कारण देहधारी असल्याने इंद्रियगम्य अनुभवांशी आपण सरावलेले असतो.

भगवंतांनी सर्वप्रथम व्यापक, निराकार, अक्षर रूपाचे वर्णन केले. अशा परमतत्त्वाचे वर्णन करता येत नाही. शब्दांच्या माध्यमातून अंगुलीनिर्देश करता येत नाही. म्हणून सर्व शास्त्रांतून त्याचे वर्णन केवळ 'तत्' या शब्दाने केले आहे. ''हरिः ॐ तत् सत्'' या मंत्रात 'तत्' शब्द वापरला आहे. याचा साधा अर्थ आहे, ''ती सत्ता''. केवळ त्या दिशेने इशारा करू शकतो पण शब्दातून वर्णन मात्र करता येत नाही. म्हणून त्याचे वर्णन अनिर्वचनीय असे केले आहे. त्याने निर्माण केलेले जग व्यक्त आहे पण तो निर्माता अव्यक्त आहे. चित्र दिसते पण चित्रकार दिसत नाही. त्याने केलेली व्यवस्था जाणता येते, पण व्यवस्थापक दिसत नाही. जगात सर्व काही त्याच्या नियमाने चालते पण तो नियामक दिसत नाही. सूर्य व चंद्र-तारे यातील प्रकाश, तेज त्याचेच आहे पण तो दिसत नाही. त्याने निर्माण

केलेले जग परिवर्तनीय आहे. त्याला आदि, अंत आहे पण निर्माता मात्र सदासर्वदा आहे. अशा अव्यक्त परमेश्वराचे वर्णन ऋषिमुनींनासुद्धा करता आले नाही. अशा सर्वव्यापक भगवंताची त्यांनी अनुभूती घेतली पण त्याचा निर्देश मात्र त्यांना करता आला नाही. कारण परमात्मा आपल्या बुद्धीने समजत नाही. भक्तीने व ज्ञानाने जाणता येते व जवळही पोहोचता येते, पण भक्तीत समर्पण व प्रेम याची पूर्णता पाहिजे व ज्ञानी माणूस अहंकारशून्य झाला पाहिजे. दोन्ही मार्ग पूर्ण आहेत. आपल्या इंद्रियांना संयमित करून असा ज्ञानी, निर्वैर होऊन सर्वभूतमात्रांच्या कल्याणाचा ध्यास घेतात. शेवटी हे ज्ञानीसुद्धा भगवंताला प्राप्त करतात. पण भगवंत इथे स्पष्ट करतात की, जे निराकार, अव्यक्त स्वरूपाची साधना करतात त्यांचा मार्ग अधिक कठीण आहे. मुळात ज्ञानमार्ग हा क्लेशदायक. प्रज्ञावान व्यक्ती भक्तिमार्गाला अनुसरेल हे आधी दुर्मिळ व त्यातून त्याने भक्तिमार्ग स्वीकारलाच तर, निरहंकारी होऊन वैराग्याला धारण करणे हे त्याहूनही कठीण. ज्ञानासारखे पवित्र या जगात काहीही नाही, पण हे ज्ञान प्राप्त करणे ही सुळावरील पोळी आहे. म्हणून ज्ञानी भजन-कीर्तनात रमत नाहीत व प्रेमपूर्ण भक्तिमार्ग स्वीकारणारे ज्ञानात रममाण होत नाहीत. या दोन्ही मार्गांत रस न घेणारे कर्ममार्गी होतात. त्यांना कर्म करणे एवढेच समजते. पण कर्म तरी कसे घडते? विचारांनी प्रेरणा घेऊन कर्म घडते. या विचाराबरोबर जर वृत्ती व भावना या कल्याणकारी असतील तर तसे आनंददायी कर्म हातून घडते. हृदयात संवेदना, बुद्धीत जाणिवा व इंद्रियांकडून कर्म असा ताळमेळ मनुष्याच्या जीवनात घडला पाहिजे. प्रत्येक व्यक्ती ही आंतरिक वृत्ती-प्रवृत्तींनी व स्वभावधर्माने वेगवेगळी असल्यामुळे भक्तीचे हे मार्गही वेगवेगळे असू शकतात. ज्ञानवादी लोक दार्शनिक दृष्टी स्वीकारून अव्यक्त स्वरूपाची; निराकार ब्रह्माची उपासना श्रेष्ठ मानतात व संवेदनाशील भावनिक लोक हृदयात भक्तिप्रेम साठवून, समर्पित भावनेने भजन-कीर्तनात प्रभूची आराधना करतात. म्हणून भगवंत सहाव्या व सातव्या श्लोकांत भक्तीचा सुलभ मार्ग विशद करीत आहेत. भगवंतांनी या दोन श्लोकांतून भक्तांना आश्वासन दिले आहे. देहधारी मनुष्यांना आचरण्यास सोपा व भवसागरातून निश्चित तारून नेणारा हा मार्ग आहे. ज्ञानमार्ग क्लेशदायक असल्याने या सुलभ मार्गाचे दर्शन येथे भगवंतांनी घडविले आहे. ते श्लोक असे -

**ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः ।**
**अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते ।।६।।**
**तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।**
**भवामि नचिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् ।।७।।**



"पण जे माझे ठायी सर्व कर्मांचा संन्यास म्हणजे अर्पण करून मत्परायण होत्साते, अनन्ययोगाने माझे ध्यान करून मला भजतात, त्या मच्चित्त झालेल्या लोकांचा विलंब न लाविता हे पार्था! मी या मृत्युमय संसारातून उद्धार करीत असतो."

अव्यक्त, निर्गुण, अक्षर तत्त्वामध्ये मनाला स्थिर करण्याच्या प्रयत्नापेक्षा ईश्वराच्या मंगलमय गुणांचे स्मरण करून त्याचे पारायण करून, अनन्य भावाने त्याचे ध्यान करीत, आपली सर्व कर्मे ही त्याचीच पूजा आहे, असे मानून ती करणे, ही गोष्ट सोपी आहे. ज्यांचे चित्त या प्रकारे भगवंतात एकरूप झाले आहे अशा सर्व भक्तांच्या या मृत्युरूपी भवसागरातून - जिथे सर्व मृत्यू पावणारेच राहतात, भगवंत स्वतः त्वरित उद्धार करतात. या जगात राहूनही जे जगाविषयी आसक्तीची भावना न बाळगता प्रभूशी कायम जोडले गेलेले असतात, ते दुःखमुक्त राहून, एक उच्च, कल्याणमय, शांतिमय स्थितीत जगू लागतात आणि देहत्याग केल्यानंतर त्यांचा पुनर्जन्म होत नाही. भगवंत पुढे म्हणतात -

**मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय ।**
**निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः ।।८।।**

"(म्हणून) माझ्याच ठायी मन ठेव, माझ्या ठायी बुद्धी स्थिर कर, म्हणजे पुढे माझ्या ठायीच तू निवास करशील, यात संशय नाही." ।।८।।

नंतर भगवंत म्हणतात -

**अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरम् ।**
**अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनंजय ।।९।।**
**अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव ।**
**मदर्थमपि कर्माणि कुर्वन् सिद्धिमवाप्स्यसि ।।१०।।**
**अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः ।**
**सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान् ।।११।।**
**श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते ।**
**ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छान्तिरनन्तरम् ।।१२।।**

"आता (याप्रमाणे) माझ्या ठायी चांगल्या प्रकारे चित्त स्थिर ठेवणे तुला होत नसेल तर हे धनंजया! अभ्यासाच्या साहाय्याने पुनःपुन्हा प्रयत्न करून माझी प्राप्ती करून घेण्याची उमेद राख. असा अभ्यास करण्यासही तू असमर्थ असशील तर 'मत्कर्मपरमः' म्हणजे माझी सेवा किंवा पूजा म्हणून कर्म करणारा हो. माझ्यासाठी कर्मे केल्यानेही तू सिद्धी पावशील. पण हे करण्यासही जर तू असमर्थ असशील तर 'मद्योगम् आश्रितः' म्हणजे

माझ्याबरोबर जोडले जाण्याची इच्छा बाळगून, 'यतात्मा' होऊन म्हणजे मनावर नियंत्रण करून, सर्व कर्मांच्या फलांचा त्याग कर.''

''कारण अभ्यासापेक्षा ज्ञान अधिक चांगले, ज्ञानापेक्षा ध्यान अधिक योग्यतेचे, आणि ध्यानापेक्षा कर्मफलाचा त्याग श्रेष्ठ; त्यागापासून लगेच शान्ती प्राप्त होते.''

लोकांचा स्वभाव आणि मनाची स्थिती निरनिराळ्या पातळ्यांवर वावरत असते. सर्वांसाठी एकच ठराविक साधना उपयुक्त ठरत नाही. कारण ते तशी करू शकत नाहीत.

श्लोक ८ ते ११ मध्ये भगवंतांनी चार प्रकारचे भक्तीचे मार्ग सांगितले आहेत. मन व बुद्धी भगवंताला अर्पण करणे हा पहिला मार्ग आहे. हे जमले नाही तर अभ्यासयोग स्वीकारणे हा दुसरा मार्ग. हेही करणे शक्य नसेल तर भगवंतासाठी कर्म करणे हा तिसरा मार्ग व शेवटचा मार्ग म्हणजे सर्वकर्मफलांचा त्याग करणे. भगवंताजवळ जाण्याचे हे चार रस्ते स्वतः परमात्म्यांनी इथे दाखविलेले आहेत.

पहिल्या मार्गात भगवंत मन व बुद्धी मागत आहेत. मन देणे म्हणजे परमात्म्याला संकल्पकर्ता करणे. बुद्धी म्हणजे निर्णय. व बुद्धी देणे म्हणजे भगवंताला निर्णयकर्ता करणे. मनात व बुद्धीत केवळ भगवंतच राहिला तर भगवंताकडे समर्पित भावनेने पाहता येईल. भावमय जीवनाशिवाय समर्पण होत नाही. प्रभूविषयीचा भाव वाढण्यासाठी सतत त्याचे चिंतन केले पाहिजे. जे जे कर्म हातून घडेल ते ते सर्व त्याला अर्पून मोकळे व्हायचे. मनातील विकल्प, अहंकार दूर करून प्रभूचरणी लीन व्हायचे. असे झाले तर चित्तैकाग्र्याची साधना सफल होईल. बुद्धीत त्याचेच चिंतन असेल. मन, बुद्धी जशी असेल तसेच जग आपल्याला दिसते. जसे मन, तशी वृत्ती. जशी वृत्ती तशी दृष्टी व जशी दृष्टी तसे जग भासते. मनात जशी चिंतनधारा असेल तसे मन बनते व बाहेरील जग पाहते. म्हणून भगवंत म्हणतात की, मनात केवळ माझाच ध्यास कर. बुद्धीसुद्धा जिथे मन, ध्यान, आसक्ती असेल तेथेच धावते. प्रपंचात मन, बुद्धी गुंतवायची नाही. प्रपंचात केवळ कर्तव्यभावनेने व निष्कामभावनेने कर्म करायचे व मन, बुद्धी भगवंताला अर्पण करायची. तसे झाले तर भगवंताचा प्रसाद म्हणून आनंद व प्रसन्नता याची प्राप्ती होईल व संसारात मन अडकले तर अशांती, दुःख याशिवाय दुसरे काही मिळणार नाही. म्हणून भगवान म्हणतात की, जर कोणी आपले मन आणि बुद्धी मला देऊन, माझ्याशी पूर्णपणे जोडले जाण्याची साधना करण्यास असमर्थ असेल, तर त्यांच्यासाठी तुलनेने सोपा उपाय



म्हणजे अभ्यासयोग. उदा. वारंवार ईश्वरी गुणांचे मनन करावे; भजन-कीर्तन करावे, स्वाध्याय करावे, आणि अशा प्रकारे अभ्यास करीत करीत ईश्वराशी जोडले जावे.

हा अभ्यासयोग म्हणजे आपली आंतरिक वृत्ती बदलणे. सत्संगाचा अभ्यास करणे. ईश्वरनिष्ठांच्या, संत-महात्म्यांच्या संगतीत आपले आचार-विचार शुद्ध होतात. जीवन दैवी करण्यासाठी उदात्त विचारांचे बुद्धीला रोज स्नान घडावे लागते. मनातील किल्मिषे जाण्यासाठी अंतःकरणशुद्धीची आवश्यकता असते. अंतःकरणात जोपर्यंत कर्तृत्वभाव आहे, मी-माझे हा दृढ भाव जोपर्यंत आहे तोपर्यंत ही शुद्धी होत नाही. म्हणून सतत अंतर्मुख होऊन आत्मपरीक्षण करणे हाही अभ्यास आहे. गीतेतील १६ व्या अध्यायाचे प्रयोजन या आत्मपरीक्षणासाठीच आहे. मनातील विकार नष्ट होणार नाहीत पण त्यांचे उदात्तीकरण व विभूतीकरण होणे शक्य आहे. विकारामुळे जी इंद्रिये भोगवादी झाली आहेत त्या इंद्रियांना भाववादी करायचे. भक्त व भगवंत यांच्यामध्ये या काम-क्रोधादि विकारांचाच अडसर असतो. तुकारामांच्या भाषेत...

**काम क्रोध आड पडले पर्वत ।**
**राहिला अनंत पलिकडे ।।**

या भगवंताची प्राप्ती केव्हा होते? त्यांच्याच शब्दात...

**तुका म्हणे देह भरला विठ्ठले ।**
**काम-क्रोधे केले घर रिते ।।**

मनातील हे विकार नष्ट करण्यासाठी सतत भगवंताचे अनुसंधान ठेवले पाहिजे. चिंतन, मनन, निदिध्यासन, अनुसंधान हा अभ्यासाचा भाग आहे.

नवव्या श्लोकावर निरूपण करताना श्री ज्ञानेश्वरांनी एक सुंदर विचार मांडला आहे. ते म्हणतात,

**अथवा हे चित्त । मनबुद्धीसहीत ।**
**माझा हाती अचुंबित । न शकसी देवों ।।१०४।।**
**तरि गा ऐसे करी । या आठा पाहारामाझारी ।**
**मोटके निमिषभरी । देतु जाय ।।१०५।।**
**मग जे जें का निमिख । देखेल माझे सुख ।**
**तेतुले अरोचक । विषयी घेईल ।।१०६।।**
**तैसे भोगाआंतूनि निगता । चित्त मजमाजी रिगता ।**
**हळूहळू पांडुसुता । मीचि होईल ।।१०९।।**

"अथवा जर मनबुद्धीसहित हे चित्त माझ्या हाती तू संपूर्णपणे देऊ शकणार नसशील," ।।१०४।।

"तर अर्जुना, असे कर की, या आठ प्रहरांमध्ये नेमके निमिषभर चित्त मला देत जा." ।।१०५।।

"मग जितके जितके निमिष, तुझे चित्त माझे रूप पाहील, तितके तितके तुझे चित्त विषयांच्या ठिकाणी अरुची घेईल." ।।१०६।।

"त्याप्रमाणे भोगातून तुझे चित्त निघून माझ्यामध्ये प्रवेश करता करता, अर्जुना ते तुझे चित्त हळूहळू मद्रूप होईल."।।१०९।।

– ज्ञानेश्वरांनी हा अभ्यासयोग सांगितला. एक क्षण जरी आपण भगवंताला आपले चित्त दिले, तरी त्या क्षणात भगवंताचा वास मिळेल व भोगविषयातून हळूहळू आपले मन परावृत्त व्हायला लागेल. निमिष म्हणजे डोळ्याची पापणी खाली-वर होण्यासाठी जेवढा वेळ लागतो तो क्षण! हे क्षण जितके वाढतील तेवढे आपण भगवंताजवळ जाऊ व तितकी अरुची प्रपंचातील वस्तूविषयी व्हायला लागेल. कारण भगवंतच मन-बुद्धीचा विषय होईल. एखाद्याला हेही शक्य नसेल तर तो जे काही करीत आहे, ती माझीच पूजा आहे, अशी भावना त्याने ठेवावी. भक्तीतील "मदर्थमपि कर्माणि कुर्वन्..." हा चौथा रस्ता भगवंताने सांगितला. 'माझ्यासाठी सर्व कर्मे करून तू सिद्धी प्राप्त करून घेऊ शकतोस.' अर्जुनाने केवळ भगवंताचे काम केले. त्या सर्वात्मक ईश्वराची पूजा, आपल्या कर्मरूपी फुलांची ओंजळी त्याच्या चरणावर ठेवून करायची. जे जे कर्म, भोग, दान, तप, यज्ञ आपल्या हातून होईल त्या सर्वांतून कर्तृत्वभाव काढून टाकून, समर्पित भावनेने ते ईश्वराला अर्पण केल्याने ती कर्मेही शुद्ध होतात. शुद्ध भावाने निरहंकारी होऊन केलेली शुद्ध कर्मे भगवंताला आवडतात. ऋषी-मुनींनी, संत-महात्म्यांनी भगवंताची कामे केली. असे काम हीच त्यांची पूजा होती. जे जे वैभव, अधिकार, सत्ता, संपत्ती, कौशल्य, विद्या, गुण आपल्याला प्राप्त झाले ते ते सर्व प्रभूचा प्रसाद समजून, प्रभूच्याच कामासाठी खर्च करणे यासारखी दुसरी श्रेष्ठ पूजा नाही. तिरुवल्लूवर, कबीर यासारखे श्रेष्ठ संत वीणकाम करता करता भगवंताची भक्ती करीत. वाट्याला आलेले काम समर्पित भावनेने करून त्यांनी सिद्धी प्राप्त करून घेतली. शास्त्रांनी जी विहीत कर्मे सांगितली आहेत व जी स्वभावधर्मानुसार वाट्याला आली आहेत ती निश्चिंत मनाने करावीत व जी निषिद्ध कर्मे आहेत ती पूर्णपणे त्यागावीत. भगवंताला आवडणारी कर्मे करताना ती कर्मे मी करीत आहे असा भावसुद्धा मनात आणू नये. भगवंतांनी आपल्याला केवळ निमित्त केले आहे अशी निश्चित



धारणा मात्र मनात ठेवावी. ज्या परमेश्वराच्या सत्तेने हे विश्व चालले आहे त्या सर्वज्ञ परमेश्वराला आपल्यातील न्यूनत्व व पूर्णत्व हे पक्के माहीत असते. म्हणून कर्माच्या श्रेष्ठतेविषयी अथवा कनिष्ठतेविषयी खंत अथवा संतुष्टी हे काहीही न ठेवता केवळ समर्पित भावनेने अशी कर्मे करावीत. श्री ज्ञानेश्वरांनी हा भाव या श्लोकावरील निरूपणात व्यक्त केला आहे. ते म्हणतात -

**माळिये जेऊते नेले । तेऊते निवांतचि गेले ।**
**तया पाणिया ऐसे केले । होआवे गा ।।१२०।।**
**आणि जे जे कर्म निपजे । ते थोडेबहु न म्हणिजे ।**
**निवांतचि अर्पिजे । माझा ठायी ।।१२३।।**
**ऐसिया मद्भावना । तनुत्यागी अर्जुना ।**
**तू सायुज्य सदना । माझिया येसी ।।१२४।।**

"अरे, माळ्याने जिकडे नेले, तिकडे काहीएक तक्रार न करता जाणाऱ्या पाण्याप्रमाणे तुझे जीवित निरभिमान होऊन कर्म करणारे होऊ दे." ।।१२०।।

"आणि जे जे कर्म घडेल, ते कमी अथवा जास्त म्हणू नकोस, तर ते निमूटपणाने माझ्या हाती अर्पण कर." ।।१२३।।

"अर्जुना, अशा माझ्या रूपाच्या अनुसंधानाने शरीरत्यागानंतर तूच सायुज्यमुक्तिरूप माझ्या निवासस्थानी येशील." ।।१२४।।

मळ्यामध्ये अथवा बगिचामध्ये माळी पाण्याला जेथे व जसे नेतो तेथे ते पाणी निवांतपणे जाते. तसेच या विश्वाचा माळी तो नियंता, भगवान आहे. त्याने आपल्या या संसाररूपी बगिचेमध्ये आपल्याला जेथे व जसे ठेवले आहे त्याबद्दल काहीही तक्रार न करता आनंदाने कर्म करीत जावे व जे जे कर्म हातून घडेल ते ते सर्व त्याला अर्पण करून कर्मबंधनातून मोकळे व्हावे. पाण्यासारखे जीवन जगण्याने, मृत्यूनंतर, भगवंताच्या परमधामात आपल्याला स्थान मिळेल हे भगवंताचे आश्वासन आहे. पण ज्या कुणाला हेही शक्य नसेल, त्याने आपल्या मनाशी संयम बाळगून, कर्मफळाचा त्याग करावा. म्हणजे प्राप्त फलावरील मालकीहक्काची भावना सोडून द्यावी.

हा चौथा भक्तीचा मार्ग सर्वकर्मफलत्यागाचा आहे. हा निष्काम भावाने कर्म करण्याचा निःसंगतेचा मार्ग आहे. कर्म तरी करायचे पण त्याच्या फळाचा त्याग करायचा. दान करायचे पण घेणाऱ्याच्या धन्यवादाचा शब्द न ऐकता तेथून बाहेर पडायचे. अनुपकाराची किंवा या ना त्या स्वरूपात परतफेडीची यत्किंचितही अपेक्षा न करता. यज्ञ करायचा पण यज्ञफळाची अपेक्षा न करता. सेवा करायची पण सेवेचे फळ घ्यायचे नाही. परोपकार

करायचा पण निष्काम भावनेने. प्रपंचातले प्रत्येक काम सहेतुक असते. मुलगा मोठा झाल्यावर वृद्धत्वात आपला आधार होईल म्हणून मनात इच्छा बाळगायची व तसे झाले नाही की दुःखी व्हायचे. नातेवाईक, मित्रमंडळी यांच्यासाठी काही चांगले करायचे पण त्यांच्याकडून कृतज्ञतेची अपेक्षा बाळगून. असे जे जे काम आपल्या हातून घडेल त्यातून कोणत्याही फळाची अपेक्षा न करता जे परोपकारी कार्य होईल, त्यातूनही भगवंताची प्राप्ती होईल. जसे परमात्म्याची कृपा कळते पण त्याचे कल्याण करणारे हात दिसत नाहीत. भगवंताचे प्रेम कळते पण त्याचे कमलनयन दिसत नाहीत. परमात्म्याने कधी आपल्याजवळ हिशोब ठेवला नाही की, केव्हा केव्हा कोणाकोणावर उपकार केले. या जगात कर्म केलेच पाहिजे असे कोणतेही बंधन त्याच्यावर नाही. पण तो सतत कर्म करीत असतो तेही निष्काम भावनेने. समदृष्टी ठेवून. म्हणून दोन गोष्टी जीवनात महत्त्वाच्या आहेत की त्या केव्हाही स्मरणात ठेवू नयेत. एक केलेला उपकार व दुसरे कोणी आपल्यावर अपकार किंवा वाईट गोष्ट केली असेल तर. कारण या दोन्ही गोष्टी मनुष्याचा पिच्छा करीत असतात. हा फलत्याग सोपा वाटतो खरा पण सर्व योगांमध्ये हा योग श्रेष्ठ आहे. जसे वेळूचे झाड एक वेळ व्याले म्हणजे पुन्हा वीत नाही त्याप्रमाणे या फलत्यागाने जे जे कर्म टाकले जाते, त्या त्या कर्मास अंकुर फुटत नाही. ते कर्म सुखदुःखाचा भोग देण्याकरिता पुढे जन्माला कारणीभूत होत नाही. एखादी धर्मशाळा सोडून जाताना जसे काही सुख वा दुःख, काही होत नाही तसे आशारहित चित्ताने कर्म करायचे. अशी आशारहित चित्तवृत्ती देहभावाचे समूळ उच्चाटन करते. असे शुद्ध झालेले चित्त हळूहळू आत्मस्वरूपाशी एकरूप व्हायला लागते. कर्मफलत्यागी पुरुष आशारहित चित्ताचा झाल्यामुळे भोक्ता व कर्ता असा अहंकाराचा भाव घेत नाही. जीवनात सतत असक्त, उदासीन, स्वान्त व सुखी असतो. त्यामुळे देहभावरहित चित्त स्वाभाविकच आपल्या मूळ स्वरूपात म्हणजे ब्रह्मभावात हळूहळू स्थिर होते. जन्ममरणाचे चक्र त्याला फिरवू शकत नाही. म्हणून या योगाने अखंड सेवा व अखंड ब्रह्मसुख या दोहोंचा लाभ भक्ताला होतो. भक्तीच्या पोटी नांदणारे कर्मफलत्याग नावाचे हे स्वतंत्र साधन आहे. भगवंतांनी शेवटचा चौथा मार्ग म्हणून हा कथन केला.

या चारही वाटा सिद्धी प्राप्त करून देणाऱ्या आहेत. ज्याने त्याने आपल्या आंतरप्रवृत्ती-प्रकृतीनुसार मार्ग ठरवावा. स्वभावधर्मानुसार अनुसरलेल्या मार्गाने भक्तिमार्गात प्रगती लवकर होते. भारतीय अध्यात्मशास्त्रात ही व्यापकता असल्याने इथे अनेक संप्रदाय-पंथ निर्माण



झाले व होत आहेत. भगवान म्हणतात की, वारंवार केलेल्या प्रयत्नांपेक्षा म्हणजेच 'अभ्यासा'पेक्षा ज्ञान अधिक श्रेष्ठ होय. अभ्यास-योग म्हणजे ईश्वराशी जोडले जाण्याचा प्रयत्न आणि ज्ञान म्हणजे प्रयत्नामुळे ईश्वराला बुद्धीने जाणून घेणे होय. ध्यान ज्ञानाहून श्रेष्ठ आहे. ज्ञान म्हणजे केवळ बुद्धीच्या आधारे ईश्वराला जाणून घेणे होय आणि ध्यान म्हणजे ईश्वररूपात एकाग्र होऊन ईश्वराची साक्षात् अनुभूती घेणे. कर्मफलाचा त्याग ध्यानाहूनही श्रेष्ठ आहे. कारण कर्मफलत्याग केल्याने लगेच शांती लाभते आणि शांती हेच सर्व साधनांचे अंतिम लक्ष्य आहे. कर्मफलत्याग म्हणजे ज्ञान, भक्ती आणि कर्म या तिन्ही गोष्टींचा समन्वय आहे. या साध्या-सोप्या मार्गानेही आपल्याला ईश्वरप्राप्ती होऊ शकते.

मिळालेले कर्मफल ईश्वरचरणी अर्पण करणे, त्यावर आपला अधिकार न बजावणे, हा मन शुद्ध ठेवण्याचा आणि ईश्वराशी जोडले जाण्याचा अगदी सरळ आणि वेगवान मार्ग आहे. कर्मफलावर आपण जी अधिकारभावना दाखवतो, जी आसक्ती बाळगून जगतो, तीच आपल्या आयुष्यातील अशांतीचे एक फार मोठे कारण आहे. मनःशांतीत जगण्याचा आणि आत्मोद्धाराचा सोपा मार्ग आपल्या ऋषिमुनींनी, संतांनी 'त्येन त्यक्तेन भुञ्जीथाः' (ईशा. उप. १) (त्यागपूर्वक भोगा) आणि 'सबै भूमि गोपालकी' (सर्व काही ईश्वराचेच) या शब्दांत सांगितला आहे. थोडा बारकाईने विचार करून पाहा. आपल्या कर्म करण्याच्या ज्या शक्ती आहेत आणि त्यांच्यापासून आपल्याला कर्मफल मिळते, त्या शक्ती आपल्याला कुणी दिल्या आहेत? ईश्वरानेच ना! म्हणून खरे पाहता, कर्मफलावर अधिकार ईश्वराचाच असतो. आपला अधिकार, एखाद्या विश्वस्ताप्रमाणे, त्याचा सदुपयोग करण्यापुरता मर्यादित आहे. आपण मनात अशी भावना ठेवून ईश्वराने आपल्याला दिलेल्या शक्तींचा आणि त्यातून प्राप्त होणाऱ्या कर्मफलाचा सदुपयोग करून, सदैव ईश्वरस्मरणपूर्वक, जगण्याचा जर प्रयत्न केला तर, आपले जीवन सदैव ईश्वराशी जोडलेले राहील आणि जीवनात अपार समाधान आणि अपार शांती भरून राहील. या सर्वांत सोप्या मार्गाने आपल्या निश्चितपणे जन्म-मृत्यू चक्रातून मुक्ती म्हणजे ईश्वरप्राप्तीही होईल.

**अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ।**
**निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ।।१३।।**

"कोणाचा द्वेष न करणारा, सर्व भूतांशी मित्रभावाने वागणारा, तसाच कृपाळू, ज्याची ममत्वबुद्धी व अहंकार सुटला, ज्याला सुख व दुःख सम झाली, व जो क्षमावान." ।।१३।।

या आठ श्लोकांत भगवंतांनी ३६ गुण सांगून भक्त व भगवंताची कुंडली मांडली आहे. हे आध्यात्मिक लग्न आहे. भगवंताशी लग्न होण्यासाठी भक्ताला ह्या गुणांची आवश्यकता आहे. मधुराभक्तीत भगवंताला पती (स्वामी) मानले जाते. नवव्या अध्यायात भगवंताची जी विविध रूपे सांगितली आहेत त्यांत 'भर्ता' हे एक रूप आहे. गतिर्भर्ता प्रभुः साक्षी...' अशा विविध भूमिकांमध्ये भगवंत विलसत असतो. ११व्या अध्यायातसुद्धा या वेगवेगळ्या संबंधांचा निर्देश झाला आहे. 'पितेव पुत्रस्य सखेव सख्युः प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम् ।' पुत्र, सखा व शेवटी प्रियतमा इथपर्यंत भक्ताने जायचे आहे. भक्ती म्हणजे संबंध! हा संबंध प्रस्थापित व्हायचा असेल तर भक्ताच्या ठायी तसे गुण आले पाहिजेत.

गीतेत भगवंतांनी अशा दैवी गुणांचे वर्णन वेगवेगळ्या वेळी केले आहे. भगवंताला सर्वांत आवडणाऱ्या भक्ताची ही लक्षणे आहेत. दुसऱ्या अध्यायात स्थितप्रज्ञाची लक्षणे सांगितली, १३व्या अध्यायात ज्ञानाची २० लक्षणे विशद केली, १४व्यात गुणातीताचे वर्णन केले, १६व्या अध्यायात २६ दैवी गुण सांगितले व या १२व्या अध्यायात ३६ गुण सांगितले. यांतील एक गुण जरी एका जन्मात सर्वार्थाने आला तरी जीवन कृतार्थ होईल, एवढे हे गुण प्रत्यक्षात आचरणात आणावयास कठीण आहेत. तत्त्वज्ञान हे जगायचे असते. गीता केवळ तत्त्वज्ञान सांगत नाही, तर तो एक जीवनग्रंथ आहे. जीवनात कोणते गुण आले तर जीवनाला सुगंध येईल, ते दैवी जीवन बनेल, याचा वस्तुपाठ इथे मांडला आहे. भक्ती म्हणजे वृत्ती. हे गुण अंगी आणून तसा व्यवहार करणे हे भक्तीत अभिप्रेत आहे. खरा पंडित तोच की, ज्याने मणभर ज्ञानापेक्षा कणभर ज्ञान आचरणात आणले. चित्तात अहंता, विकार ठेवून जिभेवर सर्व शास्त्रे जरी नाचत असली तरी असा भक्त भगवंताला प्रिय होणार नाही. चित्ताची शुद्धता झाल्याशिवाय ज्ञान प्रतिष्ठित होत नाही. हे गुण इतके महत्त्वाचे आहेत. म्हणूनच भगवंतांनी ते वेगवेगळ्या स्वरूपात पुनःपुन्हा मांडले आहेत. हा पुनरुक्तीचा दोष नाही. या गुणांचे माहात्म्य मनावर बिंबवण्यासाठी यांचा पुनःपुन्हा उच्चार झाला आहे.

'अद्वेष्टा सर्वभूतानां'पासून सुरुवात करून 'संतुष्टो येन केनचित्' पर्यंत जीवन विकास होणाऱ्या लाडक्या भक्तांच्या जीवनाचे हे तत्त्वज्ञान या श्लोकांत मांडले आहे. हे वैश्विक गुण आहेत. जगाच्या पाठीवर, कोठेही असणाऱ्या मानवी जीवनात हे गुण महत्त्वाचे आहेत. गीता ही अखिल मानवजातीसाठी लिहिलेली संहिता आहे.



'अद्वेष्टा' हा पहिला गुण! सर्व प्राणिमात्रांच्या बाबतीत, ज्याच्या मनात वैर नाही, द्वेष, ईर्ष्या, मत्सर नाही, जो कोणाचाही शत्रुत्वाने विरोध करीत नाही, पण सर्वांवर निःस्वार्थ भावाने प्रेम करतो, तो भगवंताला आवडतो. ईश्वर जसा भेदभाव न करता संपूर्ण जगावर निःस्वार्थ प्रेम करतो तसे हे प्रेम असले पाहिजे. भगवंताला न मानणाऱ्या नास्तिकांनाही तो तेवढेच देतो, जेवढे त्याच्यावर श्रद्धा ठेवून भक्ती करणाऱ्यांना! 'अद्वेष्टा' ही भक्ताची पहिली ओळख आहे. संत ज्ञानेश्वर व त्यांच्या भावंडांना समाजाने संन्याशाची पोरे म्हणून बहिष्कृत केले, अनन्वित छळ केला; पण अशा समाजावर त्या सर्वांनी अतोनात प्रेम केले. संत तुकारामांना अशाच मानहानीला सामोरे जावे लागले. गाढवावरून धिंड काढली, पण त्यांनी कोठेही, कसलाही वैरभाव ठेवला नाही. जगातील अनेक संत-महात्म्यांना त्या त्या वेळच्या समाजाने कठोर वागून छळले. पण अशा दिव्यगुणांनी मंडित झालेल्या पुरुषोत्तमांनी उलट निःस्वार्थ प्रेम करून त्याची परतफेड केली आहे. ईर्ष्या माणसाला जाळत असते. वैरभाव ठेवणाऱ्या माणसाच्या मनात सतत अशांती भडकत असते. मनातील प्रसन्नता या द्वेषभावनेने संपून जाते, असे असूनही जगात द्वेषाचे थैमान आहे. दुसऱ्याच्या सुखाने, माणसे द्वेषाने पेटून उठलेली असतात. त्यामुळे स्वतःजवळ असणाऱ्या सुखालाही ती वंचित होतात. संत रामदासांनी हे ओळखूनच सुखाचा मूलमंत्र दिला. ते म्हणतात,

**''दुसऱ्याचे दुःखे दुखावे ।**
**दुसऱ्याच्या सुखे सुखावे ।**
**सर्वहि सुखी असावे ।**
**ऐसी वासना ।।''** (दासबोध)

पण हा सोपा मंत्र आचरणात आणावयास तेवढाच कठीण आहे. माणूस ज्याचा द्वेष करतो, त्याचेच सतत चिंतन होते. स्वप्न, जागृती, सुषुप्तीमध्ये त्याचीच प्रतिमा डोळ्यांसमोर येते. चिंतन त्याचेच होते. अशा वेळी भक्ती कशी साधणार?

महात्मा बुद्धांनी एकदा एका शिष्याला असा आदेश दिला की, ज्याच्याबद्दल त्या शिष्याच्या मनात वैरभाव आहे, त्याच्याकडे जाऊन भिक्षा मागून ये. अशी भिक्षा घेऊन आल्यानंतरच मी तुला दीक्षा देईन असे बुद्धांनी सांगितले. सर्वप्रथम वैर, विरोध मिटविला तरच साधना शक्य असते. भगवान श्रीकृष्णांनी संपूर्ण गीतेत वैर, द्वेष या शब्दांचे अनेक वेळा उच्चारण करून त्याचे उच्चाटन करा, असा उपदेश केला आहे. पाच हजार वर्षांपूर्वीचे महाभारत घडले ते याच एका भावनेतून! दुर्योधनाच्या मनातील वैरभाव,

द्वेष, ईर्ष्या हेच या संघर्षाचे मूळ. कर्णाच्या मनात द्रौपदीबद्दल हाच भाव होता. शकुनी याच ईर्ष्येने ग्रस्त होता. १९४७ साली देशाचे विघटन झाले आणि या द्वेष, ईर्ष्या याच्या वणव्यात ३० लाख लोकांची आहुती पडली. सर्व धर्मांची शिकवण हीच आहे. 'मजहब नहीं सिखाता आपसमें बैर रखना' या ओळी उच्चस्वरात गायिल्या जातात, पण प्रत्यक्ष व्यवहारात मात्र उलटे चित्र दिसते. म्हणून भगवंत म्हणतात की, ज्याच्या मनात वैरभाव आहे तो माझ्याकडे येऊ शकत नाही.

नंतर भगवंत म्हणतात की, 'मैत्रः' होऊन जगाशी व्यवहार कर. कोणाचाही द्वेष करत नाही ही पहिली पायरी. पण दुसऱ्या पायरीत सर्वांचा मित्र, सुहृद, हितचिंतक, सहाध्यायी, समरस होणे हे त्यात अंगभूत आहे. लहान मूल किती सरळ, निष्पाप निरागस असते! तसे अंतःकरणात कपट, वैरभाव न ठेवता निरागसपणे वागणे म्हणजे 'मैत्रः'. मनुष्याचे सर्वांत सुंदर रूप तेव्हाच असते जेव्हा तो प्रेममय अंतःकरणाने जगाशी व्यवहार करतो. मनात क्रोधविकार असताना चेहरा प्रसन्न राहत नाही, पण निरलस मैत्रिभाव ज्याच्या हृदयात असतो तेथे आनंदाचा झरा पाझरतो. तो दुसऱ्यांनाही आनंदित करतो.

भगवंत तिसरा गुण 'करुण एव च' असा सांगतात. ज्याच्या हृदयात दया, करुणा आहे तो मला प्रिय आहे, असे ते म्हणतात. भगवान बुद्ध 'करुणा' हाच धर्म आहे, असे म्हणतात. त्यांच्या दृष्टीतून धार्मिक व्यक्ती तीच की जी करुणामय अंतःकरणाने जगात वावरते. श्री ज्ञानेश्वरांनी गीतेच्या शेवटच्या श्लोकावर निरूपण करताना हाच विचार मांडला आहे. ते म्हणतात -

**दया तेथे धर्मु । धर्मु तेथे सुखागमु ।**
**सुखी पुरुषोत्तमु । असे जैसा ।।**१६३४।।अ.१८

"दया तेथे धर्म, धर्म तेथे सुखप्राप्ती आणि सुखाच्या ठिकाणी पुरुषोत्तम असतो."

दया-करुणा म्हणजेच धर्म असा सर्व धर्मांतील संतांनी उपदेश केला आहे. तुलसीदासांनीसुद्धा हाच विचार मांडला.

**दया धर्म का मूल है, पाप मूल अभिमान ।**
**तुलसी दया न छोडिए, जब तक घट में प्राण ।।**

"धर्माचे मूळ दया आहे व अहंकार, अभिमान, गर्व हे पाप आहे. या घटात जोपर्यंत प्राण आहे, तोपर्यंत दयेचा त्याग कधीही करू नये," असे तुलसीदास म्हणतात.



रामकृष्ण परमहंस एवढे करुणामय, दयाळू होते की, एकदा दूरवर एक शेतकरी आपल्या बैलाला चाबकाने मारत होता. पण त्याचे वळ रामकृष्णांच्या पाठीवर उमटत होते. शिष्यांनी त्यांना विचारले, तेव्हा ते उत्तरले - "कोणीतरी एका जनावराला मरतो आहे. पण मला अशी अनुभूती होते आहे की, माझाच आत्मा त्याच्या शरीरात आहे." 'सर्वभूतस्थं आत्मानं' अशी ही अवस्था आहे. दुसऱ्याच्या दुःखाने अंतःकरण हेलावले पाहिजे. दुसऱ्याच्या वेदना पाहून हृदयात कालवाकालव झाली पाहिजे. भगवंतांनी जे जे सामर्थ्य आपल्याला दिले असेल त्या शक्तीनिशी दुसऱ्याचे दुःख कमी करण्याचा जो प्रयत्न करतो, असा भक्त भगवंताला आवडतो. दया जेव्हा माणसाच्या मनात निर्माण होते व त्यानुसार जेव्हा तो कृती करतो त्या वेळी ती करुणा बनते. दया ज्या वेळी कृतिशील होते, चालू लागते, त्या वेळी तिला करुणा म्हणतात.

चौथी कसोटी भगवंतांनी सांगितली 'निर्मम' व नंतर 'निहंकार'. 'मी', 'माझे' हे विसरून, जो अनासक्त बुद्धीने व समर्पणाच्या भावनेने सर्व व्यवहार करतो, तो भक्त भगवंताला आवडतो. 'त्वदीयं वस्तु गोविंद तुभ्यमेव समर्पये ।' म्हणजे 'भगवंतांनी दिलेली वस्तू त्यालाच अर्पण करणे.' जे शरीर मी वापरतो तेही वस्तुतः माझे नाही. पंचमहाभूतांनी बनलेले हे शरीर ज्याचे त्याला द्यावे लागते. पण अशा शरीरावरही आपण किती प्रेम करतो! ही देहासक्तता भगवंतापासून दूर नेते. लहान मुलांच्या बालकथेत एका राक्षसाची कथा खूप बोलकी आहे. त्या राक्षसाचा प्राण एका पोपटामध्ये होता. पोपट जोपर्यंत जिवंत आहे, तोपर्यंत राक्षस जिवंत. पण पोपटाला मारले की राक्षस मेला. आपलेही थोडेबहुत असेच आहे. आपली प्राणशक्तीसुद्धा 'प्रपंचातल्या अनेक वस्तूंत गुंतली आहे. त्या त्या वस्तूचा नाश होण्याने आपला प्राणही कासावीस होतो. घर, बंगला, कार, दागिने, दुकान, धन... अशा वस्तूंवर त्याचे सुख-सर्वस्व अवलंबून असते. वस्तूत ठेवलेली आसक्ती हीच दुःखाला कारणीभूत असते. ह्याचा अर्थ असा नव्हे की, माझे नाही, म्हणून त्याबद्दल ममता नसावी. अशा वेळी जी रुक्षता निर्माण होते, त्यासाठी भगवंतांनी उपाय सांगितला आहे - 'ईशावास्यमिदं सर्वं यत्किञ्च जगत्यां जगत्' - 'या जगात जे जे काही आहे ते ते सर्व भगवंताचे आहे', ही भावना येणे म्हणजे निर्मम! ही दृष्टी जेव्हा येते, त्या वेळी 'मी' व 'माझे' राहत नाही. भगवंत पुढे म्हणतात की, अहंकार हा भक्तीला मारक, बाधक आहे. कर्तृत्वाचा अहंकार व 'मी'पणाची भावना मनुष्याची आतील ऊर्जा नष्ट करते. सागराची लाट, सागरापासून वेगळी असते तोपर्यंत तिचे अस्तित्व,

पण सागरात मिळाली की ती सागर बनते. जशी नदी सागरात पोहोचली नाही तोपर्यंत ती नदी असते. पण नंतर ती सागरच होते. तसे 'अहंकार' सोडून तो 'मी' जर परमात्म्याशी जोडला तर तो परमात्मरूप होतो. 'सोऽहं' बोधाने त्याच्या ठिकाणी समर्पित होणे ही खरी शरणागती!

भक्त 'समदुःखसुखः क्षमी' असला पाहिजे असे भगवंत सांगतात. 'समत्व' हेच योगाचे सार आहे. स्थिर बुद्धी ही भक्तीला प्रेरक आहे. सुखाने हुरळून जाऊ नये व दुःखाने होरपळून जाऊ नये. लाभ-हानी, सुख-दुःख या सर्वांत मनाचे संतुलन राखले पाहिजे. सुख जसे भगवंतांनी दिले आहे तसेच दुःखही त्यानेच दिले आहे. या भावनेने दोन्हीही प्रसादरूपाने स्वीकारली पाहिजेत. सुख व दुःख ही दोन्हीही प्रारब्धवशात् प्राप्त होत असल्यामुळे दोन्हीही अवस्थेत समत्व साधता आले पाहिजे. शुकमुनींची निवृत्तिपर अवस्था व जनकराजांची प्रवृत्तिपर अवस्था. यांत पहिली अवस्था म्हणजे संसार-जग यांपासून पूर्णपणे अलिप्त राहून भगवत्चिंतन करणे व दुसरी अवस्था म्हणजे प्रपंचात राहून प्रपंचाचा परमार्थ करणे. शुकमुनींचा निवृत्तिमार्ग जसा कठीण तसाच जनकराजांचा प्रवृत्तिमार्ग. पण संसारी-प्रापंचिक लोकांना जनक हाच आदर्श आहे. वैभवाच्या सुखसागरात राहूनसुद्धा अविचल बुद्धीने भगवंताची भक्ती करता येते, हे जनकराजांनी दाखवून दिले आहे. स्वामित्वाची भावना न ठेवता व वस्तुमात्रात मोह, ममता, अभिमान न ठेवता, सुखदुःखात मनाचा समतोल राखणारा भक्त भगवंताला प्रिय आहे. भक्त क्षमाशीलही असला पाहिजे. 'दया, क्षमा, शांती । तेथे देवाची वस्ती ।' असे म्हटले जाते. हे तिन्ही दैवी गुण आहेत. खरा वीर तोच की जो क्षमावान आहे. चाणक्याने आपल्या नीतिशास्त्रात 'क्षमा' या गुणाचा मोठा गौरव केला आहे. चाणक्याने म्हटले आहे की, सर्वांत मोठे तप म्हणजे क्षमा. सर्व गुण एका ताजव्यात व क्षमा हा एकच गुण दुसऱ्या ताजव्यात. तरीही याची बरोबरी होणार नाही. जो सामर्थ्यसंपन्न आहे, त्याने केलेली क्षमा अधिक शोभून दिसते.

भगवान श्रीकृष्ण १४व्या श्लोकात यापुढील गुण सांगत आहेत.

**संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्तः स मे प्रियः ।।१४।।**

"सदा संतुष्ट, संयमी, दृढनिश्चयी, ज्याने आपले मन व बुद्धी मला वाहिली, असा जो माझा भक्त तो मला प्रिय होय." ।।१४।।

प्रपंचातल्या वस्तूंनी जरूर सुख मिळते. श्रीखंड खाल्ले की, निश्चित आनंद होतो. सत्ता, संपत्ती, पद, प्रतिष्ठा, कीर्ती मिळाल्यानंतर मनुष्य



हर्षभरित होतो. ज्या ज्या वस्तूसाठी आपण अहोरात्र झगडतो, त्या त्या वस्तूंची प्राप्ती झाल्यानंतर मनात सुखाची लाट येतेच. पण प्रपंचातील हे वस्तुनिष्ठ सुख अल्पकाळ राहणारे व टिकणारे असते, हा सिद्धान्त आहे. वस्तूपासून अखंड, अक्षय सुखाचा लाभ होत नाही. भोगानंद, भावानंद व आत्मानंद ही उत्तरोत्तर वाढणारी उन्नत श्रेणी आहे. भोग माणसाला क्षणभर सुख देतात. पण आत्मानंदात माणूस सतत प्रसन्न असतो. भगवद्भक्त अत्यंत संतुष्ट असतो. भगवंतावर अनन्यभक्ती ठेवून तोच माझा रक्षणकर्ता, भर्ता असल्यामुळे माझा सर्वतोपरी योगक्षेम चालवील असा त्याला दृढ विश्वास असतो. त्यामुळे मनातून तो निश्चिंत राहतो. असा भक्त सतत संतुष्ट असतो.

भक्ताने 'योगी' असले पाहिजे. प्रपंचातील कोणतेही काम करीत असताना सतत भगवंताचे अनुसंधान राखणे म्हणजे त्याच्याशी युक्त असणे होय.

'यद् यत् कर्म करोमि तत्तदखिलं शम्भो तवाराधनम्' अशी भगवान शंकराचार्यांची धारणा होती. कोणतेही कर्म असो, भोजन असो की नित्य कर्म! तिन्ही काळी व अष्टौप्रहर भगवंताचे अनुसंधान ठेवणे म्हणजे योगी होणे. मग त्याचे भोजनही यज्ञकर्म बनते व निद्रासुद्धा योगनिद्रा बनते. त्याचे प्रत्येक कर्म भक्तीने सुगंधित होते. 'यतात्मा दृढनिश्चयः' हा आणखी एक गुण! ज्यांचे निश्चय पक्के असतात, त्यांना कोणतीही प्रलोभने, मोह, त्यांच्या ध्येयापासून विचलित करू शकत नाहीत. आशा-निराशा, सुख-दुःख, यश-अपयश काहीही येवो, पण ही दृढनिश्चयी माणसे बदलत नाहीत. संसार-सागरात वादळ जरी निर्माण झाले, तरी ते आपल्या ध्येयापासून च्युत होत नाहीत. भगवंताच्या भक्तीची साधना करीत असताना अनेक वेळा शंका-कुशंकांनी धीर सुटत असतो. साफल्य जर आले नाही व मध्येच मृत्यू आला तर साधनेचे काय होते असाही प्रश्न, जसा अर्जुनाला पडला तसा साधकाला पडतो. आपण स्वीकारलेला मार्गच श्रेयस्कर आहे की नाही अशी द्विधा अवस्थासुद्धा कधी कधी होते. पण दृढनिश्चय, अविचल श्रद्धा असेल तर यातूनही तो तरून जातो. जगातील मानवाच्या इतिहासात जे जे महान पुरुष होऊन गेले, त्यांचे जीवनचरित्र हेच दर्शविते की, त्यांचे निश्चय दृढ होते. म्हणून भगवंत म्हणतात की, ज्यांचे संकल्प दृढ असतात असे दृढनिश्चयी मला अधिक आवडतात.

'मय्यर्पितमनोबुद्धिः' हा या श्लोकातील अखेरचा गुण! ज्याने आपले मन व बुद्धी भगवंताला अर्पण केली, तो भगवंताचा लाडका बनतो. 'मय्यावेश्य...' हे दुसऱ्या श्लोकातील सांगणेच भगवंतांनी पुढे चालू ठेवले आहे. संकल्प-विकल्प करणारे मन व निश्चय करणारी बुद्धी भगवंताला

अर्पण केली पाहिजे. 'मन्मना भव' हा गीतेचा आग्रह आहे. संकल्प भगवंताचे झाले की, मग कर्मेही त्याला अर्पण करायची. बुद्धीत भगवंताविषयीच्या कामना असतील तर अशा विशुद्ध बुद्धीत भगवंत राहतो. असा भक्त भगवंताला आवडतो...

भगवंताच्या श्रेष्ठ भक्तांनी हे सर्व गुण जीवनात आणून आपल्यासमोर आदर्श भक्ताचा जीवन-व्यवहार कसा असावा, याचा वस्तुपाठ ठेवला आहे.

**'प्रह्लादनारदपराशरपुण्डरीक -**
**व्यासाम्बरीषशुकशौनकभीष्मदाल्भ्यान् ।**
**रुक्माङ्गदार्जुनवसिष्ठबिभीषणादीन्**
**पुण्यानिमान्' परमभागवतान् स्मरामि ।।'**

हे तर श्रेष्ठ, महान भागवत होतेच, पण ज्ञानेश्वर, तुकाराम, नामदेव, एकनाथ, रामदास या पंचरत्नांनी, तीच परंपरा पुढे चालवून श्रेष्ठ महानुभावांचे जीवन प्रत्यक्ष जगून दाखविले आहे. आधुनिक काळात श्री रामकृष्ण परमहंस, स्वामी विवेकानंद, रमण महर्षी, स्वामी स्वरूपानंद, पांडुरंगशास्त्री आठवले... अशा कितीतरी महान भक्तांचे जीवन या दैवी गुणांनी मंडित झाले आहे. भगवान श्रीकृष्ण स्वतः, सगुण अवतारात हे भक्ताचे गुण अंगी घेऊन, प्रत्यक्ष जीवनात कसे जगावे हे दाखवून देतात. ह्या दैवी गुणांचे वर्णन गीतेने पुनःपुन्हा केले आहे. त्याचे कारण हेच की, हे गुण आत्मसात केल्याशिवाय भक्ती फलद्रूप होत नाही. भक्ती हे केवळ कर्मकांड नाही तर ती वृत्तीही आहे. भक्तीने साधकाचा संपूर्ण जीवन-व्यवहार बदलला पाहिजे, मन-बुद्धी प्रकाशमय, दैवी बनली पाहिजे. गुण अंगी आणणे याचा अर्थ जीवनाकडे, विश्वाकडे पाहण्याची दृष्टी बदलणे. जीवात्म्याचे भगवंताशी लग्न लागायचे असेल तर हे ३६ गुण भक्ताच्या जीवनात आले पाहिजेत, हा गीतेचा आग्रह आहे. ही ३६ गुणांची पत्रिका भगवंताशी जुळली तरच हे आध्यात्मिक लग्न (Spiritual Marriage) शक्य आहे. जीवाला शिव व्हायचे आहे. हेच भक्ताचे अंतिम ध्येय आहे. मन-बुद्धी प्रभूला अर्पण करणे हेच सगुणपूजेचे रहस्य आहे. हीच खरी शास्त्रीय भक्ती आहे. आता १५ व्या श्लोकात, १३ व्या गुणापासूनचे वर्णन आहे. श्री भगवान म्हणतात,

**यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ।**
**हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ।।१५।।**

"ज्याला लोक कंटाळत किंवा त्रासत नाहीत आणि लोकांनाही जो कंटाळत नाही, तसेच हर्ष, क्रोध, भय व विषाद यांपासून जो अलिप्त तोच मला प्रिय होय." ।।१५।।



भक्ताविषयीच्या काही रूढ कल्पना समाजमनात घर करून बसल्या आहेत. भक्त म्हणजे उदास, भकास, नीरस, गंभीर, रडवा, उदासीन, सौंदर्यदृष्टी हरवलेला व जगापासून अलिप्त राहिलेला, शून्यात पाहणारा, कंगाल... अशी एक प्रतिमा निर्माण झाली आहे. या सर्व गोष्टींना छेद देणारा हा श्लोक आहे. गीता अर्जुनाला विषादापासून प्रसन्नतेकडे जाण्याचा मार्ग दाखविते. 'आनंद' हा आपला स्थायिभाव आहे. भगवंत रसमय आहे, सच्चिदानंद आहे. आपण जीव त्याच भगवंताचे अंश आहोत. म्हणून आपण स्वरूपतः आनंदमय आहोत. तो आनंदाचा झरा आपल्याच अंतःकरणात आहे. अखंडित प्रसन्नता ही भगवंताच्या लाडक्या भक्ताची वृत्ती असली पाहिजे. "अंतरीचे धावे स्वभावे बाहेरी" ह्या संत तुकारामांच्या उक्तीप्रमाणे अंतःकरणात जर ही वृत्ती असेल तर भक्ताच्या एकूण जीवन-व्यवहारावरही त्याचा प्रभाव दिसून येतो. सर्व संत-महात्म्यांचे, महानुभावांचे चेहरे कमळासारखे सदैव टवटवीत, प्रसन्न दिसतात. म्हणून त्यांचे वर्णन मुखकमल असे केले जाते. असा भक्त सर्वांना हवाहवासा वाटतो. त्याच्यापासून कुणालाही उद्विग्नता येत नाही व असा भक्तदेखील लोकव्यवहारापासून अलिप्त राहत नाही. उलट लोकसंग्रह करून 'आपणांसारिखे करिती तात्काळ' या उक्तीप्रमाणे आनंदाची पेरणी करीत असतात. खरा भक्त प्रशांत वृत्तीने लोकांना प्रकाश देण्याचे कार्य करीत असतो. वास्तविक वैचारिक दृष्टीने भक्त उत्तुंग शिखरावर असतात. सामान्य जनांचे लोकव्यवहार त्यांना क्षुद्र, थिटे वाटत असतात; पण ते तसे त्यांना न भासवू देता, तो भक्तही त्यांच्यासाठी ठेंगणा होतो, लघू होतो. जीवनाकडे क्रीडा म्हणूनच पाहतो व भगवंताच्या 'एकाकी न रमते' 'लोकवत् तु लीलाकैवल्यम्' या वृत्तीप्रमाणे बाहेरून प्रवृत्ती व आतून निवृत्ती असा लोकव्यवहार तो करतो. त्यामुळे लोक अशा भक्ताला कंटाळत नाहीत. असा सर्वसामान्यांवर जो प्रेम करतो, जो सर्वांना आवडतो, तो भगवंताचा प्रिय असतो हेच गीतेचे प्रतिपादन आहे. जीवन व तत्त्वज्ञान यांची फारकत झाली की, अध्यात्मशास्त्र कडू झालेच! गीता हा जीवनग्रंथ आहे. तो केवळ तत्त्वज्ञानाचा ग्रंथ नाही. व्यवहार व तत्त्वज्ञान हे सोबत चालले तर उद्विग्नता येणार नाही. वृत्ती व कृती यात ताळमेळ आला तर सौहार्दपूर्ण, निरामय, आनंदी जीवन जगणे शक्य होते. म्हणून महापुरुष आत्मिक आनंद जरी अनुभवीत असले तरी, सामान्यजनांसाठी उद्विग्न न होता त्यांना अंतिम कल्याणाचा मार्ग दाखवीत असतात.

'आत्मौपम्य' बुद्धीने जगाकडे पाहत असल्यामुळे अशा भक्ताच्या चित्तात सुख-दुःख, आसक्ती-क्रोध, भय-चित्तक्षोभ अशी द्वंद्वे राहत नाहीत.

आत्मानंदात सदैव राहत असल्यामुळे हर्ष, उद्वेग, क्रोध व भयही त्यांना स्पर्श करीत नाहीत. आत्मलाभ प्राप्त झाल्यामुळे भोगविषयांतील सुख त्यांना मोहित करीत नाही. भगवंतावर दृढ विश्वास व अनन्यभक्ती असल्यामुळे त्यांना खात्री असते की, आपले सर्वस्वी हित करणारा व योगक्षेम चालविणारा, रक्षण करणारा सदैव आपल्याबरोबर आहे. त्यामुळे हे भक्त निर्भय असतात. जीवनात हसणे, रडणे, क्रोध, भीती वगैरे गोष्टी विमनस्कता आणतात. जे भक्त सात्त्विक आनंदात असतात ते या सर्वांच्या पलीकडे गेलेले असतात. वस्तुनिष्ठ सुख बाहेरून मिळते पण अशी अखंड प्रसन्नता आत्मनिष्ठ असते. सामान्य माणसाच्या हर्षाला स्वार्थ, व्यवहार, आप-पर भाव याची झालर असते. पण अशा भक्तांचे हास्य सात्त्विक असते. 'प्रभूचा लाडका होणे', 'प्रभूचा बनणे'... या अवस्थेत सात्त्विक हर्ष असतो. जो निर्विषय, अनासक्त, स्थिरबुद्धीने युक्त व विशुद्ध अंतःकरणाचा असतो, तो क्रोधाच्या आहारी जात नाही. त्याच्या सर्व क्रिया भीतीतून न होता प्रेमातून निर्माण होतात. मत्सर, राग, द्वेष, असूया त्याला स्पर्श करीत नसल्यामुळे तो क्रोधवश कधी होत नाही. अशी त्याची वैचारिक भूमिका झाल्यामुळे तो सर्वांना हवाहवासा वाटतो. भगवंत म्हणतात की, हर्ष, क्रोध, भय व विषाद यांपासून अलिप्त असलेला असा भक्त मला प्रिय आहे.

पुढील श्लोकात, भक्ताचा जीवन-व्यवहार कोणत्या दैवी गुणांनी मंडित झालेला असतो, त्याचे वर्णन केले आहे -

अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः ।
सर्वारंभपरित्यागी यो मद्भक्तः सः मे प्रियः ।।१६।।

"निरपेक्ष, शुचिर्भूत, दक्ष म्हणजे कोणतेही काम आळस सोडून करणारा, (फलाबद्दल) उदासीन, ज्याला कोणताच विकार चाळवू शकत नाही, आणि ज्याने (काम्यफलाचे) सर्व आरंभ म्हणजे उद्योग सोडले, असा जो भक्त तो मला प्रिय होय." ।।१६।।

असा भक्त आत्मतृप्त असतो. त्याला कोणतीच अपेक्षा नसते. तो निःस्वार्थ भावनेने, सर्वभूतहितरत झालेला असतो. भगवंत जे जे देतील ते ते तो आनंदाने स्वीकारतो.

सुख मिळाले तरी हुरळून जात नाही व दुःख प्राप्त झाले तरी होरपळून जात नाही. मानापमान, निंदा-स्तुती, राग-लोभ, या द्वंद्वांच्या पलीकडे गेल्यामुळे त्याची मानसिक बैठक स्थिर झालेली असते. भगवंताला आवडणे व भगवंताचा होणे हीच तेवढी अपेक्षा असते. जीवन-संघर्षात तो भगवंताकडे एवढीच मागणी करतो की, 'यथा योग्यं तथा कुरु'. तो सर्व कर्मे भगवंताला अर्पण करून निरिच्छ जीवन जगतो. 'शुचि' म्हणजे शुद्ध, पवित्र! चित्त शुद्ध व्हावे,



बुद्धी निर्विषय व पवित्र व्हावी ही अपेक्षा अशा भक्ताची असते. सर्वसामान्य शुचित्व (पावित्र्य) अशा भक्ताजवळ असतेच पण अर्थशुची, अन्नशुची, आचारशुची, विचारशुची व अंतःकरणशुद्धी यांनी अशा भक्ताचा एकूण जीवन-व्यवहार परिपूर्ण असतो. गीतेच्या 'शुचि' भक्तात कर्म, भक्ती व ज्ञान यांचा त्रिवेणी संगम असतो. मन, बुद्धी व इंद्रिये पवित्र, शुद्ध असल्यामुळे संपूर्ण शरीरच भगवत्स्पर्शाने ब्रह्मीभूत झालेले असते. 'ब्रह्मीभूत काया होतसे कीर्तनी' असा पावन भक्त तो होतो.

भगवंताचा लाडका भक्त 'दक्ष' असतो. एकूण जीवनव्यवहारात, कर्तव्यपूर्तीत, भक्तीत तो सावध असतो. पांडवांनी जेव्हा 'दक्षता' विसरून द्यूतात सर्वस्व गमावले तेव्हा भगवान श्रीकृष्णांनी त्यांना दोष दिला. सामान्य गोष्टीतसुद्धा भगवंताला विचारल्याशिवाय जे पांडव पुढे पाऊल टाकत नव्हते त्या धर्मराजांनी, दक्षता घालवून, धृतराष्ट्राच्या कपट कारस्थानाला साथ दिली व सर्वस्व गमावले. भगवान श्रीकृष्ण प्रत्येक लहानसहान कार्यातसुद्धा दक्ष होते. जीवन-व्यवहारात जो सदैव दक्ष असतो, तो भगवंताला आवडतो. आध्यात्मिक, सांस्कृतिक दृष्टीने दक्ष राहण्यासाठी असा भक्त सदैव आत्मपरीक्षण करीत असतो.

भगवंतांनी अनपेक्ष, शुचि, दक्ष राहायला सांगितले. त्यानंतर ते सांगत आहेत, 'उदासीन' हो. सत्ता, संपत्ती, पद, प्रतिष्ठा, कीर्ती यांविषयी अशा भक्ताच्या मनात अभिलाषा नसते. फळाविषयी तो निरपेक्ष असतो. कारण 'नैष्कर्म्यसिद्धी'मुळे निःस्पृहवृत्तीने केवळ कर्तव्याचरण करणे हेच त्याला माहीत असते. भगवंतचरणी सर्वस्व अर्पण करून तो मोकळा होतो. मी अमुक प्राप्त करीन, मी अमका होईन या सर्व गोष्टींतून तो मुक्त झाल्यामुळे सक्रिय उदासीनता त्याला प्राप्त होते. उदासीन होऊनही तो कंटाळत नाही, थकत नाही, चिंताग्रस्त होत नाही. म्हणून असा भक्त 'गतव्यथः' असतो. ज्याची व्यथा संपली आहे तो गतव्यथः; चिंता आली की व्यथा येते. चित्तात समत्व आले की चिंता निघून जाते. असे व्यथारहित मन भक्तीला अनुकूल असते. चित्त स्वस्थ, शुद्ध, पवित्र, व्यथारहित करण्यासाठी भक्ती हे भगवंतांनी दिलेले उत्कृष्ट साधन आहे. कारण व्यथा, दुःख हा जीवनाचा अविभाज्य भाग आहे. कितीही झाले तरी व्यथा अटळ आहेत. प्रत्यक्ष रामकृष्ण यांनाही त्या सुटल्या नाहीत. महापुरुषांच्या, संतांच्या वाट्याला अखंड व्यथा आल्या. या जगात एकही व्यथा अशी नाही की, जी भगवंताला अवतारकार्यात झाली नसेल! पण अशा वेळीसुद्धा व्यथारहित कसे जगायचे हे त्यांनी जगून दाखविले. विश्वाकडे व विश्वनियंत्याकडे पाहावयाची जीवनदृष्टी

मिळाली की व्यथा राहत नाही. मग अशा 'गतव्यथः' भक्ताला कोण दुःखी करील?

असा भक्त 'सर्वारम्भपरित्यागी' असतो. म्हणजे तो काही करीत नाही असे नाही. अशा भक्ताचा कोणताही आरंभ नसतो. आरंभ संकल्पामुळे होतो. त्याने आपले सारे संकल्प भगवंताच्या हाती दिलेले असतात. त्याच्या प्रत्येक संकल्पाचा दाता भगवान आहे. कर्माचा आरंभ करण्याकरिता लागणारा अहंकार त्याच्या ठिकाणी नसतो. भक्त जेव्हा कामना-विवर्जित होतो तेव्हाच भगवंत त्याच्या जीवनात कार्याचा आरंभ करतो. अभिलाषा व कामना यांचा त्याग झाल्यानंतर उन्नत अवस्थेला पोचलेल्या भक्ताची ही स्थिती आहे. सर्वारम्भपरित्यागी होण्यासाठी तीन पायऱ्या आहेत. प्रथम कर्माचे फळ अर्पण करायचे, त्यानंतर कर्म व शेवटी संकल्प अर्पण करायचा म्हणजे संपूर्ण शरणागती! त्यानंतरच भगवंत अशा जीवात स्वतः संकल्प करतो. ही जीवाची उच्चतम स्थिती आहे.

इथपर्यंत २१ गुणांचे वर्णन झाले. पुढील तीन श्लोकांत भगवंताच्या लाडक्या भक्ताच्या १५ गुणांचे वर्णन आले आहे. भगवंत म्हणतात -

**यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न कांक्षति ।**
**शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ।।१७।।**
**समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः ।**
**शीतोष्णसुखदुःखेषु समः संगविवर्जितः ।।१८।।**
**तुल्यनिंदास्तुतिर्मौनी संतुष्टो येन केनचित् ।**
**अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः ।।१९।।**

"जो (कशाचाही) आनंद मानीत नाही, द्वेष करीत नाही, शोक करीत नाही व इच्छाही ठेवीत नाही, ज्याने (कर्माचे) शुभ व अशुभ (फल) सोडिले असा जो भक्तिमान पुरुष तो मला प्रिय होय." ।।१७।।

"शत्रू आणि मित्र तसेच मान आणि अपमान, शीत आणि उष्ण, सुख आणि दुःख ही ज्याला सारखीच व ज्याला आसक्ती नाही." ।।१८।।

"ज्याला निंदा व स्तुती दोन्ही समसमान, जो मितभाषी व जे काही मिळेल तेवढ्यानेच संतुष्ट, आणि ज्याचे चित्त स्थिर असून जो अनिकेत म्हणजे (ज्याचे कर्मफलाशारूप) बिन्हाड कोठेच राहिलेले नाही, असा भक्तिमान पुरुष मला प्रिय होतो." ।।१९।।

१७ व्या श्लोकातील सहा गुणांचे निरूपण श्री ज्ञानेश्वर माऊलींनी उत्कटतेने केले आहे. प्रत्येक गुणाचे यथार्थ वर्णन त्यात आले आहे. ते म्हणतात,



**जो आत्मलाभासारिखें । गोमटे कांहीचि न देखे ।**
**म्हणोनि भोगविशेखें । हरिखेजेना ।।१९०।।**
**आपणाचि विश्व जाहला । तरि भेदभावो सहजचि गेला ।**
**म्हणोनि द्वेषु ठेला । जया पुरुषा ।।१९१।।**
**पैं आपुलें जें साचें । तें कल्पांतींही न वचे ।**
**हे जाणोनि गताचे । न शोची जो ।।१९२।।**
**आणि जयापरौतें कांही नाही । तें आपणपेंचि आपुलां ठायीं ।**
**जाहला यालागीं जो कांहीं । आकांक्षी ना ।।१९३।।**
**वोखटें का गोमटें । हे कांहींचि तया नुमटे ।**
**रात्रीदिवस न घटे । सूर्यासी जेवीं ।।१९४।।**
**ऐसा बोधुचि केवळु । जो होऊनि निष्कळु ।**
**त्याहीवरी भजनशीळु । माझां ठायीं ।।१९५।।**
**तरि तया ऐसें दुसरें । आम्हां पढियंतें सोयरें ।**
**नाहीं गा साचोकारें । तुझी आण ।।१९६।।**

"जो आत्मलाभ-आत्मसुख याच्या तोडीचे दुसरे काहीच चांगले समजत नाही, म्हणून तो भोगविषयात आनंदी होत नाही." ।।१९०।

"आपणच विश्व आहोत, अशी जीवनदृष्टी आल्यामुळे त्याचा भेदभाव अनासायानेच नाहीसा झालेला असतो. म्हणून ज्या पुरुषाच्या ठिकाणी द्वेषबुद्धी राहिलेली नसते." ।।१९१।।

"आपले जे खरे (त्रिकालाबाधित आत्मस्वरूप) आहे, ते कल्पांताच्या वेळीदेखील (आपल्यापासून) जात नाही, हे जाणून जो गेल्याचा शोक करीत नाही." ।।१९२।।

"आणि ज्याच्या पलीकडे काही नाही, असे जे ब्रह्म ते तो पुरुष आपण आपल्या ठिकाणी झाल्यामुळे कशाचीच इच्छा करीत नाही." ।।१९३।।

"सूर्याच्या ठिकाणी रात्र किंवा दिवस, हे दोन्ही जसे घडत नाहीत, त्याप्रमाणे वाईट किंवा बरे हे त्याला काहीच वाटत नाही." ।।१९४।।

"असा जो केवळ अखंड बोधरूप असून त्याशिवाय आणखी, जो माझ्या ठिकाणी भजनशील असतो." ।।१९५।।

"तरी अरे अर्जुना, त्याच्यासारखे दुसरे आवडते नातलग मनुष्य आम्हांला खरोखर कोणी नाही, हे तुझी शपथ वाहून सांगतो." ।।१९६।।

भगवंताला अभिप्रेत असणारे हे नेमके भाष्य, श्री ज्ञानेश्वरांनी अर्थपूर्ण शब्दांतून व्यक्त केले आहे म्हणून त्या ओव्या सविस्तर येथे उद्धृत केल्या.

१७ व्या श्लोकावरील या मंगल ओव्यांतून भक्ताच्या गुणांचे समग्र चित्रण रेखाटले आहे. ३६ गुणांचे हे सार आहे. भगवंताच्या लाडक्या भक्ताचे हे परिपूर्ण दर्शन आहे. 'यो न हृष्यति' यावरील भाष्य पहिल्या ओवीत आहे. ज्याला आत्मसुखाची गोडी लागली त्या भक्ताला प्रपंचातल्या भोगवस्तूत, ऐश्वर्यात आनंद वाटत नाही अशा भक्तांना कोणतेच वैभव मोह पाडत नाही. संत तुकारामांना छत्रपती शिवाजी महाराजांनी भेट म्हणून तबकभर हिरे-मोती-रत्न व किमती वस्त्रांचा नजराणा पाठवला होता, पण संत तुकारामांनी ती भेट तशीच परत पाठविली. आत्मसुखात डुंबून गेलेल्या तुकारामांनी म्हटले आहे -

**आम्हां घरी धन शब्दांचीच रत्ने ।**
**शब्दांचीच शास्त्रे यत्न करू ।।१।।**
**शब्दचि आमुच्या जीवाचे जीवन ।**
**शब्दे वाटूं धन जनलोका ।।२।।**

''आमच्या घरी आमच्या अभंगातील शब्द हेच रत्नाच्या मोलाचे आहेत. हे शब्दच आमची शास्त्रे आहेत. हे शब्दच आमच्या जीवाचे जीवन आहे व या शब्दाने आम्ही जगातील लोकांना ज्ञान-भक्ती वगैरेचे धन वाटतो.''

म्हणूनच संत तुकारामांनी ४५०० अभंग लिहिले.

उत्तरेकडचे संत तुकाराम म्हणजे संत कबीर. त्यांच्याही जीवनात असाच प्रसंग आला. काशीचे राजे स्वतः हिरे-मोती घेऊन कबीरांकडे आले व त्यांनी भेट स्वीकारावयाचा आग्रह केला. कबीर म्हणाले,

**माया महाठगनी हम ज्ञानी ।**
**ठगनी क्या नैना झमकावे ।**
**तेरे हाथ कबीर न आवे...**

कुबेराचे धन जरी समोर ठेवले तरी कबीर मोहवश झाले नाहीत. धन ही माया आहे. ती फसवी आहे. भगवंतापासून परावृत्त करणारी आहे अशी त्यांची पक्की धारणा होती. कबीरांचे पुत्र कमाल तेथेच उभे होते. राजाला आशा वाटली की, निदान पुत्र तरी आपली भेट स्वीकारील. कमालने राजाला आपल्या झोपडीत बोलावले व राजाला तो म्हणाला, ''या झोपडीत खूप जागा रिकामी आहे. तुम्हांला जे काही द्यायचे असेल ते तुम्ही येथे ठेवू शकता.'' राजाने एक हिऱ्याची अंगठी तेथे ठेवली. निरोप घेताना कमाल म्हणाला, 'हे राजा, तुमची जेव्हा इच्छा होईल त्या वेळी तुम्ही येऊन तुमची वस्तू पाहू शकता.'' असे म्हणून कमाल आपली जपमाळ हातात घेऊन ध्यानस्थ बसला. राजाला हे सर्व चमत्कारिक वाटले. पुन्हा तीन दिवसांनी



राजा परत आला. त्याने झोपडीत पाहिले. अंगठी जशीच्या तशी होती व कमाल ध्यान करत तेथेच बसला होता. अंगठीचा वापर का केला नाही म्हणून राजाने विचारले व कमालने त्यावर उत्तर दिले, ''हे राजा, तुझे काम तू केलेस. मी माझे काम करतो आहे. मला अशा वस्तूंची गरज नाही. तुला द्यायचेच असेल तर ते गरिबांना देऊन टाक. परमात्म्याच्या कामासाठी जर दिलेस तर तो परमात्मा तुला धन्यवाद देईल. मी तुला धन्यवाद कसे देणार!'' राजाने ओळखले की, कमालसुद्धा पित्यासारखा भोगऐश्वर्यात रमणारा नाही. अशी ही भक्तांची मांदियाळी. त्यांना परमात्मसुखापुढे सारे काही तुच्छ!

असे भक्त जगाकडे आत्मौपम्य नजरेने पाहतात. ''जे जे भेटे भूत । ते ते मानिजे भगवंत ।'' अशी त्यांची दृष्टी असते म्हणून त्यांच्या मनात द्वेष, मत्सर अशा भावनांना थारा नसतो. 'विचरे विश्व होऊनी । विश्वामाजी' या भावाने तो जगात वावरतो. आत्मसुख हे अवीट व अक्षय असल्यामुळे त्याच्या शोकाला कारणच उरत नाही. भक्तिसुख अविनाशी आहे त्यामुळे असे भक्त सर्वत्र हरीचे दर्शन घेत असतात, त्यामुळे त्यांच्या सुखात कुठेही त्रुटी येत नाही. म्हणून ज्या सुखासारखे दुसरे सुख कोठेही नाही, ते आपल्याच अंतर्यामी वसत असल्यामुळे, पूर्णत्वाची अनुभूती त्यांना येत असते. अपूर्णत्व आहे तोपर्यंतच आकांक्षा असते पण असे भक्त तृप्त असल्यामुळे त्यांना काही आकांक्षा उरत नाही. सूर्याला जसा अंधार व उजेड माहीत नसतो. उलट त्याच्या ठायी अखंड प्रकाशच विलसत असतो त्याप्रमाणे या भक्ताला कल्याण व अकल्याणाचे काही उरत नाही. हा भक्त म्हणजे ज्ञानाचा उद्बोध व भक्तिप्रेमाचा कल्लोळच असतो. असे भक्त भगवंताला खूप आवडतात. शेवटच्या ओवीत भक्तावरील आपले प्रेम व्यक्त करताना भक्ताचीच आण भगवंत वाहतात. जेव्हा आपले म्हणणे निश्चयाने खरेच आहे असे सांगावयाचे असते तेव्हा आण वाहण्याचा प्रघात आहे. १७ व्या श्लोकात व त्यावरील ओव्यात, अशा लाडक्या भक्ताचे गुण सांगितले आहेत.

१८ व्या व १९ व्या श्लोकांत 'स्थिरमतिः' भक्ताच्या गुणांचे वर्णन आहे. जो द्वंद्वापासून मुक्त झाला त्याला कोणतेच कर्मबंधन राहत नाही. जो समत्वबुद्धीने विश्वाकडे पाहतो तो शत्रू व मित्र, मान व अपमान, शीत व उष्ण, सुख व दुःख, निंदा व स्तुती अशा द्वंद्वापलीकडे जाऊन अक्षय सुखाचा धनी होतो. भगवंताने जे दिले, त्याबद्दल त्याची काहीच तक्रार नसते. सतत संतुष्टी हे साधनेचे फल आहे. भक्त सदोदित प्रसन्न, संतुष्ट, आनंदी

असावा हा गीतेचा आग्रह आहे. अशी स्थिरबुद्धी ज्याची असते, तो आसक्तिविरहित राहून जगाचे व्यवहार करतो. तिन्ही ऋतूंमध्ये किंवा रात्री-दिवसा जसे आकाश सारखेच असते, तसे कोणत्याही अवस्थेत असा भक्त अचल, दृढनिश्चयी, स्थिर, शांत, समाधानी असतो. जसा समुद्र पावसावाचून सुकत नाही त्याप्रमाणे काही नाही मिळाले तरी तो खिन्न होत नाही. आकाशाच्या सर्व विस्तारात वायूची नित्य वस्ती आहे त्याप्रमाणे संपूर्ण जग हे त्याचे निवासस्थान असते. म्हणून तो 'अनिकेतः' असतो. श्री ज्ञानेश्वर यावर भाष्य करताना म्हणतात, ती प्रसिद्ध ओवी अशी -

**हे विश्वचि माझें घर । ऐसी मती जयाची स्थिर ।**
**किंबहुना चराचर । आपण जाहला ।।२१३।।**

"हे विश्वच माझे घर आहे, असा ज्याचा दृढनिश्चय झालेला असतो, फार काय सांगावे! सर्व स्थावर-जंगमात्मक जग जो (अनुभूतीने) आपणच बनला आहे." ।।२१३।।

आपल्या घराविषयी तो अनासक्त असतो; पण विश्वाचा प्रपंच करतो. असा वैश्विक प्रेम करणारा भक्त भगवंताला आवडतो.

कोणते भक्त मला अत्यंत प्रिय आहेत याविषयी शेवटच्या श्लोकात भगवंत म्हणतात -

**ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते ।**
**श्रद्दाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः ।।२०।।**

"वर सांगितलेला हा अमृततुल्य धर्म मत्परायण होत्साते श्रद्धेने जे आचरितात ते भक्त मला अत्यंत प्रिय आहेत." ।।२०।।

भगवंतांनी केलेले ३६ गुणांचे वर्णन म्हणजे ही अमृतधाराच आहे. इथे भक्ताचा जीवन-व्यवहार, त्याची वृत्ती, कृती, स्थिती, दृष्टी ह्या सर्व गोष्टी सांगितल्या आहेत. 'अद्वेष्टा'पासून सुरू झालेले गुणांचे वर्णन श्रेष्ठतम भक्ताच्या गुणांचेच वर्णन आहे. हे सर्व गुण जिथे प्रगट होतात, तेथे भगवंताचेच अस्तित्व असते. म्हणून आधी अशा भक्तांनाच नमस्कार करावा. भक्तीमध्ये तीन गोष्टी असल्या पाहिजेत. निरपेक्ष प्रेम, दुर्दम्य श्रद्धा, संपूर्ण शरणागती असेल तर ती भक्ती! ही भक्तितत्त्वे जे प्रत्यक्ष आचरणात आणतात व त्याप्रमाणे ज्यांची वृत्ती बनते, तेथे भक्ती फुलते. अशा भक्तांचे स्थान भगवंताच्या ह्रदयात असते.

श्री ज्ञानेश्वरांनी १२ व्या अध्यायाच्या शेवटच्या श्लोकावरील भाष्यात, याला 'अमृतधारा धर्म्य' असे सार्थ विधान केले आहे. हा अध्याय आकाराने छोटा पण अर्थाने महान आहे. भगवंतांनी भक्तीचे स्वरूप येथे समजावले



आहे. भक्ताची अलौकिकता यात वर्णन केली आहे. आपल्या लाडक्या भक्ताच्या गुणांचे वर्णन येथे आहे. ही भक्तिकथा आहे म्हणून त्याचे महत्त्व अपरंपार आहे. मनुष्य, जीवनात अक्षय सुख मिळविण्याचा सतत प्रयत्न करत असतो. पण त्याच्या वाट्याला अशांती, असंतुष्टता व दुःखच येते. पण जो भक्तिमार्गात येतो त्याचे मन संतोष पावून व शांत होऊन निर्मळ सुखालाच तो प्राप्त होतो. म्हणून भक्तीची कथा म्हणजे या भूलोकातील दिव्य अमृतधाराच होय. या कथेच्या अमृतलहरी जडजीवांना अमर करतात व अमृताचा दिव्यानुभव घेत याच धारामृत तीर्थावर जीव विसावतात. याच्यामुळे या विश्वात धर्म स्थिर होतो. हा एकच धर्म असा आहे की, जो हे सारे विश्व आपुलकीने जवळ घेऊन सर्व जीवांचे कल्याण करू शकतो. भक्ती हेच खरे पाहता शुद्ध धर्मस्वरूप आहे व त्याची कथा ऐकणे हेच धर्म्य होय. अमृतधारेप्रमाणे याचा प्रवाह साऱ्या विश्वाला अमृततत्त्वाचे दान करून परमसुखाला पोहोचवितो. भक्ती नसेल तर सारेच धर्मभाव निष्प्राण होत. अंतःकरणात श्रद्धायुक्त होऊन जे या भक्तिधर्माने, आपल्या जीवनाचा विचार करतात, जीवनाचे अंतिम ध्येय म्हणजे परिपूर्णता, सर्व सुखांची ऐक्यता, व अनन्यशरण होऊन सर्वेंद्रियांनी जे या भक्तीचा स्वीकार करतात ते निश्चितच या उच्चतम पदावर आरूढ होतात. ३६ गुणांपैकी एक जरी गुण खऱ्या अर्थाने आचरणात आला तरी आपले या जन्मीचे जीवन सार्थकी लागेल. भगवंतांनी हा भक्तियोग एवढ्याचसाठी उपदेशिला आहे की, ज्यामुळे या मार्गावरील भ्रांतीची किल्मिषे, संशयाचे वादळ, सगुण-निर्गुणासारखे वाद संपुष्टात येतील. म्हणून स्वतः भगवंत १२ व्या अध्यायाच्या शेवटच्या श्लोकात आपला अभिप्राय देतांना "ये तु धर्म्यामृतमिदं" म्हणजे "वर सांगितलेला हा अमृततुल्य धर्म' असा यथोचित शब्दप्रयोग करतात. संपूर्ण भगवद्गीतेत दैवी गुणांचा पुनःपुन्हा उल्लेख आला आहे. दुसऱ्या अध्यायात १८ श्लोकांत स्थितप्रज्ञाची लक्षणे सांगितली. १३व्या अध्यायात ज्ञानाची १८ लक्षणे सांगितली. १४व्या अध्यायात गुणातीताचे वर्णन आले व २६व्या अध्यायात दैवासुर संपत्ती विभाग सांगताना २६ दैवी गुणसंपत्तीचे वर्णन केले व या १२व्या अध्यायात शेवटच्या आठ श्लोकांत भगवंताला आवडणाऱ्या भक्ताचे ३६ गुण सांगितले. कधी 'अभय' या गुणाला पहिले स्थान दिले तर कधी 'अद्वेष्टा' या गुणाला प्रथम स्थान दिले; तर कधी 'निष्काम' भावाला. काम व क्रोध हेच माणसाला जाळणारे विकार आहेत असे तिसऱ्या अध्यायात स्पष्ट केले. 'काम, क्रोध, लोभ' ही नरकाची तीन दारे आहेत असे १६व्या अध्यायात स्पष्ट केले. भगवंतांनी या गुणांचा पुनःपुन्हा उच्चार

एवढ्यासाठीच केला आहे की, भक्तीचा कोणताही मार्ग स्वीकारला तरी हे गुण अंगी धारण केल्याशिवाय भगवंताजवळ जाणे दुरापास्त आहे. भक्ती म्हणजे वृत्ती! आंतरिक परिवर्तन!! भगवंताचे काम करण्यासाठी भगवंतासारखे व्हायला पाहिजे. भगवंतासारखे होणे म्हणजे भगवंताचे गुण स्वीकारणे व आचरणात आणणे. ''कृष्णो भूत्वा कृष्णं यजेत्'' कृष्णासारखे होऊनच कृष्णाची पूजा होऊ शकते. भक्ती म्हणजे भाव. जेवढा भाव संपन्न तेवढी मूर्ती महान! भाव छोटा असेल तरी कितीही मोठी मूर्ती असेल तरी मूर्ती लहान... सगुण पूजेचे मर्म यातच आहे. म्हणून आधी स्थूलपूजा, नंतर गुणपूजा व शेवटी तत्त्वपूजा असा हा भक्तीचा आलेख आहे. सगुण आणि निर्गुण दोन्हीही श्रेष्ठ. हा निर्वाळा भगवंताने या अध्यायात दिला आहे. सगुण ही आपली सोय आहे. व्यवस्था आहे. तिथेच अडकायचे नाही. सगुणांतून निर्गुणाकडे हा भक्तीचा प्रवास आहे. निर्गुण, निराकार भगवंताने भक्तासाठी सगुण रूप धारण केले. देहधारी मनुष्याला भक्ती सहजसाध्य व्हावी म्हणून, अवताररूपाने स्वतः आचरण करून आदर्श भक्तीचा वस्तुपाठ दाखविला. श्रीकृष्णाचे संपूर्ण जीवन, या सर्व दैवी गुणांनी भरलेले आहे. असे जीवन होणे ही काही कवी कल्पना नाही. आपल्या संतांनी व श्रेष्ठ पुरुषांनीसुद्धा हे गुण जीवनात आणून आदर्श घालून दिला आहे. हा अध्याय यथार्थपणे समजला तर आपल्या भक्तीला उजाळा मिळेल. भोळी-भाबडी, अज्ञानवश, कर्मकांडयुक्त, बाह्योपचाराने भरलेली व संशयाने ग्रासलेली, अज्ञानजन्य अशी भक्ती भगवंतालाही आवडत नाही. भक्ति समजून केली तरच त्याची फळे मिळतात. भक्तीचे समग्र स्वरूप समजण्यासाठी, हा १२ वा अध्याय अमृततुल्य आहे.

या अध्यायात सगुण-निर्गुण भक्ती, त्या भक्तीच्या चार वाटा,भगवंताची दिव्यता व श्रेष्ठ भक्ताच्या ठायी असलेल्या अलौकिक गुणांचे वर्णन आले आहे. म्हणून हा अध्याय आकाराने लहान पण अर्थाने महान असा आहे.

**।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**



# सर्वांसाठी गीता
## एक जीवनग्रंथ
भाग-३

## लेखक - परिचय

| | | |
|---|---|---|
| नाव | : | प्रा. दत्तात्रय नारायण दुभाषी |
| जन्म | : | १९ जानेवारी १९४१ बेळगांव |
| शिक्षण | : | १) एम. ए. (इंग्रजी - संस्कृत)<br>२) एम. ए. (मराठी) |
| व्यवसाय | : | पत्रकार व माध्यमिक शिक्षक म्हणून १० वर्षे व महाविद्यालयीन प्राध्यापक म्हणून ३० वर्षे अशी एकूण ४० वर्षे सेवा. गोपाळकृष्ण गोखले कॉलेज, कोल्हापूर येथून इंग्रजी विभागप्रमुख म्हणून निवृत्त. |

**छंद व आवड :**

- सतत भ्रमण - ५ वेळा अमेरिका-कॅनडा येथे प्रदीर्घ वास्तव्य. युरोप-मिडलईस्ट इ. ठिकाणचा प्रवास.
- वक्तृत्व - नाट्य - लेखन यांच्या विशेष आवडीमुळे वर्तमानपत्रे व मासिकांतून अनेक विषयांवर व्याख्याने व लेखन.
- निसर्गात पदभ्रमणाची विशेष आवड.
- योग-प्राणायाम यावर प्रबोधन - व्याख्याने व प्रात्यक्षिके.

**सामाजिक कार्य :**

- श्री ज्ञानेश्वरी, तुकाराम गाथा अशा संतसाहित्यावर व भगवद्गीतेवर गेली १५ वर्षे सतत प्रवचने व व्याख्याने यातून समाजप्रबोधन.
- गीता व ज्ञानेश्वरी यावरील लेखमाला प्रसिद्ध.
- अध्यात्म व तत्त्वज्ञान याचा प्रचार व प्रसार हेच जीवनध्येय

**संपर्क :** २४६ ए/ई, रत्नोदय सोसायटी, नागाळा पार्क, कोल्हापूर. ✆ : ०२३१-६५१०४४